# प्र वा सी

लेखक :

ना. सी. फडके

तृतीय आवृत्ति

ऑक्टोबर १९४७

एकमेव विक्रेते

चित्रशाळा प्रेस, प्रकाशन विभाग, पुणें २.

प्रो. फडके यांचें

कादंबरी वाङमय

अल्ला हो अकबर
कुलाब्याची दांडी
जादुगार
दौलत
अटकेपार
निरंजन
कलंकशोभा
आशा
उद्धार
काश्मिरी गुलाब
प्रवासी
समरभूमि
उन्माद
गुप्त प्रायश्चित्त
इंद्रधनुष्य
प्रतिज्ञा
वादळ
शाकुंतल
अखेरचं बंड
बस नंबर बारा
जीवनसंगीत
माझा धर्म
झंझावात
अंजली ( आगामी )



# [१]

पंजाबराव सरंजामे हें नांव पुणें शहरांतल्या आजच्या तरुण पिढीला फारसं माहित नाहीं. पण, पुण्यांतल्या एखाद्या पेन्शनराजवळ तें नांव काढतांच पंजाबरावांच्या दहा वीस तरी आख्यायिका सांगितल्याखेरीज तो तुम्हांला सोडणार नाहीं. म्हातारीं माणसं एरवी जरी फारशीं बोललीं नाहींत तरी त्यांच्या काळांतल्या एखाद्या व्यक्तीची गोष्ट काढली, कीं त्यांच्या जिभेला एकदम गति मिळते. मग ती थांबवणंच मोठं कठिण असतं! या न्यायाला अनुसरून पुण्यांतल्या एखाद्या वृद्ध गृहस्थाजवळ पंजाबराव सरंजाम्यांच्याबद्दल तुम्ही गोष्ट काढलीत, कीं तो गृहस्थ आपल्या चष्म्यांतून तुमची चवकस मुद्रा न्याहाळून पाहील, हजामत केलेल्या मस्तकाला चिकटलेले पांढऱ्या शेंडीचे दोन चार केंस डाव्या हाताच्या बोटांनीं उचलल्यासारखे करील, आणि खाकरून तुम्हांला म्हणेल,

"पंजाबराव ना? मोठी विचित्र असामी होऊन गेली ती! साधा मॅट्रिक झालेला वकील होता, पण प्रॅक्टिस काय विचारतां? टांग्यांची ही थाप असायची स्वारींच्या दारापुढें! अन् मुलखाचा लहरी! मनांत आलं तर घ्यायचा केस हातांत, नाहीं तर खुशाल कुळाचे कागद फेंकून देऊन दाराची वाट दाखवायचा. मग तें कूळ लक्षाधिपति असलं तरी त्याला पर्वा नसायची! मात्र, केस हातांत घेतलीन् पंजाबरावानं, कीं माणसानं निश्चिंत असावं. काय वाटेल तें करून केस जिंकायचाच तो. बोलणारा असा फर्डा होता म्हणतां! तुमचे जयकर आणि जिना कसले हो त्याच्यापुढें! एकदां मुंबईचा तो प्रसिद्ध बॅरिस्टर–काय पहा त्याचं नांव–तो हो–बुटासुटांत असायचा अन् एका डोळ्याला चष्म्याचं भिंग लावून बोलायचा तो— अगदीं डोळ्यांपुढें आहे शिंच्याचं नांव. पण आठवत नाहीं. न आठवूं द्या. सांगायची गोष्ट अशी कीं तो फर्डा बॅरिस्टर मुंबईहून आला एका केससाठीं इथं पुण्याला. आला तो अशा तोऱ्यांत, कीं पुण्याचं कोर्ट काय खेडवळ, नुसत्या रुबाबांत केस जिंकून जाऊं आपण! पण विरुद्ध बाजूला पंजाबराव होता. त्यानं अशी तारांबळ उडवली त्या बूटपाटलोणवाल्या बॅरिस्टराची कीं कांहीं विचारूं नका. केस तर जिंकलीनूच पंजाबरावानं पण त्या बॅरिस्टरचा पारशी कारकून बाररूममध्यें कांहींसं उद्धटपणानं बोलला तेव्हां पंजाबरावानं काड्दिशी श्रीमुखांत लगावली त्याच्या! दिसायला तरी स्वारी कशी होती म्हणतां? नुसता राक्षस दिसे. साडेसहा फूट उंचीचं शरीर, लहानपणीं आखाड्यांत कुस्त्या मारून कमावलेली ताकद, अंगांत अंगरखा अन् डोक्याला भलं चक्री पागोटं, पेशवाई थाटांच्या गलमिशा, आणखी भव्य कपाळावर तीन बोटांनीं लावलेलं चंदनाचं गंध! साऱ्या पुण्याला दरारा असे पंजाबरावाचा. त्या वेळीं बळवंतराव टिळक नुकते पुढें यायला लागले होते. त्यांचीसुद्धा छाती नव्हती पंजाबरावाच्या मनाविरुद्ध जाऊन एखादं सार्वजनिक काम करावयाची. मवाळांची कॉंग्रेस पुण्यांत भरली तेव्हा मांडव कोणी जाळून टाकला माहित आहे? पंजाबरावानं! जबर इसम होऊन गेला बाबा! बुद्धि अचाट. दारूचं व्यसन केलंन् तेंही अचाट, अन् अखेर अखेर राजकीय चळवळीसाठीं स्वार्थत्याग केलान् तोही अचाट..."

अशा रीतीनं ते वृद्ध पेन्शनर तुम्हांला किती [illegible] ठेवतील तें सांगतां येत नाहीं.

कारण, खरोखरच पंजाबराव सरंजामे ही एक विलक्षण व्यक्ति होऊन गेली पुणें शहरांत.

एकदां काय झालं, सातार्‍याजवळच्या कुठल्याशा खेड्यांतल्या इनामदाराच्या चौघा मुलांत इस्टेटीच्या वांटणीबद्दल भांडणं लागलीं. सगळ्यांत वडील मुलगा होता त्याचं नांव केशव. त्यानं पंजाबरावांना वकीलपत्र दिलं. आपल्या वकिलाला सगळी इस्टेट एकदां प्रत्यक्ष दाखवावी म्हणून केशवरावानं पंजाबरावांना म्हटलं,

"आपण एकदां आमच्या घरीं येऊन दोन दिवस राहिलांत तर बरं होईल."

पंजाबराव हंसले, व म्हणाले,

"तुमच्या घरीं?"

"हो. कां? आम्ही आपली उत्तम प्रकारची बरदास्त ठेवू."

पंजाबराव पुन्हां हंसले. "आमची बरदास्त तुम्हांला जमायची नाहीं केशवराव."

"पण आपण सांगावं तर खरं. आमच्या घरीं मोठमोठे पाहुणे येऊन गेलेले आहेत. आपल्या सुखसोयींत तिळमात्र उणीव राहिली तर विचारा."

"बाकीच्या सोयी तुम्ही कराल हो. पण आमचं संध्याकाळचं आन्हिक जरा भानगडीचं असतं. तें कसं तुमच्या घरांत जमायचं!"

"कां, त्यांत काय अवघड आहे? स्वतंत्र न्हाणी आहे, मोठं देवघर आहे—"

पंजाबराव मोटमोठ्यानें हंसले, व म्हणाले,

"बघा केशवराव, मीं तुम्हांला म्हटलं नाहीं—आमच्या सोयी तुम्हांला कळायच्या नाहींत?"

त्या बोलण्याचा अर्थ न कळून केशवराव गोंधळला.

पंजाबरावांच्या कारकुनानं त्याच्या कानांत कांहींसं सांगितलं तेव्हां त्याच्या डोक्यांत उजेड पडला व तो म्हणाला,

" असलं आन्हिक म्हणतां होय ? मग ? त्याचीसुद्धां सोय करतां येईल ! आमच्याकडे मामलेदार किंवा कलेक्टर पाहुणे आले, कीं आम्ही साताऱ्याहून बाटल्या मागवतों. तें कांहीं नाहीं. आपण यायलाच पाहिजे दोन दिवस आमच्या घरीं. येवढंच नाहीं, तर राजाभाऊनासुद्धां घ्यायला पाहिजे बरोबर."

" कुणाला ? राजाला ? त्याची शाळा बुडवायचा बेत आहे वाटतं तुमचा ?"

" तसं नाहीं. पण, आमच्या शेतावर हुरडा खायला नेईन असं त्यांना मी इथं आलों, कीं दर वेळेस सांगतों आहें."

" वा वा ! तो एक शहाणा येतों म्हणणारा, अन् तुम्ही दीडशहाणे नेतों म्हणणारे ! आपल्या मुलांबाळांना कुळांच्या शेतांत चरायला सोडणारे वकील पुष्कळ आहेत पुण्यांत. पण, तुम्ही पंजाबरावांशीं बोलतां आहांत केशवराव !"

हें ऐकून केशवरावाला दरदरून घामच सुटला. तो हात जोडून नम्रपणानं म्हणाला,

" माझी चूक झाली. मला क्षमा असावी. अं...बरं मग आपण केव्हां निघायचं ? उद्यां निघूं या ?"

" नको. परवां निघूं."

केशवराव दिवाणखान्यांतून बाहेर पडला तों दाराच्या आड राजाभाऊ उभा असलेला त्याला दिसला.

त्यानं पुढं होऊन केशवरावास अतिशय उत्सुकतेनं विचारलं,

" काय म्हणाले बाबा ? जायचं का आपण तुमच्या शेतावर हुरडा खायला ?"

त्या गोंडस देखण्या मुलाच्या दृष्टींत उत्सुकतेचं पाणी खेळत होतं ! वकीलसाहेबांच्याकडे येणाऱ्या सर्वच कुळांना तो सुंदर तरतरीत बालक प्रिय होता. तो मातृविहीन आहे हें ज्यांना माहित होई तीं कुळं तर

त्याच्यावर विशेष प्रेम करीत, आणि केशवरावाचं अंतःकरण त्या बालकाकडे विशेष ओढलं जावयाला आणखी एक कारण होतं. त्याला स्वतःला अपत्य नव्हतं. आपल्या बायकोला हा गुटगुटीत सुंदर मुलगा पहातांच वात्सल्याचा पान्हा फुटेल, आणि प्रेमभरानं त्याला हृदयाशीं धरतांच तिला कधींच नव्हे असा आनंद होईल अशी त्याची खात्री होती; आणि राजाला प्रथम पाहिल्या दिवसापासून त्याला केव्हां तरी आपल्या घरीं घेऊन जाण्याचा त्यानं निश्चय केला होता.

त्याच्यानं खरं बोलवलं नाहीं. तो म्हणाला,

"वकीलसाहेब म्हणाले, राजाभाऊंना घेऊन आपण पुढें केव्हां तरी जाऊं. अजून हुरडाही चांगला निघायला थोडा अवकाश आहे. तंवर तुमच्या शाळेलाहि सुटी होईल. मग जाऊं आपण."

राजाभाऊच्या सुंदर मुखकमलावर निराशेची किंचित् कृष्णछटा आली.

केशवरावानं त्याचे गाल हातांत पकडले, व म्हटलं,

"खरंच मी नेईन हं तुम्हांला पुढें केव्हां तरी. पण या वेळेस नको."

राजाभाऊनं केशवरावाकडे निरखून पाहिलं व विचारलं,

"बाबा रागावले होय?"

वडिलांच्या रागाला राजा किती भीत असे याची केशवरावाला थोडीशी कल्पना होती. तो म्हणाला,

"छे छे; रागावले नाहींत. पण ते म्हणाले, कज्ज्याच्या कामासाठीं जायचं त्या वेळेस राजाभाऊ कशाला बरोबर? पुढें केव्हां तरी घेऊन जा त्याला."

हें ऐकतांच राजाभाऊ आनंदानं हंसत घरांत गेला, आणि केशवराव आपल्या वाटेला लागला.

ठरल्याप्रमाणें तिसऱ्या दिवशीं पंजाबराव केशवरावाच्या गांवीं गेले.

त्यांनीं सारा दिवस केशवरावाची इस्टेट पहाण्यांत घालवला; आणि संध्याकाळीं सूर्यास्तानंतर ते त्याला म्हणाले,

" केशवराव, आतां आम्हाला एकट्यालाच सोडा या दिवाणखान्यांत. आमच्या आन्हिकाची वेळ झाली. सगळी तयारी आहे ना ? "

केशवरावानं त्यांची सगळी तयारी दाखविली, व त्यांना दिवाणखान्यांत सोडून तो खालीं घरांत गेला.

पंजाबरावांनीं मद्य घ्यावयास सुरवात केली, व सिगरेट ओढीत समोरच्या खिडकींतून दिसणाऱ्या देखाव्याकडे ते पहात राहिले.

कोणत्याहि मोठ्याशा खेड्यांत दिसणारा ठरीव देखावा होता तो.

रस्त्यालगत दहावीस घरांचीं कौलारू छपरं दिसत होतीं. त्या कौलारांच्या मधून मधून चिंचेच्या आणि वडाच्या जुन्या झाडांच्या फांद्या उंचावलेल्या दिसत होत्या. एका कौलारू छपरावर कळपांतून फुटून मागं रेंगाळलेली एक माकडाची मादी आपल्या पिलाला गच्च पोटाशीं धरून स्वस्थ बसली होती. कां कुणास ठाऊक ? एका वडाच्या झाडाभोंवतीं वट-वाघुळांचा थवा अशा रीतीनें घोंघावत होता, कीं तीं पाखरं झाडावरून उडून जात आहेत, कीं झाडावर येत आहेत तें सांगणं कठिण होतं. त्या कौलारांच्या आणि वृक्षशाखांच्या पलीकडे कसलीच इमारत दिसत नव्हती. बहुधा त्या गांवची नदी तेथून वहात गेली असावी. त्यापलीकडे पुष्कळशा अंतरावर मात्र शेतांच्या रांगांच्या रांगा दिसत होत्या. [त्या रांगा जिथें संपल्या होत्या तिथें डोंगर सुरू झाले होते, आणि त्या डोंगरमाथ्यांचं चुंबन घेणाऱ्या आकाशाचा भाग सूर्यास्तानंतर रेंगाळणाऱ्या गमतीदार प्रकाशानं शोभत होता] गांवांतल्या मुख्य देवस्थानांत चौघडा आणि सनई सुरू झाली होती. इतकी सुरेल सनई वाजवणारा गुरव या खेडेगांवांत असावा याचं पंजाबरावांना जरा नवल वाटलं. सनईतून निघणारे 'पूर्वी' रागाचे ते आलाप त्यांना मोठे कर्णमधुर वाटले. समोरच्या देखाव्याकडे पहात, मधूनच मद्य घेत व मधूनच सिगारेटचा झुरका मारीत, आणि कांहींशा तन्मयतेनं सनईचे ते गोड स्वर ऐकत पंजाबराव आपल्या स्वतःच्या संसाराचे विचार करूं लागले.

मनुष्य आपल्या गतायुष्यांतल्या गोष्टी आठवूं लागला, कीं पश्चात्तापाची ल्हानशी तरी लकेर क्षणमात्र तरी त्याच्या मनांत आल्यावांचून रहात

नाहीं. अमक्यावेळीं अमुक गोष्ट आपण केली नसती तर बरं झालं असतं असें त्याला वाटल्यांचून रहात नाहीं. पण, पंजाबरावांनीं आपल्या आयुष्यांत जे जें केलं होतं, ते तें इतक्या बेदरकारपणानं केलं होतं, त्यांच्या निरनिराळ्या कृतींचे जे बरेवाईट परिणाम त्यांच्या वांट्याला आले त्या-विषयीं त्यांनीं मनांत इतकी बेपर्वाई ठेवली होती, कीं त्यांना आपल्या आयुष्यातल्या कोणत्याच घटनेबद्दल विषाद अगर खेद वाटण्यासारखा नव्हता. रस्त्यावरच्या म्युनिसिपालिटीच्या दिव्याखालीं बसून अभ्यास करून व गरिबीशीं झगडून त्यांनीं आपल्या बुद्धीच्या आणि कर्तृत्वाच्या जोरावर मार्ग काढला होता; पण उलट, त्यांच्या नशिबानं त्यांची वकिली जेव्हां प्रारंभापासून अकल्पित धडाक्यानं चालूं लागली, तेव्हां मिळेल तितका पैसा मिळवतांना न्यायान्यायाची त्यांनीं क्षितीहि ठेवलेली नव्हती; आणि स्वतःच्या पराक्रमाबद्दल त्यांनीं जसा फाजील हर्ष होऊं दिला नव्हता, त्याच-प्रमाणें पैसा मिळवतांना जें करावं लागलं त्यांतल्या पापपुण्याची फाजील चिकित्साहि त्यांनीं आपल्या मनाला कधीं करूं दिली नव्हती. त्यांनीं आपल्या मृत पत्नीला तिच्या हयातीत अतिशय प्रेमानं वागवलं होतं; आणि उलट तिच्या हयातींतसुद्धां तिच्याशीं बेइमानी करून त्यांनीं आपल्या उच्छृंखल स्त्रीलंपट भावना पूर्ण केल्या होत्या. पण या दोन्ही गोष्टींत त्यांच्या मनाची बेपर्वाई कायम राहिली होती. लहानपणापासून शिवदैवत मानून त्यांनीं त्याची उपा-सना मोठ्या तत्परतेनं केली होती; आणि उलट, कोंवळ्या वयांतच मद्य-पानाचं व्यसन त्यांना लागून त्या व्यसनाला त्यांनीं कधीं आळाहि घातला नव्हता; आणि या दोन्ही गोष्टीहि त्यांनीं सारख्याच बेदरकारपणानं केल्या होत्या. दातृत्व, वक्तृत्व, राग, द्वेष, प्रेम, उपासना आणि व्यसन— या सर्वच गोष्टी म्हणजे त्यांच्या स्वभावाच्या निरनिराळ्या लहरी होत्या. लहर आली कीं ती पुरी करावयाची, तिच्या परिणामाचा विचार करावयाचा नाहीं, विरोधाशीं झगडून इच्छापूर्तीचा आनंद घ्यायचा, हाच काय तो त्यांच्या स्वभावांतला स्थिर गुण होता. अर्थात् केशवरावाच्या घरांत माडीवरच्या दिवाणखान्यांत बसून ते जेव्हां स्वतःच्या आयुष्याचा विचार करूं लागले, तेव्हां त्यांच्या मनांत पश्चात्तापाची किंचितसुद्धां ऊर्मि उठली नाहीं यांत आश्चर्य नाहीं.

त्यांना स्वतःची गरिबी आठवली, विद्यार्थिदशेंत अभ्यासासाठीं केलेले अचाट श्रम आठवले, शाळेंतल्या दंगाधोप्यांची आठवण झाली, सवंगड्याचं स्मरण झालं, कोर्टाच्या कामांत वेळोवेळीं बुद्धिचातुर्याच्या ज्या लढाया त्यांनीं केल्या होत्या त्याहि त्यांच्या मनांत आल्या, राजाभाऊला जन्म दिल्यानंतर त्यांची पत्नी आजारी पडली तेव्हां त्यांनीं किती प्रेमानं तिची शुश्रुषा करून धीर दिला होता याबद्दलच्याहि किती तरी आठवणी त्यांच्या मनात एकदम गोळा झाल्या.......

त्यांनीं ग्लास उचलून मद्याचे आणखी दोन घोंट घेतले व नवी सिगरेट पेटवली, त्यांनीं खिडकींतून समोर पाहिलं, तों बाहेरचा देखावा जवळजवळ लुप्त झाला होता. रात्र वाढली होती. सनईचे सूरहि थांबले होते. जिकडे तिकडे अगदीं सामसूम झाल्यासारखं वाटत होतं. केशवरावाचा म्हातारा गडी खालीं देवडीवर बसून खोकत होता तेवढाच काय तो आवाज ऐकूं येत होता. समोरच्या झगझगीत 'डिटमार'च्या दिव्याभोंवतीं लहानमोठे रातकिडे वांकड्या तिकड्या गिरक्या घेत होते.

पंजाबराव पुढें विचार करूं लागले.

त्यांची उमर अजून पुष्कळ उरली होती. आज ते लाख दीड लाखाचे धनी होते. आणखी दहावीस वर्षांत तीनचार लाखाची माया त्यांच्या-जवळ जमायला कांहीं प्रत्यवाय नव्हता. पण आतां पैसे मिळवायचा त्यांना कंटाळा येऊं लागला होता हलकेहलकें. कारण, त्यांत पराक्रमाचा भाग कांहीं उभारला नव्हता. कोर्टांत उभं राह्यचं, आणि अशिलांच्या हातून नोटांचीं भेंडोळीं काढून घ्यायची, असं स्वरूप आलं होतं त्यांच्या धंद्याला आतां. संपत्ति मिळविण्याची क्रिया अशी विचित्र आहे, कीं ती ज्याला साधत नाहीं त्याला एक एक पैसा दुर्भिळ वाटतो, आणि ती ज्याला साधून जाते, त्याला पैशाचा ओघ बंद कसा करावा हें कळत नाहीं. त्या क्रियेंत मनुष्याला मग स्वारस्यहि वाटत नाहीं. पंजाबरावसारख्या वृत्तीच्या माणसाला तर त्या क्रियेचा एक प्रकारानं शीण यायला लागतो. पंजाबरावांना कधीं कधीं वाटे सपाटून पैसे मिळवण्यांत जसा आनंद आहे, किंवा स्वतःच्या चैनीसाठीं पैसा उडाविण्यांत जसं सुख आहे, तसंच

कदाचित् एखाद्या सत्कार्याला मुक्त हस्तानं पैसा देऊन टाकण्यांतही सुख असेल. हें आपण कां उपभोगूं नये ? आपण कितीही पैसा देऊन टाकला, तरी आपल्या मुलाला जन्मांत कधीं ददात पडायचं कारण नाहीं. राजा-भाऊ मोठेपणीं कोण होईल बरं ? कुणास ठाऊक ! या गोष्टी कधीं सांगता येत नाहींत. पण पोरगा चिमखडा आहे खास ! आणि बापाची बेदरकारी आतांपासून दिसायला लागली आहे स्वारीमध्यें. बिचाऱ्याला मातृसुख लाभलं नाहीं. दुर्दैव त्याचं ! पण पोरकीं पोरंच पुढें मोठीं होतात. मीं दुसरं लग्न केलं असतं तर राजाभाऊच्या सुखाच्या दृष्टीनं बरं झालं असतं कां वाईट झालं असतं कुणास ठाऊक ? कां बरं केलं नाहीं मीं दुसरं लग्न ? केवळ माझ्या अंगच्या विषयीपणाचं स्वातंत्र्य कायम रहावं म्हणून ? कां मनाजोगी स्त्री मला दिसलीच नाहीं म्हणून ? कां हाही माझ्या स्वभावाच्या लहरीचा परिणाम ?.........

या प्रश्नांचीं उत्तरं पंजाबरावांना आजपर्यंत कधींच सांपडलीं नव्हतीं. अर्थात् या वेळींही तीं सांपडलीं नाहींत.

आणखी मद्य घेण्यासाठीं त्यांनीं ग्लास तयार केला आणि सोड्याची बाटली ओतली.

पण सोडा ग्लासांत ओतून तो ते तोंडाला लावणार इतक्यांत—

घराच्या खालच्या भागांतून त्यांना विचित्र आरडाओरडा ऐकूं आला.

ग्लास हातांत धरून ते तसेच थांबले, आणि कानोसा देऊन ऐकूं लागले.

कोणा तरी बाईचा रडण्याचा स्वर ऐकूं येत होता. केशवरावही कांहींतरी बोलत होता. आणखी कोणा तरी पुरुषमाणसाचं रागारागाचं बोलणं ऐकूं येत होतं.

पंजाबरावांनीं कांहीं वेळ कानोसा घेऊन पाहिला, पण त्यांना नीटसं ऐकूं येईना. मग त्यांनीं ग्लास झटकन रिकामा केला, आणि सिगारेट ओढीत ओढीत ते जिन्याच्या चारपांच पायऱ्या उतरून जिन्यांतच उभे राहून ऐकूं लागले.

केशवराव म्हणत होता,

"राधावहिनी, तुम्ही म्हणतां तें सगळं खरं. तुमची ही दशा मलाच काय, आपल्या या गावातल्या कोणाहि इसमाला पाहवत नाहीं. पण आमचा कुणाचा काय उपाय चालणार? तुमच्या दैवांत हेंच लिहिलं आहे असं समजून तुम्हीं हें सोसलं पाहिजे......"

त्या बाईनं हुंदके दिले आणि म्हटलं,

"केशवराव, माझ्या जागी तुमची सख्खी बहीण असती, तर तिला येवढंच सांगून तुम्ही स्वस्थ बसला असतात का हो? मला आतां हा छळ सोसवत नाहीं. तुमचा कुणाचा कांही उपाय नसेल तर मला वीष तरी पाजा घोटभर! म्हणजे—"

दुसऱ्या कुणातरी पुरुषाचा आवाज ऐकूं आला,

"घोटभरच का, घडाभर वीष पाजतों कीं तुला! घरीं चल म्हणजे मारून टाकतो तुला या क्षणाला. इनामदारांची मदत मागायला आलीस; लाज वाटत नाहीं तुला परक्या पुरुषाची मदत मागायला? अन् इनामदार झाले तर ते आपल्या घरचे. माझं काय पारिपत्य करणार आहेत ते? मी गांवचा कुलकर्णी आहे. मनांत आणीन तर याचंसुद्धां वाटोळं करून टाकीन! भावाभावांच्या कलागती दिल्याच आहेत मी लावून. किती झालं तरी तूं माझी लग्नाची बायको आहेस. तुला फोडीन, झोडीन, वाटलं तर तुझा जीव घेईन; समजलीस? केशवराव माझं कांऽऽहीं करूं शकत नाहींत. अन् याबद्दल तुला भ्रम असला, तर आतांच या छडीनं फोडीत रस्त्यानं ओढीत तुला घरीं नेतों. मुकाटयानं येतेस, कां लगवूं छडी?"

हे शब्द पुरे झाले नाहींत तोंच त्या बाईनं किंकाळी फोडली आणि म्हटलं,

"केशवराव, तुम्हांला मला या नरकवासांतनं सोडवतां येत नसेल तर इथें, तुमच्या या देवघरापुढें, डोकं फोडून प्राण देतें मी. अहो, यांनीं आतां त्या मुसलमानीण बाईला घरांत आणली आहे हो. अन् मी त्या बयेची चाकरी एखाद्या बटकीसारखी करावी म्हणून गेले दोन दिवस माझा छळ चालवला आहे! पोटांत अन्न नाहीं माझ्या दोन दिवस, अन् पाठीवर मार

मात्र खातें आहे. केशवराव, नाहीं कां तुम्हांला दया येत ? तुमच्या वडिलांच्या वेळचा या घराचा असा लौकिक होता, कीं गांवातल्या कुणाही माणसाचं कसलंही दुःख या घराचा आश्रय घेतांच नाहीसं होत असे. मला तुमची बहीण समजा, तुमच्या बायकोची दासी समजा, मोलकरीण म्हणा, पण या चांडाळाच्या घरांत परत जायला—"

तें तिचं वाक्य पुरं झालं नाहीं. तिच्या अंगावर बसलेल्या छडीच्या तडाख्याचा काडकन् आवाज झाला, आणि तिनं जी किंकाळी फोडली तिच्या मागोमाग कुलकर्ण्याचे शब्द ऐकूं आले,

"बेवकूब ! परक्याच्या घरांत येऊन नवऱ्याला शिव्या देतेस काय ?"

केशवरावांचा आवाज ऐकूं आला,

"दामुअण्णा, दामुअण्णा ! हें काय करतां आहांत ?"

दामुअण्णा ओरडला,

"अरे होय रे पोरा, माहित आहे मला ! मला शिकवूं नकोस अक्कल. मी मुसलमानीण घरांत आणीन नाहीं तर म्हारीण आणीन, आणि या तुझ्या राधावहिनीला—साऱ्या गांवानं जिला पतिव्रता ठरवली आहे त्या या देवीला—बटकीसारखी ठेवीन, नाहीं तर—"

आतां मात्र पंजाबरावांच्यानं जिन्यांत स्तब्ध उभं राहवेना. ते जिन्याच्या उरलेल्या पायऱ्या धाड्धाड् उतरून मधल्या घरांत गेले आणि ओरडले,

"कोण रे, कोण तूं नरपशु ? तोंड आटप, आणखी दूर सरक पाहूं आधीं."

त्यांना पहातांच केशवराव दचकला आणि दामुअण्णानंही दचकून त्यांच्याकडे पाहिलं.

पंजाबराव त्याच्यावर ओरडले,

"निर्लज्ज माणसा ! हातांतली ती छडी टाक पाहूं आधीं खालीं."

मांत्रिकाला पाहतांच झपाटलेल्या माणसाची स्थिति व्हावी तशी दामुअण्णाची झाली. त्याच्या हातांतली छडी गळून पडली. त्यानं निशापाणी केलं होतं खरं, पण त्याच्यासारख्या माणसाची गंमत अशी असते, कीं आपल्याला कोणी आंवरत नाहीं अशी त्याची खात्री असेल तोंपर्यंत त्याचं

अनावर अकांडतांडव चालूं असतं; पण आपल्या सवाई मनुष्य आपल्यापुढें उभं आहे हें त्यानं पाहिलं, कीं त्याच्यासारखा भेकड तोच! दामुअण्णाचा नूर एकदम पालटला. आपलं अवसान गेलं हें छपवण्यासाठीं त्यानं फक्त भीत भीत विचारलं,

" तुम्ही कोण? "

पंजाबरावांनीं आपले वटारलेले डोळे त्याच्यावर रोखून म्हटलं,

"मी तुझा बाप; समजलास? चल जा आपल्या घराची वाट धर. तुझी पत्नी यापुढें तुझ्या घराचा उंबरठा चढणार नाहीं. या इनामदारांच्या घरांत तिचं रक्षण होत नसेल, तर तिचं रक्षण मी करीन. आणखी हें बघ, ए दामूअण्णा, घरीं परत गेल्यावर केशवरावाला उपसर्ग देण्याचे बेत करूं लागलास तर याद राख! तूं स्वतःला या गांवांतला मोठा गुंड समजत असशील; पण तुझी गुंडगिरी माझ्यापुढें कांहीं चालायची नाहीं अं! आजपर्यंत तुझ्यासारखे छप्पन गुंड जेलमध्यें रवाना केले आहेत या पंजाबराव सरंजाम्यानं!"

" काय? पंजाबराव सरंजामे? "

असं भेदरलेल्या आवाजांत पुटपुटून दामुअण्णा कुलकर्ण्यानं पाठ फिरवली आणि दुसऱ्याच क्षणीं तो तेथून निघून गेला.

दामुअण्णाच्या त्या जाण्यानं केशवरावाला समाधान वाटण्याऐवजीं भयच वाटलं असावं. कारण, तो पंजाबरावांना म्हणाला,

"वकीलसाहेब! हें आपण काय केलंत? दामूअण्णा इथून मुकाट्यानं निघून गेला खरा, पण तो स्वस्थ बसेल असं समजूं नका. तो काळसर्प आहे."

पंजाबराव हंसले व म्हणाले,

"असे शेंकडों काळसर्प ठेंचले आहेत मीं आजपर्यंत. प्रत्यक्ष कांहीं करायची तर गोष्टच राहूं द्या, पण या दामुअण्णानं तुमच्याविरुद्ध किंवा माझ्याविरुद्ध तोंडावाटे ब्र काढलेला मला कळला, तर याचं कुलकर्णीपण काढून घेऊन याला धुळीस मिळवायची शक्ति माझ्या अंगांत आहे. तुम्ही अगदीं

चिंता करूं नका. खुशाल निर्धास्तपणानं या बाईना तुमच्या घरांत आश्रय द्या. अन् तुम्हांला हा धीर होत नसेल, अन् या बाईना कबूल असेल, तर यांना मी माझ्या घरांत आश्रय देईन."

आणि खरोखरीच पंजाबराव परत पुण्यास गेले ते राधाबाईला आपल्या-बरोबर घेऊन गेले.

एका कुलकर्ण्याची लग्नाची बायको खुशाल तिच्या नवऱ्याच्या घरांतून काढून पंजाबरावांनीं आपल्या घरांत आणून ठेवली, हें लोकांना कळतांच पुण्यांत केवढा प्रक्षोभ झाला असेल त्याचं वर्णन करायला कां पाहिजे? लोकमताच्या सहस्र जिव्हा वाटेल त्या वडवडूं लागल्या. दैनिक वर्तमानपत्रांत त्या गोष्टीची चर्चादेखील झाली. पंजाबरावांच्या शत्रूंनीं नाहीं नाहीं त्या कंड्या उठवल्या. मित्रांनीं इशारे दिले, उपदेश केले, पण या विरोधाचा एकच परिणाम झाला तो हा, कीं पंजाबराव अधिकच हट्टास पेटले. त्यांच्या स्वभावांतला बेदरकारपणा आणि बेपर्वाई उचंबळून आली. राधाबाईचं पहिलं लग्न कायदेशीरपणानं विघटित न करतां त्यांनीं तिच्याशीं संसार करायला प्रारंभ केला! साऱ्या जगाला कस्पटासमान मानायची जी हौस त्यांच्या स्वभावात होती, तिला बरेच दिवसांत खाद्य मिळालं नव्हतं तें आयतं मिळाल्यासारखं झालं.

दामुअण्णा अगदीं स्वस्थ बसला.

राधाबाई मोठ्या सुखानं आणि आनंदानं पंजाबरावांचा संसार पत्नी-व्रतानें पाहूं लागली.

राजाभाऊवर सख्ख्या आईपेक्षां अधिक प्रेम ती करूं लागली.

लहानगा राजाभाऊ प्रथम कांहीं दिवस गोंधळला; पण राधाबाईच्या निस्सीम वात्सल्यानं अखेर तो जिंकला गेला आणि बरेच दिवस विसरलेली 'आई'. ही हांक मोठ्या उत्सुकतेनं मारून एखाद्या सख्ख्या मुलाप्रमाणें तो राधाबाईशीं प्रेमानं वागूं लागला.

★

# [२]

यानंतर फार दिवस लोटले नाहींत तोंच टिळकांचा १९०८ सालचा प्रसिद्ध खटला सुरूं झाला.

टिळकांच्या निकटवर्ती स्नेह्यांत दाजीसाहेब खरे, दादासाहेब करंदीकर, बॅप्टिस्टाकाका इत्यादि जी कायदेपंडित मंडळी होती, ती त्यांना खटल्याच्या कामीं मदत करण्यासाठीं रात्रंदिवस झटत होती.

या मंडळींत पंजाबराव सरंजामेही अर्थात् होते.

खटल्याच्या अखेरीस मध्यरात्रीं जेव्हां जस्टिस दावरनं टिळकांना सहा वर्षांची शिक्षा सांगितली, आणि पोलिस ऑफिसर आपल्या पहाऱ्यांत टिळकांना घेऊन कोर्टाच्या बाहेर पडले, तेव्हां कोर्टांत हजर असलेल्या टिळकांच्या स्नेह्यांच्या आणि हितचिंतकांच्या हृदयांत त्वेषाची आणि शोकाची केवढी प्रचंड ज्वाला पेटली असेल, त्याची कल्पनाच केलेली बरी.

पंजाबरावांचा सारा स्वाभाविक बेदरकारपणा पार नष्ट झाला.

एखाद्या लहान मुलाप्रमाणें कोर्टाच्या इमारतींत ते रडले.

टिळकांच्या शिक्षेविरुद्ध प्रीव्हि-कौन्सिलकडे अपील करायचं जेव्हां टिळकांच्या मित्रमंडळींनीं ठरवलं, आणि त्यासाठीं लागणाऱ्या खर्चाची तरतूद कशी करायची याबद्दलची चर्चा जेव्हां निघाली, तेव्हां दादासाहेब करंदीकरांच्या कानांत पंजाबरावांनीं सांगितलं,

"या कामासाठीं मी पन्नास हजार रुपयें देतों. पण माझ्या या देणगीची यत्किंचित्हि वाच्यता होतां कामा नये!"

ते पुण्यास आले ते अत्यंत विषण्ण मनःस्थितींत. महिनाभर ते कोर्टांत गेले नाहींत किंवा घरींदेखील त्यांनीं अशिलांच्या गांठी घेतल्या नाहींत. दिवसभर ते आपल्या पलंगावर पडून राहत. राधाबाई त्यांच्या बिछान्याजवळ बसून लोंकरीचा गळपट्टा करीत बसे. तिच्या हाताकडे अगर चेहऱ्याकडे ते शून्य मनानं पहात रहात! फारच झालं, तर राजाभाऊशीं बुद्धिबळं खेळत, किंवा दिवाणखान्यांतल्या दिवाणखान्यांत त्या वेळीं नुकताच प्रचारांत येऊं लागलेला क्रिकेटचा डाव रबरी चेंडूनं ते खेळत; आणि दिवस संपला, कीं ते जें मद्यप्राशन सुरूं करीत, तें मग चारचार पांचपांच घटका थांबत नसे.

त्यांच्या त्या मद्यपानाची राधाबाईला विलक्षण भीति वाटे.

पंजाबरावांच्या घरीं ती राहायला आल्यानंतर अगदीं प्रथम जेव्हां तिचा व त्यांचा एकान्त घडला, आणि त्यांचं मद्यपान तिच्या दृष्टीस पडलं, तेव्हां ती भीतीनं एकदम पांढरी फटफटीत पडली होती, आणि तिचं सर्वांग थरथर कापूं लागलं होतं.

पंजाबरावांच्या नेत्रांत मद्याचा उन्माद असला, तरी त्यांच्या वागण्यांत आणि स्पर्शांत कमालीची सुकुमारता आहे याचा प्रत्यय आला तरीसुद्धां तिच्या छातींतली धडकी थांबली नव्हती. कारण, दारूचा एक थेंब पोटात जाताच दाजुअण्णाच्या अंगीं किती भयंकर हिंस्रपणा संचारत असे, त्याच्या आठवणी तिच्या शरीरावर ठिकठिकाणीं उठल्या होत्या. त्या पहिल्या रात्रीं पंजाब-रावांनीं तिला पुनः पुन्हां विचारलं होतं, 'राधे, वेडे, अशी थरथर

कांपतेस आहेस काय? माझी भीति वाटते तुला?' या त्यांच्या लाडक्या प्रश्नाला तिनं आपल्या मनांतलं खरं उत्तर दिलं नव्हतं. ती पुन:पुन्हां हंसत म्हणाली होती, 'छे, मला भ्यायला काय झालंय्?' पण एकीकडे हें उत्तर देतांना तिच्या मनांत सारखं येत होतं, ज्या दारूनं माझ्या पहिल्या संसाराचा सत्यानाश केला, तीच दारू या दुसऱ्या संसारांतही माझ्या सोबतीला कायमची असणार काय?......

आणि कितीही मद्यपान केलं, तरी पंजाबरावांच्या सौजन्याचा आणि प्रेमाचा तोल सुटत नाहीं याबद्दल तिची जरी दिवसानुदिवस अधिकाधिक खात्री होत गेली, तरी तिच्या मनानं मद्याविषयीं एकदां घेतलेली धास्ती पूर्णत्वानं लयाला कधींच गेली नाहीं.

त्यामुळें टिळकांच्या शिक्षेनंतरच्या त्या महिन्यांत पंजाबराव जेव्हां नेहमींपेक्षां अधिक मद्यपान करूं लागले, तेव्हां ती विलक्षण घाबरली. त्याबद्दल त्यांना हळूंच एखाददुसऱ्या शब्दानं कांहीं तरी बोलावं असं तिच्या शंभरदा मनांत येई. पण तोंडावाटे शब्द काढण्याचीही तिला मनस्वी भीति वाटे. पंजाबराव तिच्याशीं अतिशय प्रेमानं आणि मृदुपणानं वागत हें खरं; परंतु कांहीं झालं तरी ते पंजाबराव होते हें तिला विसरतां येत नव्हतं. निखाऱ्यावर जमलेली राख फुंकरानं उडविली तर कदाचित् चटकाही बसायचा येवढं तिला समजत होतं. ती गप्प बसे.

पण, एके दिवशीं रात्रीं मद्यपानाचा अतिरेक करून पंजाबरावांनीं अपघात करून घेतला. जवळचा दारूचा ग्लास उचलण्याऐवजीं शेजारच्या 'डिटमार'च्या दिव्याची कांच ग्लास समजून त्यांनीं हातांत पकडून उचलली. त्यांचा संबंध पंजा भाजून सोलून निघाला.

त्या रात्रीं राधाबाई किती रडली त्याला सुमार नाहीं.

आणि इतकं झालं तरी आपल्या मनांतलं दुःख आणि भय पंजाबरावांच्या जवळ उघड करण्याचा तिला धीर होईना.

मग आपल्या मनांत सांचलेल्या भावनांना वाट देण्याचा एक निराळाच, आणि कांहींसा विचित्र मार्ग तिनं काढला.

दुसऱ्या दिवशीं राजाभाऊ जेव्हां तिच्याजवळ आला, व आपले हात तिच्या गळ्याभोंवतीं टाकून विचारूं लागला, "आई, आज तुला काय झालंय ग? मला वाटतं सारखी रडते आहेस, होय? मला नाहीं सांगायचं होय?" तेव्हां तिनं प्रथम प्रेमभरानं त्याचं चुंबन घेतलं, आणि मग आपल्या समोर त्याला बसायला लावून अतिशय गंभीर मुद्रेनं त्याच्याकडे पहात त्याला म्हटलं,

"राजाभाऊ, तुझं माझ्यावर किती प्रेम आहे?"
"म्हणजे आई, हें तूं काय विचारते आहेस?"
"नाहीं, पण सांग. तुझं किती प्रेम आहे माझ्यावर?"
"पुष्कळ पुष्कळ!"
'अगदीं खरं ना हें?"
"हो; अगदीं खरं."
"मग तूं माझ्यासाठीं काय करशील?"
"काय वाटेल तें करीन."
"मी सांगतें तशी शपथ घेशील?"
तिचं तें बोलणं राजाला कळेना. त्यानं गोंधळून जाऊन विचारलं,
"शपथ?"

"हो. दारूच्या थेंबाला जन्मांत स्पर्श करणार नाहीं, अशी माझ्या गळ्यावर हात ठेवून शपथ घे!"

राजानं चमत्कारिक मुद्रेनं तिच्याकडे पाहिलं. सारा बारा वर्षांचा होता त्या वेळीं तो. माणसाच्या हातून एखादा प्रमाद घडला, म्हणजेच तो पुन्हां घडूं न देण्याबद्दल लोक त्याला शपथ घ्यायला लावतात अशी त्याची समजूत होती. त्यानं विचारलं,

"आई, मी कधीं दारू घेतों? ही कसली शपथ मला घ्यायला लावतेस?"

राधाबाईनें त्याला एकदम आपल्या करपाशांत गोळा केलं, आणि त्याच्या मस्तकाचं चुंबन घेऊन म्हटलं,

"बाळ, मला काय वाटतं, अन् मी ही शपथ तुला कां घ्यायला लावतें, तें मला सांगतां यायचं नाहीं रे! अन् मी कितीही सांगितलं तरी तुला कळायचं नाहीं. पण येवढी भिक्षा घाल मला; मी सांगतें ती शपथ घे."

एवढं बोलून राधाबाई स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. तें पाहून राजाभाऊही ओक्साबोक्सी रडूं लागला. आणि त्या दोघांच्या रडण्यांतच तो विचित्र शपथविधि पार पडला.



# [ ३ ]

आपल्या लग्नाच्या बायकोला जितक्या ममतेनं पंजाबरावांनीं वागवलं होतं, तितक्याच ममतेनं ते राधाबाईला वागवीत होते. किंबहुना, तिचा आपला विधिपूर्वक विवाह झालेला नाहीं, ही गोष्ट त्यांच्या मनांत फारच क्वचित् येत असे, आणि त्यांचं तिच्याशीं होणारं वर्तन एखाद्या प्रेमळ पतीला साजेल असंच सदैव असे. इतकंच नव्हे, तर लग्नाच्या पत्नीशीं जें इमान त्यांनीं राखलं नव्हतं, ते पुष्कळच अंशानं राधाबाईशीं ते राखीत होते. या गोष्टीचा लोकांना तर अचंबा वाटलाच, पण स्वतः पंजाबरावानासुद्धां पुष्कळदां त्याविषयीं चमत्कार वाटल्यावांचून राहिला नाहीं; आणि त्याविषयीं स्वतःशीं विचार करतांना अखेर ते येवढंच म्हणत, 'वय झालं, कीं माणसाच्या वृत्तींतला उच्छृंखलपणा निवळतो म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं.' आणि पंजाबरावांच्या इमानीपणाचं कारण कांहींहि

असलं, तरी ऐवढं खरं, कीं राधाबाईशीं संसार करण्यांत ते सर्वस्वी सुखी झाले होते.

राधाबाईहि सर्वस्वी सुखी झाल्यासारखी दिसत होती ती सदैव आनंदांत असे. पंजाबरावांची सेवा करण्यांत, आणि राजाभाऊचं लालनपालन करण्यांत ती अगदीं मग्न झाली होती.

पण, माणसाच्या हंसतमुख चेहऱ्याची अशी गंमत आहे, कीं त्या चेहऱ्याआड लपलेल्या अंत:करणांत सुख आणि दु:ख किती आहे तें हमखास सांगण्याचं धाडस दुसऱ्या कुणी करूं नये हेंच चांगलं. कारण, तोंडावरच्या आनंदावरून ज्या अंत:करणांत सर्वतोपरी सुख भरलेलं आहे, असा तिऱ्हा-इतांचाच नव्हे, तर माणसाच्या प्रियजनांचाही आदमास असतो, त्याच अंत:करणांतली लपविलेली दु:खाची ऊर्मि केव्हां अन् कशी व्यक्त होईल त्याचा नेम नाहीं.

पंजाबराव समजत होते, कीं राधाबाई सर्वस्वी सुखी आहे. त्यांची तशी समजूत व्हावी अशीच तिची सारी वागणूक होती. तिला जेव्हां पहावं तेव्हां ती प्रसन्नवदनाच असे. एखादे वेळीं पहाटे जागं होऊन पंजाबराव जेव्हां शेजारी शय्येवर झोपलेल्या राधाबाईकडे दिव्याच्या प्रकाशांत न्याहाळून पहात, तेव्हांसुद्धां आनंदाच्या आणि समाधानाच्या छटांनींच तिची मुद्रा शोभत असल्याचं त्यांना आढळून येई. वास्तविक जें धाडसाचं कृत्य कोणाहि हिंदु स्त्रीच्या हातून सहसा घडणार नाहीं, तें राधाबाईनं केलं होतं. आत्यंतिक दु:खाला कंटाळून आणि सुखाच्या आशेनं का होईना, तिनं जें कृत्य केलं होतं तें धाडसाचं होतं खास. आपल्या लग्नाच्या नवऱ्याला सोडून एखाद्या रखेलीप्रमाणें ती पंजाबरावांच्या जवळ येऊन राहिली होती. तिच्याशीं संसार करण्यांत पंजाबरावांना स्वत:ला जरी अनाचाराची शंका पुसटपणानंसुद्धां कधीं आली नव्हती, इतकंच नव्हे, तर त्यांच्या अंगच्या बेपर्वाईच्या हौसेमुळं आणि लोक-मताचा विरोध जिंकण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळं जें कृत्य सामान्य नीति-नियमाप्रमाणें अपकृत्य ठरण्यासारखं होतं तेंच सत्कृत्य ठरावं अशा बुद्धीनं त्यांनीं जरी त्यांत आनंद मानला होता, तरी राधाबाईचीहि

वृत्ति त्यांच्याप्रमाणेंच रहावी हें संभवनीय नव्हतं; आणि या साऱ्या गोष्टी पंजाबरावांना कळत असल्यामुळं आपल्या आनंदाशीं राधाबाईदेखील तद्रूप झाली आहे असा जेव्हां जेव्हां त्यांना प्रत्यय येई, तेव्हां तेव्हां त्यांना विशेष सुख होत असे.

पण, फार वर्षं लोटलीं नाहींत, तोंच त्यांच्या या सुखदायक भरंवशाला धक्का बसला.

राधाबाईला क्षयाची भावना झाली, आणि पंजाबरावांनीं अगदीं उत्तमांतले उत्तम डॉक्टरी उपाय केले तरी तिचं तें दुखणं उत्तरोत्तर वाढतच गेलं.

आणि एके दिवशीं पंजाबरावांचा हात आपल्या अशक्त हातांत धरून ती त्यांना म्हणाली,

"मी आतां फार दिवसांची सोबतीण नाहीं."

पंजाबराव कांहींच बोलले नाहींत. त्यांनीं फक्त तिच्या हातावरून आपला दुसरा हात फिरवला.

ती पुढें म्हणाली,

"आतां माझा अंत जवळ आला आहे म्हणून आजपर्यंत जें मी कधीं आपल्याजवळ बोलून दाखवलं नाहीं, तें बोलून दाखवावंसं मला वाटतं. आपण रागावणार नाहीं ना? आपल्याजवळ एक मागणं मला मागायचं आहे. तें मागण्याचा मला अधिकार नाहीं. जे उपकार आपण माझ्यावर केले, तेंच फेडायसाठीं मला शतजन्म घ्यावे लागतील. जें सुख आपण मला दिलंत, तेंच माझ्या लायकीपेक्षां इतकं अधिक आहे, कीं मरणाच्या अखेरच्या घटकेला आपल्या मांडीला माझ्या अमंगल मस्तकाचा भार होईल ही कल्पनासुद्धां मला सहन करवत नाहीं. पण हें सारं कळत असूनसुद्धां आपल्याजवळ एक मागणं मागायसाठीं जीव घोंटाळतो. आपण रागावणार नाहीं ना?"

यावर पंजाबराव काय बोलणार? त्यांनीं फक्त डोळयांच्या सहाय्यानें तिला म्हटलं, "राधे, बोल ना तुला काय बोलायचं आहे तें."

राधाबाईनं कांहीं वेळ डोळे गच्च मिटून धरले. जणूं ती जें बोलली त्याचे तिला विलक्षण श्रम झाले होते. आणि नंतर डोळे उघडल्यावरही ती बराच वेळ पंजाबरावांच्याकडे अगदीं निरखून पहात राहिली. जणूं, पुढें जें बोलायचं तिच्या मनांत होतं, त्याच्या युक्तायुक्ततेबद्दल तिनं जरी यापूर्वी रुग्णशय्येवरच्या विचित्र एकान्तांत हजारदां विचार केला होता, तरी त्याचा निर्णय ती मनांतल्या मनांत पुन्हां एकदां करीत होती.

पंजाबरावांनीं तिच्या मस्तकावरून हात फिरवला व म्हटलं,

" बोल ना ! "

राधाबाई म्हणाली,

" जें बोलायचं तें कसं बोलावं मला नळत नाहीं. येवढंच मीं सांगितलं तर आपल्याला कळेल का, कीं माझ्या अभागी जन्मांत ज्याची अपेक्षा मीं स्वप्नांतसुद्धां केली नव्हती तें सुख आपल्या सहवासांत घेत असतां माझ्या मनांत खोल कुठं तरी पश्चात्तापाचा चटका मला सदैव लागत होता ? आपल्या संगतींत मला दुःख तिळमात्रही झालं नाहीं. पण, आपल्या घरांत पाऊल टाकतांना जें दुःख मीं आपल्या अंतःकरणांत माझ्याबरोबर आणलं होतं, तें तिथें सदा कायम होतं. कारण, कांहीं झालं तरी एखाद्या कुलटेसारखी मी तुमच्याजवळ राहिलें, हें मला कधीं विसरतां आलं नाहीं. कुलीन स्त्रीनं जें करूं नये तें मीं केलं, हें नित्य माझ्या मनाला खात होतं. तुमचा आश्रय इतका अलौकिक होता, कीं मीं जरी धडधडीत पापकर्म केलं, तरी लोकांचा तर राहोच, पण माझ्या पतीचासुद्धां उपसर्ग मला यत्किंचितही झाला नाहीं. केवळ सुखच माझ्या वांट्याला आलं. पण, इहलोकांत जरी मी सुखी झालें असलें, तरी परलोकांत मला किती भयंकर गति मिळेल याची मला नेहमीं भयंकर भीति वाटत आली आहे. आतां माझा मरणकाळ जवळ आल्यामुळं तर या भीतीखेरीज मला एकान्तांत दुसरी कसली सोबतच उरली नाहीं. म्हणून म्हणतें— "

इतकं बोलून राधाबाईनं जेव्हां डोळे मिटले, तेव्हां तिच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहूं लागल्या.

यावर काय बोलावं हें पंजाबरावांना कळेना. त्यांनीं फक्त आपल्या

बोटांनीं तिचीं आसवं पुसलीं, आणि त्यांच्या त्या स्पर्शानं बरं वाटून कीं काय कुणास ठाऊक, तिनं जेव्हां डोळे उघडून त्यांच्याकडे पाहिलं, तेव्हां त्यांनींही अत्यंत प्रेमाच्या व आर्जवाच्या दृष्टीनं तिच्याकडे पाहिलं. जणूं ते म्हणाले, " बोल ना राधे, काय बोलायचं असेल तें ! त्याला इतका संकोच कशासाठीं ? "

राधाबाई पुढें म्हणाली,

" म्हणून म्हणते, जें हें पाप माझ्या हातून घडलं–नाथ, पाप हा शब्द उच्चारला म्हणून रागावूं नका–त्याचं क्षालन करायसाठीं माझ्या हातून कांहीं तरी धर्मकृत्य घडावं अशी माझी इच्छा आहे. मला जें आपल्याजवळ मागायचं आहे तें हेंच. "

राधाबाई आणखी कांहीं बोलली नाहीं. ती फक्त भिजलेल्या डोळ्यांनीं पंजाबरावांच्याकडे पहात राहिली.

ते म्हणाले, " काय धर्मकृत्य करायची तुझी इच्छा आहे ? सांग."

" तें आपणच ठरवावं, मला सांगतां येत नाहीं. "

पंजाबराव कांहीं वेळ स्तब्ध राहिले व मग म्हणाले,

" राधे, तूं यत्किंचित चिंता करूं नकोस. हें बघ, जें सुख माझ्याकडून तुला मिळालं, त्यांत कोणत्याही तऱ्हेचं पाप नव्हतं असं माझं मन जरी स्पष्ट सांगत असलं, तरी तुलाही तसंच वाटलं पाहिजे असा आग्रह मी धरणार नाहीं. त्याबद्दल तुझी समजूत घालण्याचाही मी प्रयत्न करणार नाहीं. तुझ्या मनाला मरणापूर्वी पूर्ण शांति मिळावी अशी काळजी घेणं मी माझं कर्तव्यच समजतो. तुझ्या मनाच्या शांतिसाठीं जें धर्मकृत्य करायचं, तें लहानसहान असतां कामा नये. ज्या पुरुषाच्या सहवासांत तुझ्या हातून पापाचरण घडलं, त्याच्या मोठेपणाला साजेलसंच तें धर्मकृत्य असलं पाहिजे. म्हणून मी असं ठरवतो, कीं ज्या गांवांत तूं दुःखाचा संसार केलास, आणखी ज्या गांवचे लोक तुला मोठी पतिव्रता म्हणून पूज्य समजत आले, त्या गांवाच्या सीमेवर एक मोठं शिवमंदिर अन् धर्मशाळा बांधायची. यासाठीं मी पन्नास हजार रुपये खर्चीन, अन् तुझ्या डोळ्यांनीं तुला तें

मंदिर आणि धर्मशाळा पाहतां यावी अशा जलदीनं बांधकाम सुरू करीन."

आणि पंजाबरावांनीं खरोखरच त्याप्रमाणें केलं.

कल्पनातीत तातडीनं आणि पाण्यासारखा पैसा खर्च करून त्यांनीं शिवमंदिर आणि धर्मशाळा बांधून पुरी केली.

या धर्मशाळेंतच राधाबाईचं देहावसान झालं.

तिच्या मरणापूर्वी जेव्हां एकदां राजाभाऊ एकटाच तिच्याजवळ होता, तेव्हां ती त्याला म्हणाली,

" बाळ, मी मेल्यावर माझी आठवण तुला राहील का रे ? "

राजाभाऊ म्हणाला,

" तुझी आठवण कधीं बुजणं शक्य आहे का ग ? आई—"

" अहाहा ! तूं मला आई म्हणून हांक मारलीस कीं मला किती सुख होतं म्हणून सांगू ? पुन्हां एकदां तशी हांक मार. "

" आई ! "

तिनं त्याला पुढें बोलूं दिलं नाहीं. त्याला घट्ट जवळ धरलं अन् कांहीं वेळ सोडलं नाहीं. आणि जेव्हां तिनं त्याला आपलं मस्तक दूर करूं दिलं तेव्हां ती त्याला म्हणाली,

" बाळ, तूं फार मोठा होणार आहेस; हो ना ? पुष्कळ मोठा झालास म्हणजे कदाचित् माझा विसर पडेल तुला. पडला तर तें साहजिकच होईल. अन् खरंच सांगतें, मला विसरलास तरी चालेल, पण मी तुझ्याकडून एकदां जी शपथ घेववली आहे ती मात्र विसरूं नकोस हं. "

यानंतर थोड्याच दिवसांनीं राधाबाईचं प्राणोत्क्रमण झालं. राजाभाऊनं आपल्या जन्मांत पाहिलेलं मृत्यूचं तें पहिलंच दृश्य होतं. तो तिच्या अंथरुणाजवळच होता. तिला खोकल्याची मोठी ढास आली, त्यामुळं थकून तिनं उशीवर डोकं टाकलं, तें टाकतां टाकतां आपल्याकडे व आपल्या वडिलांकडे भेसूर दिसणाऱ्या डोळ्यांनीं पाहिलं, आपल्या वडिलांना तिनं कसलीशी खूण केली, त्यांनीं झटकन् पुढें सरकून तिचं मस्तक आपल्या मांडीवर घेतलं,

आणि दुसऱ्याच क्षणाला तिचे डोळे मिटले, व आपल्या वडिलांनीं खालचा ओंठ दाबून आवंढा गिळला, या गोष्टी त्यानं पाहिल्या. त्याला रडूं तर कोसळलंच, पण मृत्यूच्या क्रियेचा विलक्षण चमत्कार वाटून त्याच्या वृत्ती एक प्रकारें सुंदही झाल्या. एका क्षणापूर्वी माणसाच्या देहांत असलेला जीव दुसऱ्याच क्षणीं जातो ? पार नाहींसा होतो ? नाहींसा होतो म्हणजे त्याचं होतं तरी काय ?......

त्याला समजेना !

# [४]

राधाबाईच्या मृत्यूनंतर कित्येक दिवसपर्यंत पंजाबराव घराबाहेर पडले नाहींत. त्यांच्या मनांतला शोक कमी होईना. राधाबाईच्या मृत्यूनं आपल्या अंत:करणाला येवढा धक्का बसेल अशी त्यांची कल्पना नव्हती. आपली पहिली पत्नी वारली तेव्हांप्रमाणेंच फार तर आठ पंधरा दिवस राधाबाईच्या मृत्यूचं दु:ख आपल्याला होईल, आणि नंतर आपल्या मनाचा उत्साह परत येईल असं त्यांना वाटलं होतं. पण तसं झालं नाहीं. याचं कारण असं असेल, कीं त्यांचं आतां वय झालं होतं; आणि कोणत्याही दु:खाचा तडाखा तारुण्यांतल्यापेक्षां वय झाल्यावर माणसाच्या मनाला अधिक जाणवतो. किंवा याचं कारण कदाचित् असंही असेल, कीं एखाद्याच्या नीतिबाह्य प्रेमांत उत्कट काव्याचा अंश जरी नसला तरीसुद्धां विहित प्रेमापेक्षां माणसाला नकळत तें त्याच्या अंत:करणांत अधिक खोल जाऊन

बसतं, आणि त्यामुळं त्या प्रेमाची वस्तु नष्ट होतांच जी जखम होते तीहि अधिक खोल असते.

तें कसंही असलं तरी येवढं खरं, की राधाबाईच्या मृत्यूचं दुःख आपल्या मनांतून लवकर नाहींसं होणार नाही अशी पंजाबरावांना भीति वाटूं लागली.

शेवटीं आपल्या कामांत सतत लक्ष घातल्याखेरीज आपली चित्तव्यग्रता कमी होणार नाहीं असं वाटून पूर्वी कित्येक वर्षांत केलं नव्हतं इतकं वकिलीचं काम पंजाबराव करूं लागले.

यायोगानं त्यांच्या अंतःकरणांतलं दुःख खरंच कमी झालं; पण त्यांना ज्याची कल्पना नव्हती असाही त्याचा दुसरा एक परिणाम झाला.

राजाभाऊकडे त्यांचं लक्ष मुळींच राहिलं नाहीं.

सबंध सकाळभर ते अशिलांच्या गराड्यांत बसलेले असत; दुपारपासून संध्याकाळपर्यंतचा त्यांचा सारा वेळ कोर्टांत जात असे; आणि संध्याकाळनंतर तर त्यांच्या खोलींत कुणीच जाऊं शकत नसे.

राजाभाऊ त्यांच्या घरांत रहात असे येवढंच; बाकी त्यांच्याशीं त्याचा संबंध महिन्याच्या प्रारंभीं फीसाठीं किंवा कपड्यालत्त्यासारख्या आवश्यक गोष्टी-साठीं पैसे मागण्यापुरता येई तेवढाच.

ते व त्यांचा मुलगा आपापल्या भिन्न जगांत वावरत होते.

पण अशा प्रकारें दोन वर्षं गेल्यावर एक दिवस पंजाबरावांना राजाभाऊ-विषयींच्या स्वतःच्या कर्तव्याची जाणीव एकदम तीव्रतेनं व्हावी अशा गोष्टी घडल्या.

त्यांचे एक स्नेही 'बार'रूममध्यें त्यांना म्हणाले,

" पंजाबराव, आपल्या मुलाला खांसाहेब करायचं ठरवलं आहे वाटतं तुम्ही ? "

कांहींसं गोंधळून पंजाबरावांनीं विचारलं,

" म्हणजे ? तुम्ही असं कां विचारतां ? "

" कां म्हणजे ? तशीं लक्षणं दिसताहेत म्हणून विचारतों. "

" लक्षणं ? तीं काय बुवा ? "

" वा ! जसं कांहीं तुम्हांला माहितच नाहीं कांहीं ! आमचा मुलगा त्याच्याच शाळेंत जातो तो मला सांगत होता, कीं परवांच्या त्यांच्या गॅद-रिंगच्या नाटकांत तुमच्या राजानं अतिशय सुंदर काम केलं, अन् उत्तम गाण्याबद्दल बरींचशीं पदकं मिळवलीं. अन् मिळवलीं असलीं तर कांहीं आश्चर्य नाहीं. आमच्या शेजारीं ते खांसाहेब आहेत ना ? त्यांच्याकडे रात्रंदिवस असतो तुमचा राजा. ते फार खुष आहेत म्हणे त्याच्यावर. ते म्हणे म्हणतात, कीं आणखी पांचदहा वर्षं राजाला तालीम पोंचली तर मोठा नामांकित गवई होईल तो. म्हणून विचारलं तुम्हांला."

यावर पंजाबरावांनीं त्या गृहस्थांना कांहीं तरी उत्तर दिल्यासारखं करून त्यांचं तें बोलणं थांबवलं; परंतु, स्वतःच्या मनाशीं मात्र आज दोन वर्षांत त्यांनीं कधीं केला नव्हता असा आपल्या लेकाविषयीं ते विचार करूं लागले.

आणि तो विचार करूं लागतांच त्यांच्या एकदम लक्षांत आलं कीं, आपल्याला आपल्या लेकाविषयीं खरोखरच फार थोडी माहिती आहे. राधाबाई घरांत होती तेव्हां एक तर सख्ख्या आईप्रमाणं ती त्याची सर्व प्रकारची काळजी घेत होती, अन् शिवाय आपला मुलगा दिवसाकाठीं दहा वेळां आपल्या दृष्टीसही पडत असे. त्याचा व आपला संबंध त्यावेळीं पुष्कळच निकट होता. पण गेल्या दोन वर्षांत तो संबंध जवळ जवळ नष्ट झाला होता. त्याची आपली गांठभेट फार क्वचित् पडत होती, त्या स्नेह्यानं सांगितलं त्याप्रमाणें त्या खांसाहेबाच्या नादीं तो लागलेलाही असेल. तसं असलं तर......?

तर तें चांगलं कीं वाईट, अन् वाईट असलं तर त्याबाबत आपण काय उपाय केला पाहिजे याविषयीं पंजाबरावांच्या मनाचा निश्चय होण्यापूर्वीच ते कोर्टांतून घरीं येऊन पोंचले.

ते पोंचले तों एक गृहस्थ त्यांची वाट पहात दिवाखान्यांत बसले होते.

त्यांना पाहतांच राजाभाऊच्या शाळेचे ते हेडमास्तर असल्याचं पंजाब-रावांच्या लक्षांत आलं, व ते त्यांना म्हणाले,

" काय मास्तर ? "

हेडमास्तर म्हणाले,

" आपणाला दोन वेळां चिठी पाठविली कीं एकदां शाळेंत येऊन जा—"

" मास्तर, मला खरोखरच अगदी सवड नाहीं आतांशीं. "

" हो; म्हणूनच शेवटीं मी आलों आपल्या भेटीला. काम जरा महत्त्वाचं आहे. "

" काय, शाळेसाठीं पुन्हां फंड जमवतां काय ? "

" नाहीं; तसलं काम नाहीं. पण आपले चिरंजीव राजाभाऊ–त्यांच्या बद्दल जरा बोलायचं आहे. "

" असं ? तें काय ? "

" गेल्या तिमाही, सहामाही परिक्षांत नापास झाला आहे तो. वर्गांत रोज हजरही नसतो. तेव्हां म्हटलं, आपल्या कानावर एकदा गोष्टी घालाव्या. "

" वर्गांत हजर नसतो ? मग असतो कुठें ? "

" तें मला नक्की माहित नाहीं. पण असं ऐकतों, कीं तो कुणा खांसाहेबांच्या घरीं—"

" असं असं; समजलों. मी बंदोबस्त करतों हं. बरं झालं मला तुम्ही सांगितलंत. बरं, तुम्ही काय घेणार मास्तर ? चहा का कॉफी ? "

हेडमास्तर प्रथम 'नको नको' म्हणाले, पण नंतर त्यांनीं कॉफी घेतली व कांहीं वेळानें पंजाबरावांचा निरोप घेतला.

ते गेल्यावर पंजाबरावांनीं नोकराला हांक मारली, व राजाभाऊला बोलवायला त्याला सांगितलं.

राजा येतांच पंजाबरावांनीं विचारलं,

" काय रे, तुझा अभ्यास कसा काय चाललाय ? "

" चांगला नाहीं चाललेला ! "

राजाच्या त्या उत्तरानं पंजाबराव थोडेसे चकित झाले. तो असं सरळ, स्पष्ट, खरं उत्तर देईल अशी त्यांची कल्पना नव्हती.

त्यांनीं पुढें विचारलं,
" कां नाहीं चांगला चालला अभ्यास ? "
" माझ्याच्यानं होत नाहीं. "
" कां ? "
" माझं लक्ष लागत नाहीं. "
" परीक्षांत सारखा नापास होतो आहेस ? "
" हो. "
" मग तुझा बेत काय आहे ? "
" मला गाणं शिकायचं आहे. "

तें त्याचं उत्तर ऐकतांच पंजाबराव एकदम संतापले, व ओरडले, " गाणं शिकायचं आहे ? कांहीं शरम नाहीं वाटत तुला ? तुझा अभ्यास सुरळीत चालला असेल, पुढच्या वर्षी तूं मॅट्रिक होशील, चार वर्षांत कॉलेजचं शिक्षण संपवशील, मग मी तुला विलायतेस धाडीन असे मी मनाशीं बेत करतों आहे, आणखी तूं सहाव्या यत्तेतच नापास होणार ? वाटत नाहीं तुला कांहीं ? तूं कुणाचा मुलगा, तुझा सामाजिक दर्जा काय, आपल्या कुळाची इभ्रत काय, हें सगळं विसरलास वाटतं ? पंजाबराव सरंजाम्यांचा मुलगा नाटक्या अन् गाणारा निघाला, असं लोकांनीं म्हटलं तर मोठं भूषण वाटेल नाहीं तुला ? "

" दूषण कांहीं वाटणार नाहीं ! "

राजाच्या त्या धीट व स्पष्ट उत्तरानं पंजाबराव चांगलेच चमकले. त्यांनीं त्याच्याकडे निरखून पाहिलं.

त्याच्या वयाच्या मानानं तो चांगला उंच दिसत होता, हाडापेरानं दांडगा होणार असंही दिसत होतं. बापाची शरीरसंपत्ति त्याच्यात उतरली होती. बापाची निर्भयता आणखी बेदरकारपणाही त्याच्या ठिकाणीं आला

होता काय ? त्याचा चेहरा मोठा रेखीव दिसत होता. आईचं सौंदर्य त्याच्या वांट्याला आलेलं होतं. अगदीं थेट तिच्यासारखेच त्याचे नाकडोळे आतां स्पष्ट दिसूं लागले होते. त्याचे ते ओंठ तर अगदीं तिचेच ओंठ होते......

पण या विचारांना पंजाबरावांनीं अधिक सवड दिली नाहीं. आपल्या संतापाची ऊर्मि कमी होऊं देण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांनीं ओरडून विचारलं,

" काय म्हणालास ? दूषण वाटणार नाहीं ! "

" नाही ! "

" कारण ? "

" कारण गाण्यावर माझं विलक्षण प्रेम आहे ! अन् त्यांत मी नांव मिळवीन असं मला वाटतं. गाणं ही तरी एक विद्याच आहे. त्यांत मी नांव मिळवलं तर लोकांनीं मला नावं कां ठेवावीं ? "

हा प्रश्न बिनतोड होता, आणि त्यामुळें पंजाबराव अधिकच संतापले. मग त्यांनीं अतिशय कठोर बोलण्यास प्रारंभ केला. चारपांच मिनिटं ते सारखे उच्च स्वरानं बोलत राहिले. शेवटीं ते म्हणाले,

" मला तुझा हा गाण्याचा नाद बिलकूल पसंत नाहीं. तो मी तावडतोब बंद करायचा म्हटला तर मला बंद करतां येणार नाहीं असं का तूं समजतोस ? "

" तुम्ही माझे वडील आहांत तेव्हां करतां येईल तुम्हांला. पण, तुम्हीं तसं केलंत तर माझे प्राणच तुम्हीं घेतलेत असं मला वाटेल ! मला मनस्वी दुःख होईल ! "

" म्हणजे मॅट्रिकच्या परीक्षेचा तुझा मुळीं विचारच नाहीं, असं होय ? "

" मी पास होणं शक्य नाहीं, अन् म्हणून मी तिचा विचारच करीत नाहीं. "

हें सांगतांना राजानं आपली नजर खालीं जमिनीकडे केली, त्याच्या स्वरांतली मघांची निर्भयता या शब्दांत नव्हती. परीक्षा पास होणं आपल्याला अशक्य वाटतं हें कबूल करतांना त्याला मोठासा अभिमान वाटत नव्हता असं दिसलं.

पंजाबरावांनीं क्षणभर त्याच्याकडे टक लावून पाहिलं. साक्षीदाराची उलट तपासणी करण्यांत आयुष्य घालविलेल्या त्यांच्यासारख्या वकिलाला दुसऱ्याच्या मनांतल्या विचारछटा ओळखून आपलं बोलणं कसं बदलावं ही विद्या पूर्ण हस्तगत झालेली असते. ते म्हणाले,

"राजा, हें तूं काय बोलतोस ? अरे यःकश्चित् मॅट्रिकच्या परीक्षेची तुला भीति वाटते ? ती पास होणं शक्य नाहीं म्हणून तूं खुशाल कबूल करतोस ? अरे, किती अडचणीतून मार्ग काढून अन् परिस्थितीशीं कसं कसं झगडून मीं विद्या केली हें तुला माहीत नाहीं ? माझीच गोष्ट कशाला, आजही तुझ्याच वर्गांत अशीं दोन चार मुलं खचित असतील, कीं जीं मधुकरीच्या चतकोर भाकरीवर आपली भूक कशीबशी भागवीत असतील, रात्रीं अभ्यास करतां यावा म्हणून दिव्यासाठीं लागणाऱ्या तेलाची कुणाजवळ तरी भीक मागत असतील, अन् विद्या करीत असतील. मॅट्रिक झालं कीं स्वर्ग हातीं येईल असं मलाही वाटत नाहीं. उलट, ही परीक्षा म्हणजे पोरखेळ आहे अशीच माझी समजूत आहे. पण म्हणूनच तुझ्यासारख्या मुलाला ती परिक्षा म्हणजे केवळ हातचा मळ वाटला पाहिजे असं मी म्हणतों. तुला काय कमी आहे ? पैसा आहे, सुखसोयी आहेत, अभ्यासासाठीं जें जें मागशील तें तें द्यायला मी तयार आहे. अन् असं असूनही तूं आपल्या मनाला खुशाल कच खाऊं देतोस ? गाणं ही एक विद्या आहे, आणखी ती प्राप्त करून घेण्याचा हव्यास तुझ्यासारख्या मुलानं धरावा किंवा नाहीं, तसं करण्यांत कांहीं बहादुरी आहे कीं नाहीं हा प्रश्नच आपण सध्यां सोडून देऊं या. त्यांत बहादुरी असेल किंवा नसेल. पण, खुळ्यासारखा यःकश्चित् परीक्षेला भिऊन तूं पळ काढावास यांत मात्र बहादुरी खचित नाहीं. हा भेकडपणा आहे. माझा मुलगा कसाहि निघो,पण माझ्या दृष्टीनें तो भेकड निघाला तर मला मरणप्राय दुःख होईल. तुला आवाजाची निसर्गदत्त देणगी असेल, गाण्याची आवड तुझ्या अंगीं असेल तर त्या गोष्टींचा तूं उपयोग करूं नकोस असं नाहीं मी म्हणत. पण आपल्या

अंगच्या गुणांचा विकास करतांना माणसानं तारतम्य सोडतां कामा नये. भेकडपणा तर कधींच पदरीं घेतां कामा नये. पंजाबरावांच्या मुलाला शाळेंतली एक परीक्षासुद्धां देतां आली नाहीं असं जगाला म्हणूं दे काय ? अन् तें ऐकण्याचं दुःख माझ्यासारख्या मानी माणसाला मोसवेल असं तुला वाटतं काय ? अगदींच कसा तूं भेकड झालास ? तुझ्या अंगीं महत्वाकांक्षा नाहीं ? बाणेदारपणा नाहीं ? पीळ नाहीं ?—"

बापाचं हें सारं बोलणं ऐकतांना राजाच्या मनाची काय काय चलबिचल होत चालली होती कुणास ठाऊक ? तो एकदम वर मान करून म्हणाला,

" बाबा, मी तुम्हांला आश्वासन देतों, कीं मी मॅट्रिक पास होईन. आतां तर तुम्हीं निश्चित व्हाल ना ? "

पंजाबरावांनीं त्याच्याकडे पाहून हास्य केलं, त्याच्या पाठीवर थाप मारली, आणि म्हटलं,

" शाबास ! तूं माझा बच्चा आहेस खरा ! पण बेटा, परिक्षेचा अभ्यास झटून करायचा झाला, तर गाण्यावरचं लक्ष तुला आजिबात काढून घेतलं पाहिजे. "

राजानं खालचा ओंठ चावल्यासारखं केलं आणि म्हटलं,

" होय ! तें काढून घ्यायचंच मीं ठरवलं आहे. "

" निदान दोन वर्षं तरी—"

" दोन वर्षंच का ? कायमचाच सोडीन मी त्याचा नाद. माझा जीव गाण्यासाठीं किती भुकेला आहे तें मला कुणाला समजावून सांगतां यायचं नाहीं. पण ती भूक शमवायसाठीं मी दुसरा जन्म घेईन ! किंवा या जन्मीं पुढें केव्हां तरी—पुष्कळ पुष्कळ वर्षांनीं—पण जाऊं दे तें. सध्यां मी तुम्हांला येवढंच आश्वासन देतों, कीं तुमच्या दृष्टीनं जो मोठेपणा आहे तो मी मिळवून दाखवीन. तोही मला मिळवितां येईल. तुम्हांला सुखी केलं पाहिजे मला. मी करीन ! माझं गाणं आजिबात संपलं असं मी समजेन. खांसाहेबांच्या घराची पायरी मी पुन्हां चढणार नाहीं ! "

आणि खरोखरच त्या दिवसापासून राजाभाऊनं गाणं आणि खांसाहेबांचं घर वर्ज्य केलं.

त्याचा निश्चय तो पाळीत आहे हें पाहून पंजाबरावांना आनंद झाला. तो निश्चय पाळायसाठीं त्याला आपल्या अंतःकरणांतल्या वृत्तींशीं कसं झगडावं लागत होतं हें त्यांना ठाऊक असतं, तर लेकाबद्दल त्यांना अभिमान आणि आदरही वाटला असता.

पण, पंजाबरावांच्या दृष्टीला दिसत नसलं तरी राजाच्या अंतर्यामीं मोठं युद्ध चाललं होतं हे कांहीं खोटं नाही.

ज्या त्याच्या जीवितप्रवासांत अंतःकरणांतील विविध भावनांच्या समराचे प्रसंग पुनःपुन्हां यायचे होते, त्यांतलं हें पहिलं युद्ध होतं! आणि या युद्धाच्या वेळीं राजानं जो मनोनिग्रह दाखविला तो अपूर्व होता.

त्यानं गाण्याच्या वह्या फेकून दिल्या, खांसाहेबाच्या घरीं जावं, निदान त्यांचं गाणं ऐकावं, त्याच्याहून दोनच वर्षांनीं लहान असलेली खांसाहेबांची मुलगी जुलिया हिच्याशीं दोन शब्द बोलून परत यावं, अशी अंतःकरणांत पुनःपुन्हां उसळणारी ऊर्मि त्यानं दाबली, आणि शाळा व घर यांखेरीज बाकीचीं सारीं स्थळं वर्ज्य केलीं.

खांसाहेबांनी त्याला पुष्कळ निरोप पाठविले. 'तूं येत नाहींस म्हणून जुलियाही तालीम घ्यायला बसेनाशी झाली आहे! कृपा कर, अन् तिच्यासाठीं तरी ये' असं खांसाहेबांनीं दहादां सांगून पाठवलं; पण राजानं आपल्या मनाचा निश्चय कायम ठेवला. तो गेला नाहीं.

असं वागणं त्याला अतिशय क्लेशकारक होत होतं. तो व जुलिया दोघंही बालवयाचींच होतीं, तेव्हां त्यांच्यात अनुराग उत्पन्न झालेला असणं शक्यच नव्हतं. पण, अनुरागाचे रंग ज्यांत मिसळलेले नाहीत असं बालवयांतलं प्रेम विलक्षण मधुर असतं, आणि तें जितकं मधुर असतं तितकंच तें तोडल्यानं हृदयाला होणारं दुःख असह्य असतं.

पण, राजानं मोठ्या धीरानं तें सहन केलं.

कांहीं दिवसांनी त्याला कळलं, कीं खांसाहेब आपल्या कुटुंबासह आपल्या मुलखाकडे निघून गेले असून पुण्यास पुन्हां येतील किंवा नाहीं

त्याचा नेम नव्हता. जयपूरकडे अत्रोली नांवाच्या गांवीं त्यांची थोडी जमीन व रहातं घर होतं, व त्यांचे वृद्ध वडील तिथें रहात असत. खांसाहेब फार वर्षांपूर्वी इकडे दक्षिणेंत आले होते व एका नायकिणीशीं निका लावून त्यांनीं संसार थाटल्यामुळें त्यांच्या वडिलांचा त्यांच्यावर रोष होता. वडिलांना भेटण्याची त्यांना सोय नव्हती. पण त्यांचे वडील एकाएकी फार आजारी झाल्याची तार आली. म्हणून खांसाहेब तिकडे गेले होते, व आतां ते कदाचित् कायमचेच तिकडे रहाणार होते.

खांसाहेब व आपली मैत्रीण जुलिया आतां या जन्मांत कदाचित् आपल्या दृष्टीला पुन्हां दिसणारही नाहींत या कल्पनेनं राजाचं अंत:करण अतिशय शोकाकुल झालं. राधाबाईच्या मृत्यूच्या दिवशीं त्याच्या मनाची जी अवस्था झाली होती तिचा अनुभव त्याला पुन्हां आला. पण त्याच्या मनांत असंही आलं, एक प्रकारें बरं झालं, एक पाश कायमचा तुटला; आतां निराळ्या मार्गानं जो प्रवास करायचं आपण ठरवलं आहे तो अधिक निर्वेध-पणानं होईल.

* * *

दुसऱ्या वर्षी राजा मॅट्रिकची परीक्षा पास झाला.

तो कॉलेजांत गेला आणि अतिशय हुशार विद्यार्थी म्हणून तो नांव-लौकिक मिळवणार अशीं चिन्हं दिसूं लागलीं.

याच सुमारास टिळक मंडालेच्या कैदेंतून सुटून परत आले. ते आपल्या घरीं गायकवाडवाड्यांत येऊन पोंचले तेव्हां पहांटेचा प्रहर होता. पण, एका मित्रानं ती बातमी येऊन सांगतांच पंजाबराव धांवत टिळकांच्या घरी गेले, आणि निवडक मित्रमंडळींचा गराडा त्या असामान्य देशभक्ताभोंवतीं जमला होता त्यांत सामील होऊन इतर सर्वांप्रमाणेंच त्यांनीही आपल्या गहिंवराला अश्रुरूपानं वाट दिली.

टिळकांनीं विश्रांति घेतली नाहीं. हातपाय हालविण्यास लगेच सुरवात केली. अर्थात् चळवळीसाठीं त्यांना पैशाची गरज होती. पंजाबरावांनीं पुन्हां निमूटपणें चाळीस हजार रुपये दिले. ते देतांना त्यांनी सांगितलं, " माझ्या-जवळ असलेली सारी रोख रक्कम मी देतों आहें. सोलापूरला नवीनच

निघालेल्या बँकेंत माझे पन्नास हजारांचे शेअर आहेत, तेवढी संपत्ति मला आणखी माझ्या मुलाला रगड होईल. बाकीचा माझा सर्व पैसा मी देशकार्यासाठीं देतों."

पुढे त्यांच्यासाठीं जें दुर्दैव वाढून ठेवलं होतं, त्याची पंजाबरावांना कल्पना नव्हती म्हणून ते तसं बोलले.

पण, माणसाला आपल्या दुर्दैवाची चाहूल लागलेली नसली, तरी तें क्रमानं पावलं टाकीत येतच असतं.

पंजाबरावांचं दुर्दैवही याप्रमाणं त्यांच्यावर कोसळल्यावांचून राहिलं नाहीं.

एके दिवशी सोलापूरची बँक बुडाली !

पंजाबराव एकदम निष्कांचन झाले !

राहत्या वाड्याखेरीज त्यांच्याजवळ कमलेंही धन उरलं नाहीं !

चमत्कार असा, की ज्या पंजाबरावांनीं आपल्या आयुष्यांत याहूनहि मोठाले धक्के बेदरकारपणानं सोसले होते त्यांना हा आघात सोसवला नाहीं.

ते आजारी पडले, आणि त्या आजारांतून ते उठतील असं चिन्ह दिसेना.

एके दिवशीं राजाला ते म्हणाले,

" राजा, आतां लवकरच जाणार मी !"

" बाबा—"

या एका शब्दापलीकडे राजाला कांहीं बोलवेना.

लवकरच मृत्यूचा दुसरा प्रसंग आपल्याला पहावा लागणार हें त्याला स्पष्ट दिसत होतं.

पंजाबराव म्हणाले,

" राजा, आयुष्यांतल्या इतर सुखदुःखांचं कांहींहि असो, पित्याला अखेरच्या क्षणाला एकाच खात्रीचं सुख हवं असतं. आपल्या हयातींत आपल्या मुलाचं शक्य तें कल्याण आपण केलं, आणि आपल्या पश्चात् आपला मुलगा सुखांत राहील येवढी खात्री वाटली—"

त्यांचा हात दाबून राजा चटकन् म्हणाला,

" बाबा, ही खात्री पूर्ण असूं द्या तुम्हांला."

" पण राजा, आतां तुझ्या मालकीची एक पैसुद्धां राहिलेली नाहीं. पैशाच्या अभावीं या आयुष्याच्या वाटेचा प्रवास मोठा दु:खाचा होतो हे मनांत येऊन जिवाची तळमळ होते रे तुझ्यासाठीं!"

" बाबा, हा क्षुद्र विचार कशाला करतां? जीविताच्या या प्रवासांत कुणीच कुणाला कायमची शिदोरी बांधून देऊं शकत नाहीं. ज्या त्या माणसाच्या अंत:करणांतल्या जन्मजात भावना आणि प्रेरणा हीच काय तीं मानवी प्रवाशाची खरी शिदोरी असते. त्याचा प्रवास कोणत्या मार्गानं होणार, तो सुखाचा होणार कीं दु:खाचा होणार या साऱ्या गोष्टी त्या भावनांनीं आणखी प्रेरणांनीं निश्चित होत असतात. मी सुखांत राहीन, मोठा होईन. निदान माझ्या हातून क्षुद्र कृत्य कधीं घडणार नाहीं येवढी खात्री ठेवा."

विलक्षण शहाणपणाचे शब्द बोलणाऱ्या आपल्या अठरा एकोणीस वर्षांच्या तरुण मुलाकडे पंजाबरावांनीं मोठ्या कौतुकानं पाहिलं. त्याच्याकडे खूप पहावं असं त्यांना वाटलं. पण, समाधानाच्या अश्रूंचा लोट त्यांच्या नेत्रांतून वाहूं लागला, आणि त्यांची दृष्टि अवरुद्ध झाली.

यानंतर थोड्याच दिवसांनीं पंजाबरावांचं प्राणोत्क्रमण झालं.

सरंजाम्यांच्या कुळांतल्या एका पुरुषाचा या जीवितपथावरचा प्रवास संपला!

दुसरा पुरुष आधींच मार्गाला लागला होता, त्याचा प्रवास पुढें सुरू झाला!

---

[५]

१९१७ सालच्या ऑगस्ट महिन्यांतील दुसऱ्या मंगळवारीं तिसऱ्या प्रहराच्या सुमारास राजा सरंजामे मुंबईस 'एम्पायर' हॉटेल-मधल्या एका खोलींत कॉटवर पडून मधेंच डोळे मिटून झोपण्याचा प्रयत्न करीत होता, व मधेंच डोळे उघडून कडीपाटाकडे बघत रहात होता.

खोलीतली दुसरी कॉट रिकामी होती. राजानं ती सबंध खोली दोन दिवसांसाठीं घेतली होती. खोलीचं दार अर्धवट उघडंच होतं; व त्यामुळें समोरच्या खोलीतली गडबड आणि बडबड राजाच्या कानीं क्रमी अधिक स्पष्ट-पणानं पुनःपुन्हां येत होती.

प्रथम सोडालिंबूच्या बाटल्या फोडल्या गेल्याचे आवाज ऐकूं येऊन तो आपल्या वामकुक्षींतून जागा झाला होता. त्यानंतर चहाच्या कपबशांच्या खळखळाटानं त्याच्या झोपेंत पुन्हां एकदां व्यत्यय आला होता. आणि

आतां त्यानं निद्रेचा प्रयत्नच न करण्याचं ठरवलं तेव्हां समोरच्या खोली-तल्या भाषणांचे, उद्गारांचे व गाण्याच्या लकेरींचे तुकडे त्याला ऐकूं येऊं लागले.

"बाप्या, किती वेळ दाढी करतो आहेस ?"

"कां तुझे गाल हुळहुळे झाले कीं काय ?"

"तसं नाहीं पण मला तुझा आरसा हवा आहे !"

हंशा !......

"अहो जोशीबुवा, जरा बॉयला ओरडा हो. माझा बूट नेला आहेन् लेकाच्यानं पॉलिश करायला तो अजून......"

दाराच्या फळीचा आवाज.

"ए सावळ्या ! बॉय ! च्यायला..."

"सहजचि करि मन हे ऽ ऽ ऽ वे ऽ ऽ ऽ डे..."

[ त्या वेळीं लोकप्रियतेच्या ऐन भरांत असलेल्या 'स्वयंवर' नाटकांतील रुक्मिणीच्या एका पदाचा एक चरण होता हा हें राजानं ओळखलं. ]

"अहाहा ! क्या बात है ! बाळ्या, पुन्हां घे तान."

"हे ऽ ऽ ऽ वे ऽ ऽ ऽ डे ऽ ऽ ऽ सुजन कसा..."

"अहाहा !"

"उद्यां कोणतं नाटक आहे रे गंधर्वाचं ?"

"मूकनायक !"

"छी: ! मग स्वयंवर केव्हां ? शनिवारीं ? ऑल् राइट् ! राहूं तंवर. होतील दहा-पंधरा रुपये जादा खर्च. पण झाले तर झाले. आपल्या बापाचेच होतील."

हंशा !......

"अरे लेको, आटपा, घड्याळ पहा जरा."

"अरे बापरे, खरंच कीं ! ए मला जरा हा टाय बांधून दे रे !"

"सुजन कसा मन चोरी ऽ ऽ ऽ री"

"ए बाळ्या, गाणं बस कर. तुला युनिव्हर्सिटींत यायचं आहे कीं नाहीं?"

समोरच्या खोलींतले हे संवाद व आलाप ऐकतां ऐकतां राजाच्या मनांत कोणते विचार येत होते तें सांगणं थोडसं कठीण आहे.

एक तर त्याला आश्चर्य वाटत होतं, कीं या सर्व मंडळींनी इतक्या आनंदभरांत कां असावं? त्यांचं कोणतं असं मोठं भाग्य उघडलं होतं? आज संध्याकाळीं युनिव्हर्सिटींत पदवीदानसमारंभ व्हावयाचा होता, व पदवींची परीक्षा पास झालेल्या या मंडळींच्या हातीं चिवट कागदाचीं भेंडोळीं पडणार होतीं हें खरं, पण यांत या मंडळींना येवढा उत्सव कसला वाटतो आहे? यांच्या हातून असा कोणता मोठा पराक्रम घडला कीं, यांनीं बेबंद बोलावं, गावं आणि हंसावं? हे बी. ए. पास झाले हाच? या 'एम्पायर' हॉटेलचे मालक तर काल सांगत होते कीं त्यांच्या मॅनेजरच्या हाताखालीं एक बी. ए. इसम पस्तीस रुपयांवर कारकुनाचं काम करतो आहे!......

पण पुन्हां राजाच्या मनांत येई, अज्ञानानं का होईना पण समोरच्या खोलींत उतरलेली ही तरुण पदवीधर मंडळी आनंदांत म्हणजे एक प्रकारानं सुखी आहेत असंच म्हटलं पाहिजे. पुढचा विचार करून मगच आजच्या गोष्टींत आनंद मानायचं माणसानं म्हटलं, तर त्याला आनंदित होण्याची संधि कधीं मिळेल कीं नाहीं कोणास ठाऊक? आनंदांत आहेत, मजा करताहेत हे लोक, त्यांना मजा करावीशी मनापासून वाटते आहे तेव्हां ते भाग्यवानच म्हणावयाचे! मला असा आनंद होत नाहीं तेव्हां मी दुर्दैवी! हो, दुर्दैवी नाहीं तर काय?......कां बरं मला होत नाहीं यांच्यासारखा आनंद?......

वास्तविक तोहि यंदा बी. ए. झाला होता. इतकंच नव्हे, तर तो पहिल्या वर्गांत आला होता, त्याला युनिव्हर्सिटीचं बक्षीस मिळालं होतं, आणि कॉलेजातील एक फेलोशिप त्याला मिळून त्याला कॉलेजच्या विद्यार्थ्यांना निबंधलेखन शिकविण्याचं कामही देण्यांत आलं होतं. आणि असं असूनही आज पदवीदान समारंभाच्या दिवशीं त्याच्या अंतःकरणांत आनंदाच्या अगर उल्हासाच्या ऊर्मी उसळत नव्हत्या! कां बरं असं?......

मला आनंद कां होत नाहीं ?......

राजा आपल्या मनाला पुनःपुन्हां हा प्रश्न विचारीत होता.

त्याला त्या प्रश्नाचं उत्तर सांपडत नव्हतं असं नव्हे तर उत्तरापेक्षां प्रश्नाचाच पुनःपुन्हां उच्चार करण्याचा चाळा माणसाच्या मनाला कधीं कधीं अधिक हवासा वाटतो तसा त्याला वाटत होता. वास्तविक त्या प्रश्नाचं उत्तर त्याला माहित होतं.

अभ्यासाविषयींची आणि अभ्यासानं जें यश मिळवायचं त्याविषयींची त्याची ईर्षा स्वाभाविक नव्हती. कृत्रिम होती. आपल्या वडिलांना संतुष्ट करण्यासाठीं त्यानं ती अंगीं आणली होती. परीक्षेला भिणं म्हणजे नादानपणा होय, भ्याडपणा होय असं त्याच्या वडिलांना वाटलं होतं, व आपल्या वडिलांच्या दृष्टीनं आपण नादान ठरतां कामा नये असं त्याला वाटलं होतं, म्हणून त्यानं अभ्यास करून पदवी संपादन करण्याचा दृढनिश्चय केला होता. पंजाबराव जिवंत होते तोंपर्यंत तर या निश्चयाचं स्मरण त्याला सतत करून द्यायला त्यांची मूर्तिच त्याच्या दृष्टीसमोर होती; पण ते दिवंगत झाल्यानंतरही त्यांची इच्छा राजानं आपल्या डोळ्यांपुढं अखंड ठेवली होती, आपल्या उद्योगांत कसूर होऊं दिली नव्हती, आणि बी. ए.च्या परीक्षेचे सगळे पेपर त्यानं उत्कृष्टपणं लिहिले होते.

परंतु ज्या दिवशीं शेवटचा पेपर देऊन तो मंडपांतून परत आला, त्याच दिवशीं मनांत धरलेल्या निश्चयाचं अखेरचं काम संपल्यासारखं होऊन त्याचं मन एकदम रिकामं झालं होतं. [मुद्दाम चावी देऊन घट्ट आंवळलेल्या स्प्रिंगचा ताण हलके हलके खर्च होऊन अखेर ती पार ढिली पडावी तशी त्याच्या निश्चयाची अवस्था झाली होती! ठासून दारू भरलेला फटाका बार उडाला, की नुसत्या पोकळ कागदी नळीचं रूप त्याला प्राप्त होतं. त्याच्या अंतःकरणाचं स्वरूप असंच बदललं होतं!] ज्या पुस्तकांची त्यानं परीक्षा दिली होती, त्यांचं महत्त्व आणि त्यांची गोडी तर त्याला पुढें उरली नव्हतीच—कोणत्याच विद्यार्थ्याला ती उरत नाहीं!—पण एकंदरींत पुस्तकी अभ्यासाची हौसच त्याच्या मनांतून एकाएकीं नष्ट झाली होती. इतर विद्यार्थी आतां बी. ए. झाल्यावर एम्. ए. चा अभ्यास करायचा कीं वकिलीचा

अभ्यास करायचा याबद्दलचे विचार करूं लागले होते. पण राजाच्या मनांत हे विचार मुळींच डोकावले नव्हते. तो मनाशीं म्हणाला होता, 'सुटलों! वडिलांच्या समाधानासाठीं जें व्रत अंगिकारलं तें शेवटला नेलं. त्यांच्या पश्चात्‌ही निश्चय शिथिल होऊं न देतां अभ्यास तडीला लावला. पंजाबरावांचा मुलगा चांगला बी. ए. झाला असं लोक आतां म्हणतील. वडिलांच्या आत्म्याला शांति मिळेल, त्यांच्या ऋणांतून मुक्त झालों, सुटलों! ज्यांत माझ्या चित्तवृत्ती स्वाभाविकपणानं रमत नाहींत तो पुस्तकी अभ्यास आतां यापुढें मी सोडून दिला, तर मी कोणत्याही प्रकारे दोषी ठरणार नाहीं!......'

या वृत्तीमुळें परीक्षेच्या निकालाविषयीं तो पुष्कळसा बेफिकीरच राहिला होता. कारण पास होण्याबद्दल त्याला शंका नव्हती, व पहिला वर्ग मिळतो कीं दुसरा, युनिव्हर्सिटीचं बक्षीस मिळतं कीं हुकतं याची त्याला पर्वा नव्हती. ज्या दिवशीं परीक्षेचा निकाल जाहीर झाला त्या दिवशीं तो सिंहगडला गेला होता. त्याच्या सहाध्यायांना व अध्यापकांना त्याच्या या वागण्याचा चमत्कार वाटला, पण हें वागणं कांहींच नव्हे असं त्याचं नंतरचं वर्तन होऊं लागलं.

तो प्रिन्सपलच्या बंगल्यावर गेला व त्यांस म्हणाला,

"मला जें युनिव्हर्सिटीचं बक्षीस मिळालं आहे त्याचा स्वीकार मीं केला नाहीं तर चालेल का?"

"आं?..."

प्रिन्सिपलसाहेबांच्या उद्गारांत अमर्याद आश्चर्य भरलेलं होतं. इतकं आश्चर्य त्यांना जन्मांत कधीं वाटलं नव्हतं—किंवा खरं म्हणजे पूर्वी एकदांच वाटलं होतं. त्यांनीं देऊं केलेला एक मूल्यवान अलंकार त्यांच्या तरुण पत्नीनं नको म्हटला होता तेव्हां!

त्यांच्या आश्चर्याचं राजाला आश्चर्य वाटलं नव्हतं. त्यानं तें अपेक्षिलं होतं.

प्रिन्सिपल पुढें म्हणाले,

"बक्षीस स्वीकारायचं नाहीं म्हणतोस? तें कां?"

" तें स्वीकारलं तर एम्. ए. ला बसलं पाहिजे अशी अट आहे. "

" बरं, मग ? "

" मला एम्. ए. ला बसायचं नाहीं. "

" कां ? वकिलीचा अभ्यास करायचा आहे ? "

" नाहीं. "

" मग ? कसला ? "

" कसलाच नाहीं. मला अभ्यासाचा कंटाळा आला आहे. माझ्या वडिलांना मी वचन दिलं होतं मी बी. ए. होईन म्हणून. तें पुरं करण्यासाठीं आजपर्यंत केला अभ्यास ! आतां...... "

" छे छे, सरंजामे, हें चालायचं नाहीं. तुला वर्क्षास मिळाले हा तुझाच नव्हे तर माझ्या कॉलेजचाहि मोठा गौरव आहे. तो मी सुखासुखी जाऊं देणार नाहीं. तुला स्वीकारलंच पाहिजे हे वर्क्षास. कॉलेजचा कांहीच का अभिमान नाहीं तुला ? कॉलेजचा लौकिक तुझ्यामुळं वाढतो आहे तो वाढूं देणार नाहींस तूं ? शिवाय, तुला 'फेलो' नेमलं आहे मीं. तुझ्याकडे अध्यापनाचं थोडंसं काम देणार आहे मी. तुझ्या विषयाचे प्रोफेसर दोन वर्षांनीं पेनशन घेणार आहेत. ते निवृत्त झाले की तुला नेमणार आहोत प्रोफेसर म्हणून त्यांच्या जागीं. मी मनाशीं असे बेत करतो आहे, अन् तूं मला येऊन विचारतोस, वर्क्षास स्वीकारलं नाहीं तर चालेल का म्हणून ? वा ! छट् , मीं तुला मुळीच असले वेडेपणाचे विचार करूं देणार नाहीं !...... "

याप्रमाणे प्रिन्सिपलसाहेब बराच वेळ बोलत राहिले होते. राजाचं लक्ष त्यांच्या बोलण्याकडे नव्हतं. पांच वर्षांपूर्वी पंजाबराव त्याच्याशीं असेच बोलत राहिले होते तो प्रसंग त्याच्या मनापुढे चटकन् उभा राहिला होता. 'माझं नांव राख. माझ्या मोठेपणाला शोभेल असा वाग–अभ्यास कर' असं त्या वेळीं त्याचे वडील त्याला म्हणाले होते. आज प्रिन्सिपलसाहेबही तसलीच भाषा बोलत होते. पाच वर्षांपूर्वी वडिलांनीं आपल्या मनांतले बेत त्याला सांगितले होते; आज प्रिन्सिपल आपले बेत त्याला बोलून दाखवीत

होते. एकीकडे प्रिन्सिपलसाहेबांचा आवाज त्याला ऐकूं येत होता पण दुसरीकडे किंचित् चिडलेल्या स्वरानं त्याचं मन विचारीत होतं—

पण माझे बेत मी करूंच नये कां? दुसऱ्यांनी माझ्यासाठी केलेले बेत पार पडावेत येवढ्याचसाठी जगूं? माझ्यासाठी जगूं द्या की मला!...

परंतु हे विचार राजाच्या मनातच राहिले. प्रिन्सिपलसाहेबांनीं त्याला बोलूंच दिलं नाहीं.

तो 'फेलो' म्हणून कॉलेजच्या वसतिगृहांत राहूं लागला. अध्यापनाचं कामही तो करूं लागला. विद्यार्थ्यांत तो प्रियही झाला. त्याचं अंतःकरण मात्र असंतुष्टच राहिलं!

आज 'एम्पायर' हॉटेलमध्ये कॉटवर पडून समोरच्या खोलीतल्या नवीन पदवीधरांचीं उल्हासित बोलणीं ऐकत असतां त्या उल्हासाचे पडसाद त्याच्या अंतःकरणांत कुठंच उमटत नव्हते याचं कारण हे होतं. त्या कारणाचा इतिहास सहा वर्षांचा होता.

* * *

युनिव्हर्सिटीच्या भव्य कॉन्व्होकेशन हॉलमध्यें राजा आपल्या खुर्चीवर बसला तो अशा विमनस्क आणि उत्साहशून्य स्थितींतच. ज्यांना बक्षिसं अगर शिष्यवृत्त्या मिळाल्या होत्या त्यांना मानाची पहिली रांग देण्यांत आली होती. पण त्या रांगेत बसलेल्या इतरांच्या चेहऱ्यावरचा उत्साहाचा व आनंदाचा प्रकाश राजाच्या मुद्रेवर नव्हता. या गोष्टीचं नवल वाटून की काय कोणास ठाऊक, पण त्याच्या उजव्या हाताला बसलेल्या मुलीनं त्याच्याकडे दोनतीन वेळां दृष्टिक्षेप केला. ते जेव्हां अखेर त्याच्या लक्षांत आलं, तेव्हां आपण कांहीं बोलावं अशी त्या मुलीची अपेक्षा आहे की काय कुणास ठाऊक असं तो आपल्या मनाशीं आश्चर्य करूं लागला. पण तो बोलला नाहीं. अपरिचित मुलींशीं तो अजून कधींच बोलला नव्हता. किंबहुना, मुलींशीं बोलण्याचा फारच थोडा अनुभव त्याला होता. त्या काळांत पुण्याच्या कॉलेजांत दरवर्षी चारपांच मुलींपेक्षां अधिक मुली नसत. त्याच्याबरोबर इंटरच्या वर्गात दोन

विद्यार्थिनी होत्या, त्यांच्याशीं सबंध वर्षांत तो दोनचार वेळांच बोलला होता; आणि दर वेळीं या शिकणाऱ्या मुली नेमक्या कुरूप कां असतात असा विचार त्याच्या मनांत आला होता. आपल्या मनानं शारीरिक सौंदर्य कां शोधावं याचा विस्मयही त्याला वाटला होता. आतां त्याच्या शेजारीं बसलेली मुलगीही देखणी नव्हतीच, पण ती ख्रिश्चन असल्यामुळं तिनं वेषभूषा नीटनेटकी केली होती. तरी तिच्याशीं बोलण्याची उत्सुकता मात्र राजाला वाटेना. तिच्याकडे न पाहण्याचा त्यानं निश्चय केला. पण त्यामुळंच त्याची नजर चोरटेपणानें दोनतीनदां तिच्याकडे वळली. राजाला आपल्या दृष्टीचा राग आला. आतां आपले डोळे तिच्याकडे वळणार नाहींत याला काय युक्ति करावी या विचारांत तो होता इतक्यांत त्या मुलीनं इंग्रजींत त्याला विचारलं,

"व्यासपीठावर ते उजव्या बाजूला बसलेले करड्या मिशांचे गृहस्थ तेच पुण्याच्या ××× कॉलेजचे प्रिन्सिपल का ? तुम्हांला माहित आहे ?"

"हो, तेच !"

राजाला वाटलं येवढ्यावरच संपेल तो संवाद. पण त्या मुलीनं पुढें विचारलं,

"तुम्ही पुण्याचे ?"

"हो."

"वाटलंच मला. ×××× पारितोषक मिळालं ना तुम्हांला ? मघाशीं पलिकडचे विद्यार्थी आपआपसांत कुजबुजत होते त्यावरून ताडलं मी."

"हं."

"हें तुमचं पारितोषक म्हणजे फार मोठा सन्मान समजला जातो असं ऐकलं आहे मी ! तुम्हांला खूप अभिमान वाटत असेल खास ! मला येवढंसं एक पदक मिळालं आहे तर मी गर्वानं फुगून गेलें आहे. खरंच ! असा गर्व वाटूं नये म्हणतात; पण वाटतो खरा ! अन् गर्व वाहण्यांत आनंदही वाटतो ! गर्व म्हणजे मोठा दुर्गुण खरंच का आहे ?"

नीतिशास्त्राची चर्चा करण्याच्या लहरींत राजा नव्हता; पण ती मुलगी इतक्या मोकळेपणानं बोलल्यावर अगदीं स्तब्ध राहणंही त्याला शक्य नव्हतं. तिचा चेहरा सुंदर नसला, तरी आकर्षक होता. वर्ण श्यामल असला, तरी त्यांत यौवनभराचा तजेला होता. अन् डोळे गमतीदार, हंसरे...पण स्वतःचे हे विचार राजाला चमत्कारिक वाटले. मनांतले विचार आपल्या चर्येवर तर उमटत नाहींत ना अशा शंकेनं किंचित् गोंधळून त्यानं विचारलं,

" तुम्हांला कोणत्या विषयांत पदक मिळालं ? "

" स्त्रीरोगचिकित्सेत. "

" म्हणजे तुम्ही डॉक्टरीची परीक्षा उतरलांत होय ? "

" हो. माझ्या दोन वडील बहिणी डॉक्टरणी आहेत. मीहि आतां एक वर्ष स्पेशल कोर्स घेणार अन् डॉक्टरीण होणार. माझे वडील नामांकित सर्जन होते. आमच्या कुटुंबांत डॉक्टरीची हौस भिनली आहे ! गंमत आहे, नाहीं ? "

ती हंसली.

राजालाहि हंसूं आलं.

किती तरी दिवसांत आपण इतक्या मनःपूर्वक हंसलो असं त्याच्या मनांत आलं.

त्या मुलीचे त्यानं मनांतल्या मनांत आभार मानले. त्याच्या नजरेतही कदाचित् कृतज्ञता व्यक्त झाली असावी. कारण त्या मुलीचं श्राव्य हास्य जरी बंद झालं होतं, तरी तिच्या नजरेतला हंसरेपणा किंचित् वाढल्यासारखाच त्याला भासला. तिनं विचारलं,

" तुम्ही आतां एम्. ए. होणार असाल अन् आणखी एखादं बक्षीस पटकावणार असाल ? "

हा प्रश्न ऐकतांच राजाचा उल्हास एकदम ओसरला. त्याची चर्या गंभीर झाली. त्यानं पुटपुटून काय उत्तर दिलं, तें त्या मुलीला ऐकूं गेलं नाहीं.

तितक्यांत व्यासपीठावर गव्हर्नरसाहेब उभे राहून भाषण करूं लागले, व त्या दोघांचा संवाद पुढें चालू राहणं अशक्य झालं.

गव्हर्नरच्या भाषणाकडे राजाचं लक्ष प्रथम बराच वेळ नव्हतं. पण मग त्यांतलं एक वाक्य त्याच्या कानांवर पडतांच त्यांचं अवधान ओढलं गेलं, व तो ऐकूं लागला—

"...तेव्हां तुम्हा सर्व तरुण मंडळीस माझं असं कळकळीचं सांगणं आहे, कीं शिक्षण म्हणजे चार पुस्तकं वाचणं आणि त्यांत कमी अधिक मार्क मिळवणं नव्हे, तर आपल्या अंतःकरणांत ज्या आवडीनिवडी सुप्त स्वरूपांत असतात, त्यांचा परिपोष व विकास करण्याचं शिक्षण हें एक अतिशय महत्त्वाचं साधन होय हें नेहमीं लक्षांत बाळगा. वास्तविक विश्वविद्यालयाचं खरं स्वरूप इतकं व्यापक पाहिजे, कीं ज्ञानाच्या सर्व शाखांत शिक्षण व पदवी देण्याची सोय विश्वविद्यालयानं केली पाहिजे. या दृष्टीनं आपल्या मुंबई विश्व-विद्यालयाचा सध्यांपेक्षां पुष्कळच अधिक विस्तार झाला पाहिजे. नागरिकांच्या सहकार्यानं तो आस्तेआस्ते होईलही याबद्दल मला संशय नाहीं. परंतु आपल्या विश्वविद्यालयाचं कार्य अवश्य तेवढ्या व्यापक प्रमाणावर आज होत नसलं, तरी शिक्षणाचं खरं स्वरूप आणि ध्येय यांची योग्य समजूत तुम्ही पदवीधरांनीं मनाशीं ठेवावी, व तुमच्याहून जी लहान मंडळी शाळा—कॉलेजसारख्या विद्या-मंदिरांत शिकत आहेत, त्यांच्या मनावर ठसवावी हें केव्हांहि इष्टच, आणि आपल्याला जी प्रगति करावयाची आहे तिच्यासाठीं आवश्यकच आहे. 'विद्या पवित्र आहे' या वचनाचा अर्थ हाच, कीं आत्मविकासासारखी दुसरी कल्याणप्रद गोष्ट नाहीं, आणि आत्मविकासाचं विद्येसारखं दुसरं साधन नाहीं. पदवीधरांनीं केवळ पदवी मिळविली येवढ्यावरच धन्यता न मानतां आपल्या विद्येनं आपल्या कोणकोणत्या गुणांचा परिपोष आपण साधला, याचा हिशेब मनाशीं घेतला पाहिजे. किंबहुना, प्रत्येक विद्यार्थ्यानं आधीं आपलं ध्येय मुक्रर केलं पाहिजे. केवळ पदवीधर होण्याची आजकालची फॅशन आहे म्हणून जे पदवीपरीक्षेचा अभ्यास करतात, त्या विद्यार्थ्यांची कोटी फारशी उच्च मानतां यायची नाहीं. मोठे स्त्रीपुरुष अशा विद्यार्थ्यांतून पुढं आलेले नाहींत. ज्यांनीं आपलं ध्येय आधीं निश्चित केलं होतं, आपल्या अंतःकरणांतल्या वृत्ती आधीं ओळखल्या होत्या, आपल्या मनांत कोणत्या ज्ञानशाखेबद्दल अपरिमित जिज्ञासा व गोडी आहे हें अजमावलं होतं तेच पुढें मोठे पंडित झाले, ज्ञानविशारद झाले, सर्वत्र जगाच्या आदरास पात्र झाले. त्यांचा कित्ता गिरविण्याची बुद्धि

तुम्हांला होवो असा तुम्हां सर्वांना आशीर्वाद देऊन मी हें आपलं भाषण संपवितों."

टाळ्यांचा कडकडाट झाला.

गव्हर्नरसाहेब परत स्थानापन्न झाले.

सभास्थानांतील सर्व लोक त्यांच्या वक्तृत्वामुळं खूष झालेले दिसत होते. त्यांच्या भाषणाच्या अस्खलित ओघाचा सर्वांच्या मनांवर परिणाम झाला होता. त्यांच्या विचारसरणीकडे कोणी लक्ष दिलं होतं कीं नाहीं कुणास ठाऊक ? किंबहुना, असल्या समारंभाच्या वेळीं केलेल्या भाषणांत असं खोल लक्ष न घालण्याचा संकेतच आहे कीं काय कुणास ठाऊक ? गव्हर्नर आले, मोठ्या आवाजांत बोलले, अस्खलित वाणीनं बोलले, छान झालं, यंदाचा पदवीदानसमारंभ मोठा यशस्वी झाला, असं अखेर म्हणतां आलं म्हणजे झालं अशा वृत्तीनंच सारे लोक आले होते ! अर्थात् ते सगळे आनंदित झाले.

राजा मात्र आनंदित होण्याऐवजीं अतिशय गंभीर झाला. त्या व्याख्यानामुळं ज्याच्या ठिकाणीं विलक्षण गांभीर्य उत्पन्न झालं असा कदाचित त्या सबंध सभेंत तो एकटाच असेल; पण तसं झालं खरं ! कारण ज्या विचारांनीं तो अलीकडे चार साडेचार महिने अस्वस्थ व असंतुष्ट झाला होता, ते गव्हर्नरच्या भाषणाच्या अखेरच्या भागानं अधिकच डिवचले गेले. ज्या अभ्यासांत त्याचं चित्त यापुढं रमणं अशक्य होतं तो त्यानं सोडला तर तें योग्यच होतं तर ? प्रिन्सिपलसाहेबांच्या आग्रहाखातर अगर कॉलेजच्या इभ्रतीसाठीं त्यानं एम्. ए.चा अभ्यास केलाच पाहिजे हा जुलूम अन्यायाचा होता तर ? आणि अंतःप्रवृत्ति व अभ्यास यांच्यांतील हा क्लेशदायक विसंवाद बंद करून आपण अभ्यास सोडून दिला तर तें समर्थनीयच ठरेल तर ? आपल्या मनांत जे बंडाचे विचार आज कित्येक दिवस येत आहेत त्याला खुद्द विश्वविद्यालयाच्या कुलपतींच्या शब्दांचा आधार आहे ? खरंच आहे ? कां त्यांनींसुद्धां जें भाषण केलं तें केवळ समारंभ साजरा करण्यासाठीं ? त्यांचं मायावी मोहक शब्दजाल तेवढं लोकांनीं प्रशंसावं म्हणून ? त्यांतला अभिप्राय फार कसोशीनं कोणी श्रोता आपल्या मनाला लावून घेणार नाहीं अशाच अपेक्षेनं ? कोणास ठाऊक ? कोणास ठाऊक ?......

असले अनेक विचार मनांत एकदम घोळका करून उठल्यामुळं राजा अतिशयच गंभीर झाला.

त्याच्या शेजारची मुलगी हंसत म्हणाली,

" फार सुंदर झालं भाषण, नाहीं ? "

पण त्यानं उत्तर दिलं नाहीं. तिच्याकडे पाहिलंही नाहीं. समारंभ संपला व लोक निघाले तेव्हां तो व ती अगदीं जोडीनं दारापर्यंत आली. त्याच्या खांद्याचा स्पर्शदेखील तिच्या केशकलापाला दोन-तीनदां झाला, पण तो तिच्याशीं कांहींच बोलला नाहीं. आणि दार ओलांडून युनिव्हर्सिटीच्या बगीच्यांत मोकळ्यावर त्याच्यापुढें हात करून 'गुडबाय' म्हणायचं तिनं मनाशीं ठरवलं असूनही तिला तसं करतां आलं नाहीं. कारण तिच्याकडे दृष्टिक्षेपही न करतां तो झपाझप पावलं टाकीत गेला आणि लोकांच्या घोळक्यांत दिसेनासा झाला.

त्याच्या त्या वागण्याचा तिला मोठा चमत्कार वाटला.

पण त्या मुलीशीं आपलं वर्तन चमत्कारिक झालं कीं काय अशी शंकाहि राजाच्या मनांत आली नाहीं. पदवीदानसमारंभांत आनंद मानणाऱ्या तरुणांच्या त्या समुदायाशीं तो समरस होऊं शकत नव्हता, व त्या समुदायापासून शक्य तो लवकर शक्य तितकं दूर जाण्याची त्याला उतावीळी वाटत होती.



[ ६ ]

आणि ज्या कारणासाठीं युनिव्हर्सिटीच्या आवारांतून बाहेर पडण्याची घाई त्याला वाटली, त्याच कारणासाठीं पुण्यास परत जाण्याची उत्सुकता त्याला वाटेना. वास्तविक पदवीदानसमारंभ आटपल्यावर दुसऱ्या दिवशी त्यानं पुण्यास परत जायला निघालं पाहिजे होतं. पण तो निघाला नाहीं. कारण परत जाऊन तरी अध्यापनाचंच काम करायचं ना? ज्या विषयांत स्वतःच्या वृत्ती रमत नाहींत तेच शिकवायचे ना? ज्या तरुण मुलांना त्या विषयांची स्वाभाविक गोडी क्वचितच असेल त्यांना केवळ रूढीला बळी पडून त्यांत रमविण्याचा हास्यास्पद प्रयत्न करायचा ना? आपणही सोंग घ्यायचं, अन् कोंवळ्या वयाच्या विद्यार्थ्यांनाही तें घ्यायला लावायचं? फसायचं अन् फसवायचं?......नाहीं तर काय? एका प्रचण्ड

ढोंगाच्या जोपासनेसाठींच साऱ्या शाळा अन् सारीं कॉलेजं चाललेलीं नाहींत काय ? ......

पुण्यास परत जावसं त्याला वाटेना !

तो मुंबईस आणखी एक दिवस राहिला.

त्या दिवशीं संध्याकाळीं गिरगांवांतल्या एका दुकानांत तो कांहीं खरेदी करीत असतांना त्याला समजलं, कीं त्याच वेळीं शांतारामाच्या चाळींत जंगी जाहीर सभा असून त्या सभेंत लोकमान्य टिळकांचं भाषण होणार आहे.

त्यानं टिळकांचं भाषण अजून ऐकलं नव्हतं. आपले वडील टिळकांचे स्नेही होते, व आपल्या वडिलांनीं त्यांच्या चळवळीला वेळोवेळीं सहाय्य केलं होतं हें त्याला माहित होतं. किंबहुना, आपल्या वांट्याला आलेल्या गरिबीचं कारण त्या सहाय्यांत आहे याबद्दलची त्याला ओझरती कल्पना होती. पण गेल्या पांच वर्षांत त्यानं देशाच्या राजकारणाकडे लक्ष दिलं नव्हतं. महायुद्ध सुरू झाल्यावर प्रथम कांहीं दिवस त्यानं त्याबद्दलच्या बातम्या उत्सुकतेनं वाचल्या; पण जसजसं ते महायुद्ध रेंगाळूं लागलं अन् त्याच्या बुडाशीं असलेलं आंतरराष्ट्रीय राजकारण अधिकाधिक गुंतागुतीचं होऊं लागलं, तसतसं त्याचं लक्ष कमी कमी होऊं लागलं, आणि अखेर तर त्या वाचावयाचं त्यानं सोडूनच दिलं. १९१६ सालची लखनौची कॉंग्रेस खूप गाजली, पण तिच्यांत घडलेल्या गोष्टींतही राजानं कधीं विशेष लक्ष घातलं नव्हतं. त्या वेळीं तो बी. ए. च्या अभ्यासांत सर्वस्वी गढून गेला होता. पुढें १९१७ च्या एप्रिल महिन्यांत महात्मा गांधी चंपारण्याकडे गेले. सरकारनं त्यांना तेथून परत जाण्याचा हुकूम फर्मावला, पण त्यांनीं तो मानला नाहीं, इत्यादि हकिगतींनीं देशांत खूपच खळबळ माजली होती; परंतु राजानं तिकडे लक्ष दिलं नव्हतं. चंपारण्यांत कोणता प्रश्न धसाला लागतो आहे याचीहि त्याला स्पष्ट कल्पना नव्हती. कारण त्या वेळीं त्याची बी. ए. ची परीक्षा होती. पेपर लिहिण्यांत तो सर्वस्वी गुंतला होता. इकडे तिकडे पाह्यला त्याला फुरसद नव्हती. मोठमोठ्या पुढाऱ्यांचीं नांवं त्यानं ऐकलीं होतीं, पण फार थोड्यांना पाहिलं होतं.

टिळकांच्या पुण्यांतला तो राहणारा, पण त्यांचेंही व्याख्यान अजून त्यानं ऐकलं नव्हतं.

शांतारामाच्या चाळींतल्या सभेला जावंसं त्याला वाटलं. तो गेला.

सभेला विलक्षण गर्दी झाली होती. रस्त्यापर्यंत लोकांची थाप लागून राहिली होती. चाळीच्या चहूं बाजूच्या गॅलऱ्या फुलून गेल्या होत्या. कौलरावर आणि झाडांवरसुद्धां लोक चढून बसले होते. ती गर्दी पाहतांच राजाला एक चमत्कारिक गहिंवर आला. टिळकांचा केवढा पगडा लोकांच्या मनांवर आहे त्याचा प्रत्यय येऊन त्याला आनंद झाला, व त्या आनंदानं त्याला गहिंवरल्यासारखं झालं. असा गहिंवर त्यानं आज प्रथमच अनुभवला.

गर्दीतून हलके हलके वाट काढीत त्यानं अखेर चांगली जागा काढली. तेथें उभं राहून तो टिळकांचं भाषण ऐकूं लागला. हिंदी लोकांना सैन्यांत दाखल होऊं द्यायचं सरकारनं नुकतंच ठरवलं होतं, व या परवानगीचा फायदा घेऊन हिंदी लोकांनीं सैन्यांत भरती झालं पाहिजे. असं टिळक प्रतिपादित होते.

ते पुन्हां पुन्हां सांगत होते, कीं अशी संधि पुन्हां कधीं यायची नाहीं. महायुद्धाच्या आपत्तीत ब्रिटिश सरकारला हिंदी लोकांचं साहाय्य हवं आहे. तें आपण दिलं तर महायुद्ध संपल्यावर आपल्याला स्वराज्याची मागणी नेटानं करतां येईल. आपल्याला सरकारजवळ म्हणतां येईल कीं तुमच्या संकटकालीं आम्हीं प्राणाचीहि पर्वा न करतां तुमच्या उपयोगी पडलों, आतां आम्हीं मागतों ते स्वराज्याचे हक्क तुम्हीं दिले नाहींत तर जगाच्या दृष्टीनं तुम्ही कृतघ्न ठराल. शिवाय, लष्करी शिक्षण घेतल्यावर आपल्या राष्ट्राचं संरक्षण करण्याचं सामर्थ्य आपल्या अंगीं येईल. आणि तुमच्या स्वाधीन तुमचा देश केला तर परक्यांच्या हल्ल्याविरुद्ध तुम्ही ब्रिटिश फौजेच्या मदतीवांचून कसे लढाल या ब्रिटिशांच्या नेहमींच्या प्रश्नाला जागा उरणार नाहीं. आपण सांगूं शकूं कीं लष्करी विद्या आम्हीं आतां शिकलों आहोंत, आमच्या देशाचं संरक्षण आम्हीं करूं शकतों; आतां ब्रिटिश नोकरशाहीची जशी आम्हांला गरज नाहीं तशीच गोऱ्या सैन्याचीहि नाहीं. तुम्ही आपलं सगळं चंबूगबाळं आवरून इंग्लंडचा रस्ता

सुधारा, आमचं आम्ही पाहून घेऊं. पण असं आपल्याला म्हणतां यावं यासाठीं हिंदी लोकांनीं भराभर सैन्यांत भरती झालं पाहिजे. महाराष्ट्राला लढाई नवीन नाहीं. आपण एकदां अटकेपार भगवा झेंडा फडकावून आलों आहोंत. आज सभेला आलेल्या लोकांचें आजेपणजे पानपतच्या, वसईच्या, वडगांवच्या मैदानांवर लढले आहेत. लढाईचं रक्त अजून तुमच्या अंगांत आहे. या माझ्या महाराष्ट्रांतून पंचवीस हजार सैनिक पुढें येणं मला अवघड वाटत नाहीं. स्वराज्याची खरी तळमळ तुम्हांला आहे कीं नाहीं येवढाच प्रश्न आहे.......'

टिळकांच्या त्या भाषणांत नाट्य नव्हतं, भाषेचा फुलोरा नव्हता; पण अंत:करणाची मनस्वी कळकळ होती. प्रत्येक शब्दांत तळमळीचा बोजा होता, आणि मधून मधून मर्मभेदक विनोद प्रगट होत होता.

राजाच्या मनावर त्या भाषणाचा विलक्षण परिणाम झाला.

काल पदवीदानसमारंभाच्या वेळीं थंड व अतृप्त राहिलेलं त्याचं अंत:-करण एकदम तृप्तीनं उचंबळून आलं. त्याला वाटलं, असा एक मार्ग आपल्याला दिसला कीं ज्या मार्गानं गेलं तर आपल्या अंतःकरणाला उदात्त उत्साहाचं आणि तन्मयतेचं सचैल स्नान घडेल. शुष्क आणि निरुपयोगी अभ्यासक्रमानं शिणलेल्या मनाची देशसेवेच्या कामीं एकाग्रता करतां येईल......

तो हॉटेलमधें परत आला तो एक प्रकारच्या उल्हसित वृत्तींत होता. सैन्यांत दाखल होण्याचा त्यानं निश्चय केला होता.

दुसऱ्या दिवशीं त्यानं प्रिन्सिपलसाहेबांना आपला निश्चय कळविण्यासाठीं एक पत्र लिहिलं, आणि 'रिक्रूटिंग ऑफिस' कुठं आहे त्याची माहिती मिळवून तो तिकडे निघाला.

त्याची कल्पना होती, कीं सैन्यांत दाखल व्हायचं म्हणजे काय सोप्यांतली सोपी गोष्ट असणार ती! जायचं अन् म्हणायचं मला सैन्यांत भरती व्हायचं आहे, कीं लगेच अधिकारी म्हणतील, या हा घ्या पोषाख, करा सुरवात कवायतीला. रिक्रुटिंग ऑफिसच्या वाटेवर असतांनाच जणुं आपण रणभूमीवर पोंचलोंसुद्धां व हिंदुस्थानाच्या स्वराज्यासाठीं आवश्यक त्या प्रयत्नांचा आपला वांटा आपण उचललासुद्धां असा आनंद राजाला झाला होता.

पण त्याचा तो आनंद लष्करी ठाण्यावर पोंचेपर्यंतच टिकला.

त्या ठिकाणीं त्यानं कोणाला भेटावं हेंच घड कोणी सांगेना. इंग्रजी किंवा मराठी भाषा समजणारं माणूसच आधीं त्याला भेटेना. दोघे तिघे गुरखे भेटले, दोन चार पंजाबी भेटले. त्यांना त्याचे प्रश्न कळले नाहींत, आणि त्यांचीं उत्तरं त्याला कळलीं नाहींत. गोंधळून जाऊन तो इकडे तिकडे हिंडूं लागला. मैदानावर ठिकठिकाणीं नव्या जुन्या रिक्रूटांची कवायत चालली होती त्याकडे तो पहात राहिला. कवायत घेणाऱ्या अधिकाऱ्यांचे कर्कश हुकूम हवेंत उठत होते. ' लेफ्ट...लेफ्ट ' असे शब्द मधूनच तालावर उच्चारले जात होते, क्वचित् बंदुका वर खालीं केल्या गेल्या कीं त्यांचा फडफडाट ऐकूं येत होता. वाट चुकलेल्या माणसाप्रमाणें तो मधूनच इकडे तिकडे हिंडे, मधूनच ती कवायत पहात उभा राही. कवायत करणाऱ्या त्या छोट्या छोट्या तुकड्यांपैकीं एकीतल्या रिक्रूटांवर अधिकारी सारखा रागावत होता व त्यांस उद्देशून अपशब्द उच्चारीत होता. मध्येंच तर त्यानं झटकन् पुढं होऊन एका रिक्रूटाच्या पायावर सपकन् छडी मारली.

राजाला तें पाहवलं नाहीं.

तो वळला.

तितक्यांत समोरून एक सैनिक आला. त्याला त्यानं आपल्या मनांतला हेतू सांगितला.

त्या सैनिकानं त्याच्याकडे—विशेषतः त्याच्या नीटनेटक्या प्रतिष्ठित पोषाखाकडे—न्याहाळून पाहिलं व हिंदुस्थानींत विचारलं,

" क्यं बाबू तुम् ? तुम् रंगरूट हो ? तुम् ? मशूकरी ! "

असं उद्‌गारून हंसून तो निघून गेला.

अडाणी, दांडगे, दरिद्री लोक सैन्यांत भरती होतात अगर जबरदस्तीनं केले जातात हें त्या सैनिकाला माहित होतं. प्रतिष्ठित पोषाखाचीं सुशिक्षित माणसं भरती व्हायसाठीं आलेलीं त्यानं कधीं पाहिलीं नव्हतीं. राजाचं बोलणं त्याला ' मशूकरी 'चं वाटलं यांत आश्चर्य नव्हतं.

राजा भांबावून गेला. काय करावं त्याला समजेना. दूर अंतरावर एक दोन तंबू मारलेले दिसत होते. तिकडे जावं अशी त्याच्या मनांत कल्पना आली, व हलके हलके तो त्या दिशेनं जाऊं लागला.

पण तो दहा वीस पावलं गेला नसेल तोंच मागून कोणी तरी इंग्रजींत त्याला म्हटलं,

"ए! उभा रहा. कोण आहेस तूं?"

राजानं वळून पाहिलं तो दोन सशस्त्र गोरे सैनिक त्याच्याकडे टवकारून पहात होते. राजाला भय वाटलं नाहीं. उलट आपला हेतू यांना इंग्रजींत समजून सांगतां येईल या कल्पनेनं त्याला समाधान वाटलं तो बोलूं लागला—

पण ते सोजीर त्याला धड बोलूं देईनात. ते त्याला धाक दाखवूं लागले आणि अपशब्द उच्चारूं लागले. "तूं कोणी तरी टेहेळणी करायला आलेला लबाड माणूस आहेस" असं ते म्हणूं लागले. राजा खुलासा करूं लागला तों ते अधिकच चिडले व आपल्या संशयाचं पालुपद बडबडूं लागले.

अखेर शांत राहणं राजाला अशक्य झालं आणि तो रागानं कांहींसं बोलला.

त्याबरोबर त्या दोघां आडदांडांनीं त्याला खसकन् धरलं आणि वरिष्ठ अधिकाऱ्याकडे म्हणून नेलं. पण तो अधिकारी कुठसा बाहेर गेला होता.

उरलेला दिवस व ती रात्र राजाला एखाद्या कैद्याप्रमाणें पहाऱ्यांत अन्न-पाण्यावांचून काढावी लागली.

दुसरे दिवशीं वरिष्ठ साहेबापुढें त्याला उभं करण्यांत आलं. त्याची हकीकत ऐकून त्या अधिकाऱ्यानं त्याला ताबडतोब मुक्त केलं, भरती होण्याचा अर्ज लिहून घेतला, आणि तपासणीसाठीं त्याला लष्करी डॉक्टरकडे पाठवलं.

डॉक्टरनं त्याला नापास केलं.

राजाला त्या गोष्टीचं मनस्वी आश्चर्य वाटलं. तो उणापुरा उंच होता. त्याची छाती रुंद होती. पंजाबरावांच्या मुलाच्या ठिकाणीं असावी अशी

शरीरसंपत्ति त्याच्या ठिकाणीं होती. काल कवायत करतांना जे रिक्रूट त्यानं पाहिले होते त्यांत तर सोळा सतरा वर्षांचीं कोवळीं पोरं, अन् टीचभर छातीचे काही पहेलवान त्याला दिसले होते. मग आपण कसे नापास झालो ? त्याला कळेना......

का आपण सुशिक्षित आहोंत हेंच आपलें वैगुण्य आहे ?......

सैन्यांत आडमुठे, अडाणी लोकच असावेत असं तर सरकारचं अलिखित धोरण नाहीं ? सुशिक्षित लोक सामान्य सैनिकांत मिसळले तर लष्करांतली शिस्त टिकवणं कठिण जाईल असं तर सरकारला भय वाटत नाहीं, अशी शंका राजाच्या मनांत आली.

तो परत हॉटेलांत आला तो विचित्र मनःस्थितींत.

एकदोनदां त्याच्या मनांत आलं, टिळकांची गांठ घ्यावी आणि त्यांना आपली हकिगत सांगावी. तुम्ही पुढारी लोक वाहेल ते बोलतां पण त्याप्रमाणं वागणं सामान्य माणसास कितपत शक्य आहे याचा विचार करतां कां ? असं त्यांना रोखठोक विचारायची त्याला फार इच्छा होती. 'महाराष्ट्रांतून पंचवीस हजार सैनिक पुढं आले पाहिजेत !' हे टिळकांचे थरारून सोडणारे शब्द त्याला आठवले. पण व्याख्यानाच्या जागीं ते ऐकतांच त्याच्या अंगभर रोमांच उभे राहिले होते तसे आतां राहींनात. त्या शब्दांत कसलीच शक्ति त्याच्या प्रत्ययाला येईना. ते त्याला व्यर्थ व पोकळ वाटले. त्यांचं त्याला हंसूं मात्र आलं. पुढाऱ्यांच्या तोंडचं राजकारण सभा हालवून सोडण्यापुरतंच असतं कीं काय या शंकेनं तो कष्टी झाला. टिळकांची भेट घ्यावी, आणि आपल्याला जे वाटतं ते निर्भयपणानं सांगावं असं त्याला राहून राहून वाटलं. पण दरवेळीं तो आपल्या मनाला आवरून म्हणाला,

'छे छे ! कुठे टिळक अन् कुठें मी !'

आपल्यासारख्या वयानं व ज्ञानानं लहान असलेल्या माणसानं टिळकां-सारख्या लोकोत्तर वृद्ध पुढाऱ्याची तक्रार करायसाठीं भेट घेणं म्हणजे केव्हांही वेडेपणाच ठरेल.

तो विचार त्यानं मनांतून काढून टाकला.

पण त्यामुळें त्याचं मन शांत झालं असं नव्हे.

उलट, दोन दिवसापूर्वी जी त्याची मानसिक अस्वस्थता परमावधीस पोंचली होती तिचें क्लेश त्याला पुन्हां होऊं लागले. ज्या गोष्टीत एकाग्र देशसेवेचा आनंद मिळेल आणि अंतःकरणाच्या उन्मादक वृत्ति रमतील अशी त्याची कल्पना होती अशी एक गोष्ट करण्याचा त्यानं प्रयत्न करून पाहिला होता. पण तो विफल ठरला होता. त्याला सैन्यांत प्रवेश मिळाला नव्हता. त्यामुळं मग आतां काय करायचं हा प्रश्न त्याच्या मनाला पुन्हां शिणवूं लागला.

दुसऱ्या दिवशीं कॉलेजच्या प्रिन्सिपलसाहेबांचं त्याला पुण्याहून पत्र आलं. 'नांतर्डाचं' असं लिहिलं होतं, आणि आंत पुढील मजकूर होता—

" तुम्हांला वेड तर लागलं नाहीं ? सैन्यांत भरती व्हायचा सल्ला तुम्हांला कोणी दिला ? ताबडतोब निघून या. "

परंतु राजानं तें पत्र वाचलं आणि तसंच टेबलावर टाकून दिलं. त्यांतल्या मजकुराचं त्याला महत्त्व वाटलं नाहीं. आपल्या मनांत माजलेली विचारांची खळबळ शांत करण्याची त्याला अधिक अवश्यकता आणि निकड वाटत होती.

सबंध दिवस त्यानं खोलींतल्या खोलींत अंथरुणावर पडून अथवा रस्त्यावरची रहदारी शून्य दृष्टीनं पहात खिडकींत उभं राहून घालविला.

संध्याकाळीं तो समुद्रावर गेला आणि एका निवांत जागीं बाजूला बसून राहिला. एकीकडे समुद्राच्या पाण्याकडे पहात दुसरीकडे तो आपलं अंतःकरण उघडून पाहूं लागला. दोन्ही ठिकाणीं खळबळ चालू होती, आणि समुद्राप्रमाणेंच मनांतल्या खळबळीचंही स्वरूप त्याला नीट समजत नव्हतं.

अंतःकरणांतल्या वृत्ती ज्यांत रमत नाहींत असा हा अभ्यास आजपर्यंत केला, पुष्कळ झाला. आतां माझ्या वृत्तींचं समाधान मी कां पाहूं नये ?

या एकाच प्रश्नाभोंवतीं त्याचे विचार सारखे फिरत होते. किंबहुना, ते विचार निरनिराळे नव्हतेच, तर एकाच वाक्याचीं तीं विविध रूपं होतीं. ' माझ्या वृत्तीचं समाधान मी कां पाहूं नये ? ' हें वाक्य तो आपल्या मनाशीं पुनःपुन्हां उच्चारीत होता; पण त्याचा बोध मात्र त्याला नीटसा होत नव्हता. कारण, काय नको हे जरी त्याला कळत होतं तरी काय हवं ते त्याला स्पष्ट दिसत नव्हतं. मनाच्या असमाधानाचं कारण त्याला समजलं होतं; पण समाधानाचा उपाय त्याला सांपडत नव्हता. त्यामुळं त्याची विचारमालिका पुढें पुढें सरकण्याऐवजी नुसती गिरक्या घेत राही, आणि मग तें विचारचक्र अजिबात बंद करून तो समोरच्या उसळल्या लाटांकडे पहात राही.

गवताचा एक झुपका परतणाऱ्या लाटांबरोबर आंत समुद्राकडे जाई, पण किनाऱ्याकडे येणाऱ्या लाटांच्या झोक्यांत सांपडून पुन्हां परत येई. त्या झुपक्याकडे तो पहात राहिला. त्याच्या स्वतःच्या मनाचीहि अवस्था त्या झुपक्यासारखीच झाली होती म्हणून त्याला त्याकडे पहात रहावंसं वाटलं असेंही असेल.

तो किती वेळ तसा बसला तें त्याचं त्याला कळलं नाहीं, आणि अखेर तो उठला तो त्याच्या मनाचा कांहीं निश्चय झाला म्हणून नव्हे, तर होण्याचं चिन्ह दिसेना म्हणून, आणि आजूबाजूस दिवे लागल्याचं एकदम त्याच्या लक्षांत आलं व कदाचित् बराच उशीर झाला असेल असं त्याला वाटलं म्हणून.

तो जागेवरून उठून वरच्या फरसबंदी पायरस्त्यावर पोचायला आणि उजवीकडून एक गृहस्थ यायला गांठ पडली. त्या गृहस्थानं मुसलमानी भाषेत विचारलं,

" साहेब, आपल्याजवळ काड्याची पेटी आहे काय ? "

" नाहीं " म्हणून राजा पुढें जाऊं लागला.

पण त्या गृहस्थानं तेवढ्यांत त्याच्याकडे निरखून पाहिलं, व मग एकदम त्याच्या खांद्यावर हात टाकून हंसत म्हटलं,

" अफसोस ! ये तो बडी बात हय ! क्यं राजाभाऊ ? तूंच ना ? किती वर्षांनीं दिसलास रे ? "

त्यानं दोन्ही हातांनीं राजाचे खांदे पकडले आणि त्याला मोठ्या आनं-दानं अन् प्रेमानं गदगदा हालविलं.

राजाला प्रथम एक क्षणभर गोंधळल्यासारखं झाले, पण मग लगेच त्याला त्या मुसलमान गृहस्थाची ओळख पटली.

खांसाहेबांच्याकडे सारंगी शिकायला येत असे नव्हे कां हा ? याचं नांव एस्माएल—

मोठा कसबी होता हा. प्रथम पुष्कळ वर्षं यानं गाण्याची करून मेहनत केली होती. पण पुढें कशानंसा आवाज घोगरा झाला. आणि फक्त दुसऱ्यांना गाणं शिकविण्यापुरताच त्याच्या गाण्याच्या ज्ञानाचा उपयोग शिल्लक राहिला. मग त्यानं सारंगी हातीं घेतली होती. खांसाहेब याच्या हाताच्या गोडीवर बेहद्द खूष असत. आणि मोठा आनंदी अन् खेळकर होता स्वारी ! कितीकदां सारंगी सोडून तबल्याचीच मेहनत करायची लहर यायची याला, आणि मग तासन् तास एकेक बोल घटवीत बसायचा ! जुलिया तालांत कच्चा होता म्हणून तिची नेहमी चेष्टा करायचा; पण तिचा कच्चेपणा जावा म्हणून तिच्याबरोबर हौसेनें ताल धरून बसायचा.

पांच वर्षांपूर्वी खांसाहेबांच्या घरीं घालविलेल्या अनेक आनंदाच्या घटका अन् गंमतीचे प्रसंग राजाला एकदम आठवले. जे जग त्याला अत्यंत प्रिय असूनही वडिलांच्या इच्छेला मान देऊन आणि स्वतःचा करारीपणा सिद्ध करण्यासाठीं त्यानं वर्ज्य केलं होतं, अन् ज्या जगापासून आज पांच वर्षं तो एखाद्या व्रतस्थाप्रमाणं अलिप्त राहिला होता त्या जगाच्या साऱ्या विशुद्ध उन्मादकारक आनंदाचं स्मरण करून देणारा हा कोणी त्या जगांतला दूतच आपल्यापुढे आकस्मात् प्रगट झाला आहे असं एस्माएलकडे पाहतां पाहतां राजाला वाटलं. क्षणभर तो बेभान झाला !

पण मग भानावर येऊन त्यानं हास्य केलं व विचारलं,

" एस्माएल ?...तूं खुशाल आहेस ना ? "

" हां हां, मी तर मजेंत आहे. "

असं इस्माएल उत्तर देत आहे इतक्यांत त्यांच्या अंगावरून एक गृहस्थ जाऊं लागला तेव्हां त्यानं त्याच्यापासून काड्याची पेटी मागून घेतली, मघा-पासून तशीच हातांत राहिलेली सिगारेट शिलगावली व खिशांतून आणखी एक सिगारेट काढून ती राजापुढें केली.

राजानं आपण धूम्रपान करीत नाहीं असं सांगितलं तेव्हां त्याला विलक्षण आश्चर्य वाटलं. विस्मयाचा कांहीं तरी उद्गारही त्यानं काढला, व ज्याची त्याला काड्याची पेटी देऊन आणि आभारप्रदर्शनार्थ त्या माणसाला सलाम केल्यासारखं करून तो राजाकडे वळला, व त्याच्या प्रश्नाला आपण मघाशीं उत्तर दिलं हें लक्षांत नसल्याप्रमाणं म्हणाला,

" हां हा, मी तर मजेंत आहे ! तूं ? तुझी तब्येत ठीक आहे ? "

" छान आहे. "

" आतां कुठं असतोस ? इथें ? "

" नाहीं, पुण्यास. "

" काय करतोस ? "

बी. ए. झालों अन् कॉलेजांत फेलो आहे असं सांगितलं तर इस्माएलला त्याचा कांहीं एक बोध व्हायचा नाही हें राजाच्या लक्षांत आलं ! शिकून खूप मोठेपणा मिळवलेला माणूस 'वकीलसाब'च बनला अशी इस्माएलसारख्या माणसांची कल्पना असते. बी. ए., बी. एस्सी., एम्. ए. इत्यादि पदव्यांचा त्यांना मोठेपणा पटण्यासारखा नसतो. म्हणून तो म्हणाला,

" करतों झालं कांही तरी ! "

" गातोस कीं नाहीं अजून ? "

" नाहीं. "

" खरं ? "

" गेल्या पांच वर्षांत कधीं तंबोरा हातांत घेतला नाहीं. "

" अरेरे ! इतकी मिठास आवाज तुला खुदानं दिली अन् गाणं सोडलं म्हणतोस ? मग खांसाहेब सांगत होते तें खरंच तर. "

" हो. '

" खांसाहेब तुझी आठवण कितीदां काढीत होते तुला कल्पना नाहीं ! "

" आहे. "

" अन् जुलिया तर..."

एस्माएलनं तें वाक्य पुरं केलं नाहीं.

राजानंही त्यावर कांहीं उत्तर दिलं नाहीं.

कांहीं वेळ दोघेही स्तब्ध उभे राहिले.

मग राजानं विचारलं,

" तुला खांसाहेबांची कांहीं बातमी आहे का रे ? अजून तिकडे अन्नोलीलाच आहेत ती सगळी मंडळी ? "

" म्हणजे ? तुला माहितच नाही ? "

" नाहीं. सांग. चल, आपण त्या समोरच्या हॉटेलमध्ये जाऊं. चहा घेशील ना ? "

" हां. घेऊं या. "

ते दोघे हॉटेलमध्यें गेले, आणि चहा घेतां घेतां–किंवा खरं म्हणजे चहाचा एकच घोंट घेऊन बाकीचा तसाच निवत रहात देऊन–एस्माएलनं खांसाहेबांची हकिगत राजाला सांगितली. खांसाहेबांवर त्याची परमावधीची निष्ठा होती त्यामुळं हकिगत सांगतां सांगतां तो त्यांच्या गुणांचं वर्णन करीत राही, मधूनच त्यांच्या मोठेपणाविषयीं कांहीं उद्गार काढून अल्लाचं नांव घेतांच मुसलमान लोक दोन्ही हातांनीं कानांचीं पाळी पकडतात त्याचप्रमाणं अभिनय करी; आणि त्यांची थोरवी सांगत ' अल्ला त्यांना भरपूर आयुष्य देवो ! ' असं तो पुनः पुन्हां म्हणे. राजाचीहि खांसाहेबांच्यावर फार भक्ति असल्यामुळं तोहि तन्मयतेनं एस्माएलचं तें सारं बोलणं ऐकत राहिला.

खांसाहेबांचे वडील वारले होते. त्यानंतर कांही दिवस ते भोपाळच्या दरबारांत नोकरीस राहिले होते. पण त्यांच्या स्वाभिमानी स्वभावास त्या

नोकरीचा त्रास वाटूं लागला होता, व त्यांनीं ती सोडून दिली होती. त्यांनीं मग सबंध उत्तर हिंदुस्थानांत दौरा काढला होता, आणि जालंदर, लाहोर, दिल्ली, अलाहाबाद, बनारस, ग्वाल्हेर, इंदोर अशा अनेक ठिकाणीं मोठमोठ्या मैफली जिंकल्या होत्या. आतां ते परत अत्रोलीस येऊन राहिले होते. आतां त्यांची ऐन जवानी थोडीच उरली होती? पण नवजवान गवयांनीं त्यांच्या-पुढं थरथर कांपावं असं सामर्थ्य अन् कसब त्यांच्या गळ्यांत अजूनही कायम होतं......

राजानं मधेंच विचारलं,

" अन् जुलिया ? "

" हां जुलिया तर गाण्याच्या क्षितिजावर चमचमणारी तेजस्वी चांदणी आहे. बनारसला म्हणे ती अशी गायली, कीं तिथल्या विद्यागौरी अन् रोशनारा वगैरे साऱ्या बड्या बडया गायिकांनीं शरमून माना खालीं घातल्या. कलकत्त्यास तर ऐकतों कीं तिचं गाणं ऐकतांच गोहरजाननं तिला घट्ट आलिंगन देऊन पोटाशीं धरलं, अन् तिच्या सन्मानार्थ बडी दावत दिली ! "

" दावत म्हणजे ? "

" मेजवानी "

" असं होय ! शाबास ! "

असा उद्गार काढून राजा कांहीं वेळ जुलियाबद्दलच्या विचारांच्या आनंदांत मग्न होऊन स्तब्ध राहिला. त्याच्या मुखावर विलक्षण प्रसन्नता खेळत होती.

" जुलिया तालाला फार बिचकायची, तुला आठवतं इस्माएल? तूं तिची फार चेष्टा करायचास...... "

" हो. पण मोठी गोड मुलगी. कधीं चिडली नाहीं. पण आतां ती काय तालाला कच्ची राहिली असेल म्हणतोस काय ? छे छे, ती बातच सोड. खांसाहेबांची लडकी आहे ती ! मोठमोठ्या तबलियांना खाऊन टाकीत असेल आतां ! "

इस्माएलच्या त्या बोलण्याचं राजाला खूप हंसूं आलं. विनोदांत भर घालण्यासाठीं तो म्हणायला,

"

" होय, लहानपणापासून खादाडच होती ती ! "

यावर इस्माएलही मोठ्यांदा हंसला.

मग बोलतां बोलतां इस्माएल राजाला मधेंच म्हणाला,

" पण राजाभाऊ, तूं गाणं सोडलंस हें फार वाईट झालं."

" त्याला कांहीं कारणं झालीं तीं माझीं मला माहीत. त्याला आतां कांहीं उपाय नाहीं ! "

" उपाय कां नाहीं ? तुझं कोवळं वय गेलं हें खरं असलं, तरी तुझी उमर ऐन जवानीची आहे अजून. अजून पुन्हां सुरू केलीस गाण्याची तालीम...... "

" अजून ? "

" हो. कां नाहीं ? तुझी आवाजी हजारांत एक आहे अन् तुझी बुद्धि किती तीव्र आहे तें मीं पाहिलं आहे. "

" पण एकदां खांसाहेबांच्याजवळ शिकल्यामुळं दुसऱ्या कोणाची गायकी शिकावीशी मला वाटणं शक्य नाहीं. तूंच शिकवीत असशील मला तर मी शिकेन. शिकवतोस ? पण तूं इथें मुंबईस अन् मीं पुण्यांत. तुझं माझं जमायचं कसं ? "

" जमेल. पण खांसाहेबांच्याजवळ शिकायचं सोडून माझ्याजवळ काय शिकणार तूं ? "

" तें माझं मी ठरवीन. तुझी योग्यता मला माहित आहे, अन् मुख्य म्हणजे तुझ्याजवळ आपल्या खांसाहेबांची गायकी आहे. पण तुझ्याजवळ माझं शिकणं जमेल म्हणतोस तें कसं ? मी मुंबईस यावं असं तुझं म्हणणं ? "

" नाहीं. मीच लवकरच पुण्यास येणार आहे. "

" खरं ? "

" हां. चंचल बांदेकर ऐकून माहित आहे ना तुला ? गाणंही ऐकलं असशील तिचं. पुण्याच्या लोकांना हल्लीं वेड लावलं आहे तिनं."

" नाहीं बुवा. "

" अरे, नाहीं काय ? लावलं आहेन्. "

"हाः हाः ! मी नाहीं म्हणालों तें मला माहीत नाहीं या अर्थी. बरं त्या चंचलचं काय !"

"तिची शिकवणी मी पत्करणार आहे."

"होय ? असा तूं पुण्यास येणार होय ? बहोत अच्छी ! इस्माएल, तुझ्या या भेटींत आज मला किती किती आनंद झाला.म्हणून सांगूं ?"

"तुलाच झाला असं मानूं नकोस. मलासुद्धां फार फार दिलखुषी वाटली !"

"इस्माएल, या वेळीं तुझी सारंगी ऐकावी अशी विलक्षण इच्छा होते मला. या पांच वर्षांत गाण्याच्या बाबतींत उपाशी राहिलों आहे मी. अन् कदाचित् पुढंही असाच राहिलों असतों. पण योगायोगानं तूं भेटलास अन् माझी स्वाभाविक भूक पुन्हां प्रज्वलित झाली. ऐकवतोस मला सारंगी ?"

"हां हां ! क्यूं नहीं ? अरे यार, तुला नाहीं सुनावयाचं तर दुसऱ्या कुणाला ? माझ्याबरोबर येत असलास तर चल जाऊं आपण."

"कुठं ?"

"नेईन तिथं. कां ? डर लागली काय ?"

"छे ! चल."

भय वाटत नाहीं असं राजा म्हणाला खरा, पण इस्माएलनं त्याला ज्या ठिकाणीं नेलं त्या ठिकाणीं गेल्यावर त्याला भय जरी नाहीं तरी चमत्कारिक वाटल्यावांचून राहिलं नाहीं. असल्या ठिकाणीं तो पूर्वी कधींही गेलेला नव्हता. तें ठिकाण मुंबईच्या ज्या मोहल्यांत होतं तोहि त्यानं कधीं डोळ्यांनीं पाहिलेला नव्हता. त्याच्या अस्तित्वाच्या आणि तिथं घडणाऱ्या विचित्र गोष्टींच्या गप्पा तेवढ्या त्यानं क्वचित् प्रसंगी समवयस्क उनाड विद्यार्थ्यांच्या तोंडून ऐकल्या होत्या. त्या सबंध मोहल्यांत दिवाळी असल्यासारखी रोषनाई केलेली त्याला दिसली. हिंदूंपेक्षां मुसलमान लोकच त्याच्या दृष्टीस अधिक पडले. मोटारी व व्हिक्टोरिआ वेगानं येऊन उभ्या राहिल्या कीं त्यांतून कांहीं लोक घाईनं उतरत तर कांहीं उतरण्याऐवजीं वरच्या माड्यांकडे पहात रहातच त्याचा त्याला चमत्कार वाटला. त्यानंही वर न्याहाळून पाहिलं तों उजव्या बाजूच्या टोलेजंग तीन मजली इमारतींच्या दालना-दालनांतून

गॅसबत्तीच्या उजेडांत स्त्रियांच्या आकृति हालतांना त्याला ओझरत्या दिसल्या तेव्हां तो भांबावून गेला......

ज्या ठिकाणीं इस्माएलनं त्याला नेलं तिथं दारालगतच्या प्रशस्त खोलींत उत्तम बैठक घातलेली होती. एका कोंपऱ्यांत एक मुसलमान हलक्या हातानं तबला वाजवीत होता. भिंतींना मोठमोठे आरसे लागले होते. समोरच्या आरशांत आपलंच प्रतिबिंब आहे हें न कळून कोणी तरी समोरून येत आहे अशा भासानं तो किंचित दचकला. आरशांच्या वरच्या अंगाला छोट्या छोट्या तसबिरी अगदीं दाटीनं चौफेर बसविल्या होत्या एक म्हातारा मुसलमान उदाचं भांड खोलींत फिरवीत होता. तो इस्माएलला पाहतांच आंतल्या खोलींत धांवत गेला. तबल्याशीं खेळत बसलेल्या इसमानं भांडीं दूर ठेवलीं व आदब दाखविली. इस्माएलची या ठिकाणीं मोठी प्रतिष्ठा ठेवली जात होती यांत संशय नव्हता......

राजाला एका लोडाशीं गादीवर बसवून इस्माएल दुसऱ्या लोडाशीं बसला......

आंतल्या खोलीच्या दरवाजांतून एक तरुण स्त्री बाहेर आली. तिच्याकडे राजानं निमिषार्धच नजरेला नजर देऊन पाहिलं. मग लगेच त्याची दृष्टि खालीं झाली. कारण अशा स्त्रीकडे वर मान करून पाहण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग होता. त्यानं जो ओझरता सरळ कटाक्ष त्या स्त्रीकडे टाकला होता तेवढ्यांत तिच्या रूपापेक्षांही तिची नजर त्याच्या ध्यानांत अधिक होती. सामान्यपणें जी स्त्रियांची नजर त्याला माहित होती तशी ती नव्हती. कांहीं वेगळीच होती. निर्भय, कीं भावशून्य, कीं कृत्रिम आर्जवानं भरलेली, कीं उन्मादक—त्याला नीटसं ठरवितां येईना. तें ठरविण्यासाठीं पुन्हां त्या स्त्रीकडे पहावं असं त्याला वाटलं, पण त्याचे डोळे तसं करीनात. ती स्त्री त्याच्या व इस्माएलच्या पुढें समोर येऊन बसली तेव्हां त्याच्या दृष्टीला तिचा उघडा वक्षभाग दिसला. त्यानं आपली नजर आणखी खालीं केली तो तिच्या नाजुक पावलांचीं नखं मेंदीनं रंगविलीं होतीं तें त्याच्या लक्षांत आलं. कोणीकडे पहावं त्याला कळेना......

इस्माएलनं तिला त्याची ओळख करून दिली तेव्हां तिनं तोंडातला

विडा चघळीत त्याच्याकडे पाहून हास्य केलं आणि जरा वेळानं आधीं इस्माएलला व मग त्याला चांदीच्या छोट्या तबकांतून पट्ट्या दिल्या. तिनं दोन्ही हातांनीं धरून पुढं केलेल्या तबकांतून पट्टी घेण्याऐवजीं त्यानं तें तबक पाडलं मात्र. ती स्त्री मोठमोठ्यानं हंसत सुटली. राजा अतिशय अस्वस्थ झाला.......

पण मग सुमारें अर्ध्या-पाऊण तासानं सारंगीच्या साऱ्या तानी आणि तराफा लावून इस्माएल जेव्हां वाजवूं लागला तेव्हां त्याची ती अस्वस्थता पार लयाला गेली. ‘ कामोद ’ रागाच्या धीरगंभीर, आर्जवी सुरांनी सारं वातावरण भरून गेलं, आणि त्या वातावरणाशीं राजाच्या साऱ्या वृत्ती तद्रूप झाल्या. आज अडीच तीन महिने जो असंतोष त्याच्या मनांत उद्भवला होता तो कोठच्या कोठें विरून गेला. जें समाधान त्याला सांपडलं नव्हतं तें त्याला सांपडलं. अभ्यास सोडून काय करावं तें त्याला कळत नव्हतं तें कळलं. जणूं मध्यंतरीचीं पांच वर्षं एकदम लुप्त झालीं, आणि ज्या दिवशीं खांसाहेबांच्या घरीं तो अखेरचा गेला होता तेथून त्याचं आयुष्य पुन्हां सुरू झालं. त्याच्या साऱ्या वृत्ती आनंदानं थरारून गेल्या.......



[ ७ ]

कॉलेजच्या वसतिगृहांतल्या विद्यार्थ्यांनीं न्हाण्याच्या खोलींत किंवा एखादे वेळीं राहण्याच्या खोलींत गाण्याच्या ताना माराव्यात ही गोष्ट जरी नित्याची म्हणून मान्य केली गेली असली, तरी त्या खोलींत कोणी सकाळ संध्याकाळ व्यवस्थितपणें तंबोरा काढून गाण्याचा अभ्यास सुरू केला तर तें चमत्कारिकच दिसेल हें उघड आहे. आणि ज्याच्याकडे वसतिगृहांतल्या विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवायचं काम सोंपवलं आहे अशा 'फेलो'नं तो अभ्यास सुरू केला तर त्याबद्दल फारच चर्चा व्हावी हें क्रमप्राप्तच म्हटलं पाहिजे. आणि ही चर्चा, इतकंच नव्हे तर त्याबद्दलच्या तक्रारी प्रिन्सिपलसाहेबांच्या कानांपर्यंत पोंचायला फारसा विलंब लागला नाहीं तर तेंही यथायोग्यच नव्हे काय ?

अर्थात् मुंबईहून परत आल्यानंतर राजानं जेव्हां एम्. ए. च्या

अभ्यासाचीं सारीं पुस्तकं ट्रंकमध्यें भरून दृष्टिआड केलीं, आणि गायनाचीं आयुधं जमवून तो अभ्यास मनापासून व उत्साहानं सुरू केला तेव्हां दहापंधरा दिवसांच्या आंतच प्रिन्सिपलसाहेबांनीं त्याला एके दिवशीं बंगल्यावर बोलावलं, आणि त्याबद्दल आपली नापसंती व्यक्त केली.

राजाच्या जागीं दुसरा एखादा विद्यार्थी असतां तर ते त्याच्यावर खूप रागावले असते. पण राजावर त्यांची मर्जी होती. त्याच्या हुशारीबद्दल त्यांना कौतुक वाटत असे, आपल्या विषयांत पहिला येऊन त्यानं पारितोषक मिळवलं व कॉलेजची कीर्ति वाढविलेली पाहून अभिमान वाटत असे. अध्यापनाचं कौशल्यही त्याच्या अंगीं असलेलं दिसल्यामुळं आणि अल्पावकाशांत त्यानं विद्यार्थ्यांचीं अंतःकरणं जिंकलेलीं आढळून आल्यामुळं त्यांचा त्याच्यावरचा लोभ वाढला होता. आणि आणखी दोन वर्षांनीं तो आपल्या कॉलेजांत कायम अध्यापक म्हणून काम करूं लागेल व आपल्या कॉलेजच्या लोकप्रियतेंत भर घालील अशी त्यांना खात्री वाटत होती. म्हणून त्याच्यावर फारसं रागवावंसं त्यांना वाटेना.

परंतु त्याचं वर्तन आतांशा जरासं तऱ्हेवाईक कां व्हायला लागावं असा चमत्कार प्रिन्सिपलसाहेबांना वाटूं लागला होता. परवां पदवीदानसमारंभाला हा गेला काय अन् तेथें सैन्यांत दाखल होण्याचा लहरी प्रयत्न करून शेवटीं आपण तार केली तेव्हां आला काय ?...आणि आतां म्हणे गायनाचा अभ्यास कसून करतो आहे !......

हें सारं आपल्याला किती विक्षिप्तपणाचं वाटतं तें प्रिन्सिपलनीं राजाला सांगितलं.

राजानं त्यांचं सारं बोलणं ऐकून घेतलं आणि विचारलं,

" गाण्याचा अभ्यास करणं विक्षिप्तपणाचं कां वाटतं आपणाला ? "

" तूं आतां कॉलेजचा फेलो आहेस. लवकरच प्रोफेसर होणार तूं..."

" प्रोफेसरनं गाऊं नये होय ? "

" थोडंसं गावं. गुणगुणावं. एखादी तान मारावी. पण अगदीं सकाळ-संध्याकाळ गायचं म्हणजे काय ? "

" हा ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न आहे."

" आवडीचा नाहीं! तर प्रतिष्ठेचा आहे. आपल्या सामाजिक दर्जाला असं करणं शोभतं कीं नाहीं हा प्रश्न आहे!"

" म्हणजे गाणं शिकण्यानं माझ्या प्रतिष्ठेला बाध येतो असं आपलं म्हणणं?"

" हो."

" मला नाहीं तसं वाटत."

" खेदाची गोष्ट आहे. अन् शिवाय वसतिगृहांतल्या विद्यार्थ्यांना तुमचा उपसर्ग व्हावा—"

" मुळींच नाहीं. दारं खिडक्या लावून घेऊन गात बसतों मीं! कोण कोण म्हणतं माझ्या गाण्याची कटकट होते म्हणून? येऊं दे त्याला माझ्यासमोर......"

" त्याचं तें चिडलेल्या स्वरांतलं बोलणं प्रिन्सिपलसाहेबांस आवडलं नाहीं. तो आपलं ऐकेल आणि गाण्याची वेडी लहर सोडून देईल असा त्यांनीं मनाशी हिशेब केला होता. दुसऱ्यानं अमुक करावं किंवा करूं नये हें ठरवितांना त्याच्या अंतःकरणांतल्या वृत्ति कशा आहेत हें लक्षांत घेण्याची माणूस सहसा तसदी घेत नाहीं या नियमाला ते अपवाद नव्हते; व त्यांनीं जेव्हां राजाला बोलावणं धाडलं तेव्हां त्यांना वाटलं होतं आपण नापसंती व्यक्त करतांच राजा म्हणेल, 'ठीक आहे, राह्यलं. बंद करतो मी गाण्याचा अभ्यास!' पण त्याचं तें वाटणं खोटं ठरलं तेव्हां त्यांचा स्वाभिमान दुखविला गेला आणि त्याच्याशी गोडीगुलाबीनं बोलण्याचा त्यांचा संकल्प अधिक वेळ टिकूं शकला नाहीं. ते चटकन् जरा कठोर आवाजांत म्हणाले,

" मला रुजवाती करीत बसायची संवय नाहीं. तुझा हा गाण्याचा उपक्रम मला पसंत नाहीं. वसतिगृहांत चालूं देणार नाहीं मी असले प्रकार."

" ठीक आहे. मी वसतिगृह सोडून जातो."

" ठीक आहे."

"इतकंच नव्हे, तर माझ्याकडे अध्यापनाचं जें काम आपण दिलं आहे त्याचाहि राजीनामा देतों वाटलं तर..."

आणि खरोखरच राजानं तसंही केलं असतं; पण त्याच्या विषयाच्या प्रोफेसरांनीं मध्यस्थी केली आणि त्या विचारापासून त्याला परावृत्त केलं.

त्यामुळं शिकविण्याचं काम राजानं पूर्ववत् चालू ठेवलं. फक्त वसतिगृह सोडून तो गांवांत आपल्या मालकीच्या वाड्यांत राहूं लागला.

अर्थात् या गोष्टीचीहि चर्चा विद्यार्थीमंडळींत पुष्कळच झाल्यावांचून राहिली नाहीं.

पंजाबरावांच्या मृत्यूनंतर राजानं फक्त चार खोल्या आपल्याकडे ठेवल्या होत्या, आणि वाड्याच्या बाकीच्या जागेंत तीनचार बिऱ्हाडांना जागा दिली होती. त्याच्या वडिलांचा जुना कारकून बिऱ्हाड ठेवणं काढणं वगैरे गोष्टी पाही, आणि भाडं वसूल करून राजाला देई. हें भाडं आणि कॉलेजांतली शिष्यवृत्ति हीच काय ती त्याची मिळकत होती. स्वतःकडे ठेवलेली जागा त्यानं गेल्या तीन महिन्यांत बंद करून ठेवली होती. पण प्रिन्सिपलसाहेबांशीं चिडून बोलून तो जो निघाला, तो सरळ गांवांत आला, आपली जागा उघडून त्यानं साफ-सफाई करून घेतली, वसतिगृहांतलं आपलं सगळं सामान आणलं, आणि त्याच दिवसापासून तो त्या जागीं राहूं लागला.

आतां त्याच्या गाण्याबद्दल तक्रार करायला कोण येणार होतं?...

तो मालक होता या जागेचा!

वाटलं तर तो चोवीस तास गात बसेल!...

खरंच तसं बसायचा विचार होता त्याचा! पण मुंबईहून इस्माएल येण्याची वाट पहात होता तो.

इस्माएल दहापंधरा दिवसांत येतो म्हणाला होता. अजून कां आला नव्हता कोणास ठाऊक? बाकी येईल लवकरच त्याला इथें शिकवणी मिळणार आहे त्या अर्थी. का ही चंचल का कोण गाणारीण आहे तिचा विचार बदलला इस्माएलची तालीम घेण्याचा? का इस्माएलनंच येण्याचा बेत रद्द केला? या लहरी कलावंतांचा काय नेम सांगावा?......

पण अशा प्रकारचे तर्क करीत राजाला फार दिवस रहावं लागलं नाहीं. तो गांवांत राहायला आल्यापासून पांचव्याच दिवशीं इस्माएल पुण्यास येऊन दाखल झाला.

त्याचं गाणं शिकणं जोरांत सुरू झालं.

एके दिवशीं गाण्याची तालीम संपल्यावर इस्माएल त्याला म्हणाला,

" आतां तूं काय करणार आहेस ? "

तंबोऱ्यावर गवसणी सरकवीत राजा म्हणाला,

" विशेष असं कांहीं नाहीं. "

" मग येईनास माझ्याबरोबर ? "

" कुठं ? "

" चंचलेकडं. "

" चंचलेकडं ? " राजानं चपापून विचारलं.

कॉलेजांत अध्यापकाचं काम करणाऱ्या माणसानं एका गाणाऱ्या नायकिणीच्या घरीं कसं जायचं ! कोणाच्या दृष्टीस पडला तर ? पडला तर कशाला, पडणारच ! मग लोक काय म्हणतील ? विद्यार्थी काय म्हणतील ? प्रिन्सिपलसाहेब काय म्हणतील ? वास्तविक त्यांनीं काय म्हणून कांहीं म्हणावं ? गाणारणीचं घर म्हणजे काय अगदीं बहिष्कृत स्थल मानलं पाहिजे ? आणि तो तेथें जाणार होता तो काय अनाचाराच्या हेतूनं ? चंचलाही गायनकलेची सेवा करणारी एक विद्यार्थिनीच होती ना ? तिच्या घरीं गेलं तर त्यांत कोठें बिघडलं ? त्यानं कां जाऊं नये तिच्या घरीं आणि कां करून घेऊं नये तिचा परिचय ? पण लोक इतका सुधा विचार कधी करतील काय ? आणि तो जर एका प्रतिष्ठित संस्थेंत अध्यापक होता, तर आपली जबाबदारी जाणून त्यानं लोकनिंदा टाळायला नको काय ?......

हे सगळे उलटसुलट विचार राजाच्या मनांत भराभर आले, व त्यामुळें 'चंचलेकडे ?' असं इस्माएलला विचारतांना त्याच्या स्वरांत कांहीं एक विलक्षणच कंप उत्पन्न झाला.

इस्माएल हंसला, व म्हणाला,

" कां ? दचकलास कां ? "

इस्माएलच्या त्या हंसण्यांत व त्या दोनच शब्दांत काय होतं कुणास ठाऊक, पण तें ऐकतांच राजाला वाटलं त्यानं आपला उपहास केला. जणूं मनांतली आंदोलनं ओळखून त्याबद्दल आपली कींव केली आणि हें वाटल्या-बरोबर बटन दाबून एखादा भिरभिर फिरणारा पंखा बंद करावा तद्वत् त्यानं आपल्या मनांतले सारे संशय बंद केले. त्याचा निश्चय झाला. तो म्हणाला,

" छे, दचकलों कधीं ? "

" मग चलतोस ना ? "

" हो. "

असं म्हणून राजानं कपडे चढविले.

चंचलेच्या घराचा जिना चढतांना वरच्या दिवाणखान्यांत कुणी तरी पेटी वाजवीत असावं आणि पेटीची सांथ येऊन मधून मधून गात असावं असं राजाला वाटलं. त्यानं इस्माएलकडे प्रश्नात्मक नजरेनं पाहिलं तेव्हां त्यानं नाकावर आपली उजवी तर्जनी ठेवून नजरेनं त्याला खुणावलं, ' बोलूं नकोस अन् पावलंही वाजवूं नकोस. ' इतकंच नाही तर त्यानं राजाच्या खांद्यावर हात दाबून ठेवला, आणि पुढची पायरी चढूं न देतां त्याला जागच्या जागीं उभं रहायला लावलं.

दिवाणखान्यांतून एकामागोमाग दोन चार लकेरी ऐकूं आल्या. आवाज स्त्रीचा होता, आणि स्वरमाला ' मुलतानी ' रागाच्या होत्या. जी कोणी स्त्री गात होती तिचं कंठमाधुर्य असामान्य होतं असं राजाला वाटलं. अगदीं हलक्या आवाजात त्यानं इस्माएलला विचारलं,

" चंचलाच गाते आहे ? "

पण इस्माएलनं होय अशा अर्थी फक्त मान हालवली, आणि त्याच क्षणीं पेटीच्या आवाजांत सफाईनं मिसळलेल्या आणखी दोनचार लकेरी राजाच्या कानीं पडल्या. त्याला त्या अतिशय मधुर वाटल्या, व इस्माएलकडे पाहून आपला अभिप्राय नजरेनं व्यक्त केल्याशिवाय त्याला राहवलं नाहीं.

परंतु इस्माएलच्या चेहऱ्यावर कौतुकाऐवजीं नापसंतीच त्याला स्पष्ट दिसली. त्या गोष्टींचं त्याला आश्चर्य वाटलं तो त्याबद्दल इस्माएलला विचारणार होता, पण तितक्यांत इस्माएलनं त्याच्या खांद्यावरचा हात काढला आणि त्याचा हात पकडून त्याला उरलेल्या पायऱ्या चढण्याबद्दल सूचना केली.

ते दोघे दिवाणखान्यांत पोहोंचले तेव्हां त्यांच्या पावलांच्या चाहुलीनं चमकून गाणाऱ्या स्त्रीनं गाणं एकदम थांबवलं. इस्माएल दृष्टीस पडतांच केवळ दचकल्यासारखंच नव्हे तर भ्यायल्यासारखं करून तिनं उजव्या हाताचा पंजा आपल्या तोंडावर झटकन् ठेवला, आणि कसंबसं उठून ती जी आंतल्या खोलींत पळाली ती अशा आविर्भावानं कीं जणूं एखादा अक्षम्य अपराध करतांना ती पकडली गेली होती.

त्या प्रकाराचं राजाला आश्चर्य वाटलं. मात्र आश्चर्यापेक्षां जी चंचला त्याच्या दृष्टीस क्षणभरच पडली होती तिच्या सौंदर्याचा परिणामच त्याच्या मनावर त्या क्षणीं अधिक झाला होता.

इतकी सुंदर स्त्री त्यानं यापूर्वी कधीं पाहिली नव्हती; आणि कदाचित् सुंदर वस्तूच्या दर्शनानं अंतःकरण आनंदानं उचंबळून येतं न येतं तोंच ती दृष्टीपुढून नाहींशीं झाली, कीं जी एक विचित्र विषादाची धार माणसाच्या अंतःकरणाला कापून जाते तिचाही अनुभव त्याला त्या क्षणीं प्रथमच आला असावा.

चंचला अशी एकदम उठून आंत पळून कां गेली असावी त्याचा त्याला तर्क करतां येईना. केवळ आपण अनोळखा मनुष्य इस्माएलबरोबर आलों हें पाहून ती लाजून आंत धांवली असेल? परंतु हे कसं शक्य आहे? चंचला गायिका होती. अनोळखी पुरुष तिच्या घरीं येणं हा कांहीं असा प्रकार नव्हता, कीं त्या प्रकाराला ती अगदीं अपरिचित होती. मग ती अशी कां आंत धांवली?......

त्यानं इस्माएलकडे आश्चर्याच्या दृष्टीनं पाहून न बोलतां विचारलं, 'या अशा कां पळाल्या?'

पण त्याला उत्तर देण्याच्या लहरींत इस्माएल अजूनही आलेला नव्हता. त्याच्या भुंवया मघांपेक्षांही अधिक आकुंचित झाल्या होत्या. त्यानं खिशांतली एक विडी काढून शिलगावली, आणि बऱ्याचशा रागीट आवाजांत हांक मारली,

" चंचल ! "

आंतून कांहींच उत्तर आलं नाहीं.

इस्माएलनं आवाज आणखी उंच करून मुसलमानी भाषेत म्हटलं,

" चंचल, बाहेर ये ! जलदी ! ऐकलंस का नाहीं ? "

आंतून प्रत्युत्तर आलं नाहीं. पण चंचला स्वतःच दाराशीं येऊन दाराचा अर्धवट आडोसा करून उभी राहिली. तिनं मान खालीं घातली होती, आणि आपल्या डाव्या मनगटांतील तासाची बांगडी उजव्या हाताच्या बोटांनीं चाचपीत तिच्याकडे तिनं दृष्टि लावली होती.

विडी तोंडावेगळी करून इस्माएल म्हणाला,

" तिथं कां उभी राहिलीस ? अशी पुढं ये नीट. तुझे कान पिळले पाहिजेत. "

इस्माएलनं असं कां बोलावं तें राजाला कळेना. चंचलेचा काय अपराध झाला होता त्याची त्याला कल्पना करतां येईना. ती मात्र दारांत उभी राहिली होती ती एखाद्या अपराध्यासारखी. तिचा गोरापान चेहरा आरक्त झाला होता, तिचा श्वासही घाबरल्यासारखा होत होता, आणि तिच्या लांब-सडक काळयाभोर पापण्या थरथर हालत होत्या. तिनं उजव्या हातांत धरलेला डावा हात सोडवून त्याचा पालथा पंजा ओंठाच्या खालीं धरला. जणूं आपल्याला आतां रडण्याचा हुंदका येईल अशी तिला भीति वाटत होती. इस्माएलचं तिला भय वाटत असावं हें स्पष्ट दिसत होतं. पण त्याहूनही तिचं विलक्षण सौंदर्य राजाच्या नजरेला त्या वेळीं अधिक स्पष्ट दिसत होतं. सुंदर स्त्री भ्याली कीं तिच्या सौंदर्याला कांहीं विलक्षणच शोभा चढते हें त्याला प्रथमच कळलं. लावण्यसंपन्न स्त्रीचा कोणता विभाव असा असेल कीं त्यामुळं तिचं लावण्य अधिकच खुलून दिसणार नाहीं असं तो मनाशीं आश्चर्य करूं लागला.

इस्माएल पुन्हां रागानं म्हणाला,

“ ऐकलं नाहींस का ? पुढं ये ना. ”

तरी चंचला जागच्या जागींच उभी राहिली.

मग इस्माएलनं दुरूनच तिला राग भरण्यास प्रारंभ केला.

“ अगदीं बेअक्कल आहेस तूं चंचल. पोरकट आहेस. इतकी चांगली गातेस पण सुराची मिजास तुझ्या डोक्याला नाहीं ? तुला दहादां सांगितलं मी कीं गाण्याचा अभ्यास करायचा तो तंबोऱ्यावरच केला पाहिजे, पेटीबरोबर कधींही करतां कामा नये. मैफलीच्या वेळेस तुझ्यामागं पेटी असते तेंसुद्धां मला आवडत नाहीं. पण त्या वेळचं राहूं दे. ऐकणाऱ्या लोकांना सुरेलपणाची अक्कल नसते, साथीची गर्दी झाली कीं ते खूष असतात; म्हणून मैफलीच्या वेळेस पेटीची साथ घेतलीस तर त्याबद्दल मी कांहीं बोलत नाहीं. पण घरीं अभ्यास करतांना पेटी वाजवायची ? त्या खोक्यांत ‘ मुलतानी ’चे सूर तरी आहेत का ? कुठलं हें साहेबाचं खोकं आमच्या गाण्यांत शिरलं, अन् त्यानं आमच्या गाण्याचा सत्यानाश करून टाकला ! आज दुसऱ्यांदा पकडलंय मीं तुला पेटीबरोबर गाऊन अभ्यास करतांना. आज माफ करतों तुला; पण अभ्यासाच्या वेळीं पुनः पेटी हातांत घेतलीस तर हात कलम करून टाकीन, माहीत आहे ! ”

असं बोलून हातांतली विझलेली विडी पुनः पेटवण्यासाठीं काडी जोरानं ओढून जणूं वाजाच्या पेटीबद्दलचा तिरस्कार व्यक्त करायसाठींच ती काड्याची पेटी त्यानं रागानं दूर टाकली !

चंचला जागच्या जागींच उभी होती. तिनं फक्त ओंठावरचा हात दूर केला आणि कपाळावरचे केस मागं लोटले.

राजानं बसल्या जागीं अस्वस्थपणानं चाळवाचाळव केली. या विचित्र प्रसंगीं आपण काय बोलावं तें त्याला कळणं कठीण होतं. ज्या गालिचावर तो बसला होता त्याकडे तो पहात राहिला. बराच वेळ पहात राहिल्या-मुळं गालिच्यावरच्या नक्षीकामांतल्या चौकटी त्याला मोठमोठ्या दिसूं लागल्या.

तितक्यांत इस्माएलचं बोलणं त्याला ऐकू आलं.

"आच्छा, जाना दो. महामूर्ख आहेस, दुसरं काय? आतां उभी राहूं नकोस तिथं. पुष्कळ झालं नाटक मला भिण्याचं. पुढं ये, अन् अशी इथं बैस. हे माझे दोस्त आले आहेत, यांची तुझी ओळख करून देतों. हं आटप. ये पुढं."

चंचला दाराआड होती ती पुढें सरकली. तिनं आपला पदर नीट ओढून घेतला, केस दोन्ही कानांवर दाबले आणि ती मंद गतीनं पावलं टाकीत पुढं आली.

सोन्याच्या चौकटींत बसवलेलं एखादं सुंदर चित्रच आपल्याकडे सरकत आल्यासारखं राजाला वाटलं.

थोड्याच दिवसांपूर्वी मुंबईस इस्माएलबरोबर एके ठिकाणीं जाऊन तिथली ती मुसलमान स्त्री पाहतांना त्याला किती संकोच वाटला होता! पण आज त्याच्या दृष्टीला संकोच वाटत नव्हता. याचं कारण कदाचित् असं असेल, कीं अशा स्त्रियांकडे पहाण्याची त्याला आतां संवय झाली होती; किंवा कदाचित् त्याचं कारण असंही असेल, कीं जी चंचला त्याच्यासमोर येऊन बसली तिच्यासारखं लावण्य त्यानं पूर्वी कधींही पाहिलं नव्हतं, आणि त्याच्या दृष्टींत अतृप्त माणसाची धिटाई आली होती.

इस्माएलनं त्या दोघांची परस्पर ओळख करून दिली, आणि चंचलेला म्हटलं,

"तुझं गाणं ऐकायला आणलं आहे मीं यांना. ऊठ, घे तंबोरा."

चंचलेनं घाबरल्यासारखं दाखवून डाव्या हाताचीं बोटं आपल्या तोंडावर टेकलीं आणि म्हटलं,

"अग बाई! मी काय यांना गाणं ऐकवूं खांसाहेब? तुम्हीच सांगतां कीं हे चांगलं गातात. मला भीति वाटते."

"वा रे भिणारी! तुझ्या नाजूक बाता राहूं देत. आटप, घे तंबोरा. म्हणे भीति वाटते!"

असं म्हणून इस्माएल हंसला. मघांचा त्याचा रागाचा आविर्भाव आतां पार गेला होता.

तें पाहून चंचलाही तोंडाला पदर लावून हंसली, व तिनं मान फिरवली. त्याबरोबर तिची व राजाची पुरती नजरानजर झाली.

किती विलक्षण पाणीदार आणि मादक होते तिचे डोळे !......

राजाच्या मनांतील हा अभिप्राय त्याच्या नजरेंत व्यक्त झालेला चंचलेला समजला कीं काय कुणास ठाऊक ? कारण तिनं लगेच नजर दुसरीकडे केली आणि उठून कोपऱ्यांतला तंबोरा हातीं घेतला.

कांहीं वेळानें ती गाऊं लागली—

**बैरन हो गई हो गई रात**
**इस मेरे प्यारेकी लग गई आंखें ॥ ध्रु० ॥**
**परी सखी पिया सपनेमें देखे**
**कहना गये कुछ बातें ॥ १ ॥**

तें गायन ऐकत असतां राजाच्या मनाची स्थिति कांहींशी चमत्कारिक झाली.

त्या गायनांत कंठमाधुर्य होतं, लयीच्या आंदोलनांचं सौंदर्य होतं, रागाच्या शुद्ध स्वरूपाची गोडीही होती; आणि या सर्वांचा परिणाम होऊन राजाचं अंतःकरण आनंदानं उचंबळल्यावांचून राहिलं नाहीं. परंतु आपल्या आनंदांत कांहीं तरी वैगुण्य आहे असं मात्र त्याला सारखं वाटत होतं; आणि एकीकडे मधुर गायन कानावर येतांच रसिकांच्या अंगावर अवर्णनीय समाधानाचे जे शहारे येतात त्यांचा अनुभव घेत असतां दुसरीकडे आपल्या आनंदांतील वैगुण्य शोधण्यांत राजाचं मन गुंतलं होतं. हळूहळू तें वैगुण्य कोणतं तें त्याच्या लक्षांत आलं. चंचला अत्यंत सुंदर होती व तिच्या सौंदर्यानं त्याची दृष्टि उल्लसित होत होती; तिचा गळा विलक्षण होता व त्या गोडीनं त्याच्या श्रुति संतुष्ट होत होत्या. परंतु, तिच्या कंठांतून निघणाऱ्या आलापांत मनाचा उमदेपणा, बुद्धीची सहानुभवशक्ति अगर भावनांची तन्मयता त्याच्या प्रत्ययाला येत नव्हती. गायकाच्या अगर गायिकेच्या अंगीं हे गुण असले म्हणजे ऐकणाराच्या शरीरावर, मनावर आणि अंतःकरणा-

वर ज्या कांहीं एका विलक्षण संपूर्ण प्रसन्नतेचं सिंचन घडत असतं तसल्या सिंचनाचा अनुभव राजाला येत नव्हता. चंचलेचा आवाज निर्मळ आणि श्रुतिमनोहर होता; जो राग ती गात होती त्याचं स्वरूप अवघड असूनही मोठ्या कौशल्यानं ते ती राखीत होती, आणि तानांची कसरत करतांना एखाद्या चपल नर्तिकेप्रमाणं आरोहावरोहांच्या पसाऱ्यांतून तिचा गळा सफाईनं फिरत होता. परंतु जी चीज ती गात होती तिच्या अर्थाशीं ती समरस झाली नव्हती. 'माझ्या प्रियकराच्या नजरेची मला जखम झाली आहे, अन् त्यामुळं माझी झोंप पार उडून जाऊन त्याच्यावांचून कंठावी लागणारी ही रात्र मला वैरिणीसारखी भासते आहे' असं असहायपणानं—कदाचित् आपल्या प्रियसखीजवळ—उद्गार-णाऱ्या विरहार्त कामिनीची व्याकुलता चंचलेच्या गाण्यांत ऐकूं येत नव्हती! असामान्य संगीतांत स्वरमाधुर्याबरोबर भावनांचा जो झंकार मिसळलेला असतो तो चंचलेच्या त्या गाण्यांत आढळत नव्हता......

राजा मनाशीं विचार करूं लागला, असं कां बरं व्हावं? या चंचलेला विरहाच्या व्याकुलतेचा अजून अनुभव नसेलच कां?...ज्या निस्सीम प्रेमाच्या सुखाची विरहव्यथा ही केवळ अपरिहार्य अशी दुसरी बाजू आहे तें निस्सीम प्रेम या यौवनसंपन्न किशोरीनं अजून कधीं अनुभवलं नसेल कां?... हिच्या तारुण्याची स्पष्ट साक्ष तर हिच्या वक्षभागावर दिसत आहे!...हिनं अजून कोणावर प्रेम केलं नसेल?...आणि केलं नसलं तरी त्याची आपल्या मनाशीं कल्पना करून त्याचा उन्माद समजण्यापुरती बुद्धीची जी तरलता तारुण्या-बरोबर स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं आपोआप येते तीसुद्धां या चंचलेच्या ठिकाणीं नाहीं कां?......

परंतु राजानं या विचारांचे क्लेश आपल्या मनाला फारसे होऊं दिले नाहींत.

आणि तो घरीं परत आला तो अतिशय प्रसन्न मनानंच आला. त्यानं सुंदर गाणं ऐकलं होतं, आणि असामान्य सुंदर स्त्री जन्मांत प्रथमच पाहिली होती.

आपल्या खोलीचं कुलूप उघडतांना तो अर्धवट मोठ्यानं गात होता,

**'बैरन हो गई हो गई रात'**

तो चरण गातांना त्याच्या मनांत येत होतं, खरोखरच आजची ही रात्र आतां आपल्याला वैरिणीसारखी भासणार कीं काय? चंचलेच्या सौंदर्याचा आपल्यावर परिणाम होऊन जी यौवनसुलभ भावना प्रत्येकाच्या अनुभवाला केव्हां तरी येतेच पण आपल्याला आजपर्यंत समजली नव्हती, ती आपल्या अंतःकरणांत उद्भवली काय? चंचलेच्या ठिकाणीं बुद्धीचा मोठेपणा, मनाचा उमदेपणा, भावनांची उत्कटता इत्यादि गुण नसले तरी केवळ तिच्या शारीरिक सौंदर्यावर आपण लुब्ध होणार? तिचा ध्यास धरणार? वेडे होणार?......

**'बैरन हो गई हो गई रात'**

कपडे काढतां काढतां त्यानं तो चरण पुनःपुन्हां म्हटला, आणि नंतरही कॉटवर बसून त्यानं त्या चरणाचे आलाप घेण्यास प्रारंभ केला.

तितक्यांत त्याच्या खोलीच्या दाराशीं येऊन कोणीशा हांका मारल्या,

"लाजाभाऊ, अहो लाजाभाऊ,"

त्या बोबड्या शब्दांवरून राजानं ओळखलं कीं शेजारच्या बिऱ्हाडांतला छोटा आनंद आपल्याला हांक मारीत असावा.

गाण्याची लकेर थांबवून तो म्हणाला,

"कोण, आनंद का रे? ये ना, ये कीं आंत!"

आनंद त्याच्याजवळ आला व म्हणाला, "हा कागद दिलाय तुम्हांला."

राजा हंसला व म्हणाला, "अरे वेड्या, चिठी दिली आहे म्हणावं."

पण भाषेची ती दुरुस्ती आनंदला पटली नाहीं. तो म्हणाला,

"वा बा, माझी च्येष्ता कलता होय? हा कागद नाहीं वात्तं. बघा."

"बरं बरं, आपण कागदच म्हणूं. कुणी दिला रे?"

"उमानं दिला."

"हां आनंद, तुला काय शिकवलंय मी?"

"आईला आई म्हनायचं."

"मग, कुणी दिला कागद सांग बरं पुन्हां."

" आईनं. "

" शाबास ! "

असं म्हणून राजानं कागद हातीं घेतला आणि वाचला.

त्यांत लिहिलं होतं—

" मला पांचच मिनिटं आपली अगदीं निवांत भेट हवी. आतां येऊं का ? "

राजानं आनंदकडे पाहिलं अन् म्हटलं,

" तुझ्या आईला धाडून दे. "

आनंद धांवत परत गेला. मात्र, त्याला जाऊं देण्यापूर्वी राजानं त्याचा मुका घेतल्यावांचून त्याला सोडलं नाहीं.

तो गेल्यावर राजानं पुन्हां एकदां त्या चिठीकडं पाहिलं.

किती सुंदर अन् वळणदार अक्षर होतं त्या चिटींतलं! आणि अगदीं पुरुषाच्या अक्षरासारखं धीट आणि सरळ–किंचित् उजव्या बाजूला कलंडलेलं !

तें अक्षर म्हणजे उमाची एक प्रकारें प्रतिमाच होय असं राजाच्या मनांत आलं.

कारण त्याचा आणि उमाचा प्रत्यक्ष परिचय जरी थोडाच होता आणि तिच्याशीं त्याचं दोन चार शब्दांचं बोलणं चालणं जरी आजपर्यंत एक-दोनदांच झालं होतं, तरी तिच्याविषयीं जी हकिकत त्याला समजली होती तीवरून स्त्रियांच्या अंगीं सहसा न दिसणारं धैर्य आणि संकटं सोशीत सरळ ताठ उभं रहाण्याचा पुरुषांचा धर्म तिच्या ठिकाणीं होता याबद्दल त्याला संशय उरला नव्हता......

उमा !

बिचारी उमा !......जी एका व्यसनी नवऱ्याची परित्यक्त पत्नी होती, जी आश्रयार्थ आपल्या वृद्ध पित्याजवळ येऊन राहिली होती, जिला आपला लहानगा मुलगा आनंद हेंच काय तें विसाव्याचं स्थान उरलं होतं, जी सुशिक्षित आणि बुद्धिमती असून भग्न संसारामुळें जिच्या गुणांचं चीज

व्हायचं तसंच राहिलं होतं, रूपाच्या सामान्यतेमुळंच जिच्यावर परित्यागाचं दुःख कोसळलं होतं, आणि लोकापवादाची क्षिति न बाळगतां स्त्रियासाठीं शिवणकामाचा वर्ग काढून जिनं धैर्यानं स्वतःचा आणि आपल्या पित्याचा चरितार्थ चालविला होता, अशी ती उमा!...तिला बिचारी तरी कसं म्हणायचं! तिच्या विपन्न आणि संकटग्रस्त अवस्थेबद्दल अनुकंपा वाटणं सहाजिक असलं, तरी तिचा करार आणि धैर्य पाहून कुणालाही कौतुकच वाटावं आणि 'शाबास उमा' असेच उद्गार कुणाच्याही तोंडून निघावेत अशी ती होती......

राजानं तिची ती चिठी पुन्हां वाचली. आपली निवांत भेट घेण्यासारखं आपल्याशीं तिचं काय काम असावं त्याचा तर्क होईना. तो चिठीकडे तसाच निरखून पहात राहिला.

पण तितक्यांत उमाच दाराशीं आलेली त्याला दिसली व त्यानं झटकन् उठून म्हटलं,

"या ना!"

ती आंत आली आणि कांहींशी गोंधळून उभी राहिली.

राजा आपल्या टेबलाजवळच्या खुर्चीजवळ सरकला आणि कॉटकडे बोट दाखवून तिला म्हणाला,

"उभ्या कां? बसा ना!"

क्षणभर ती संकोचानं उभीच राहिली, आणि राजानं पुनः बसायला सांगितलं तेव्हां बसली, तीसुद्धां कॉटच्या कडेवर अगदीं अवघडूनच.

ती खालीं पहात स्तब्ध राहिली, व राजालाही काय बोलावं तें कळेना. तो तिच्याकडे नुसता पहात राहिला.

टेबलावरच्या दिव्याचा प्रकाश तिच्या चेहऱ्याच्या डाव्या बाजूवर पडला होता. तिचे डोळे मोठे नव्हते, पण त्यांत जी बुद्धीची चमक होती ती त्या प्रकाशांत स्पष्ट दिसत होती. वर्णानं ती पुष्कळच काळी होती, आणि संकटांनीं तिच्या चेहऱ्यावर अशी कांहीं म्लानता आली होती कीं, तिनं कितीही प्रयत्न केला तरी ती लपण्यासारखी नव्हती. अगदीं साधं लुगडं ती

नेसली होती. त्याची विटलेली किनार तिच्या डाव्या खांद्यावर प्रकाशांत स्पष्ट दिसत होती. तिच्या हातांत कांचेच्या एकेक बांगडीखेरीज दुसरं कांहीं नव्हतं......

बुद्धीच्या आणि अंतःकरणाच्या गुणांनीं सामान्यच, परंतु शारीरिक सौंदर्यानं असामान्य अशा चंचलेवर प्रथम भेटींतच लुब्ध होऊन परत आलेल्या राजाच्या दृष्टीला समोर बसलेल्या उमाचं दर्शन इतक्या जवळून प्रथम घडतांच त्याच्या मनाची स्थिति कांहींशी चमत्कारिक झाली. कां कुणास ठाऊक, पण त्याच्या एकदम मनांत आलं—उमावर पुरुषाचं प्रेम जडणं शक्य कां नसावं ? तिच्या नवऱ्यानं तिला टाकली होती; पण त्याला तरी तिच्या ठिकाणची बुद्धि आणि सद्गुण नाकबूल करतां येण्यासारखे होते ? मग त्यानं तिचा त्याग कां केला ? केवळ तिचं शरीर गोरंपान नव्हतं म्हणून ? तिचें नाक डोळे रेखींव आणि सुंदर नव्हते म्हणून ? तिच्या नवऱ्याच्या ठिकाणीं दुसरा एखादा पुरुष असता तर त्यानंही तिचा त्याग केला असता ? तिच्यावर प्रेम करणं त्यालाहि अशक्य झालं असतं ? पुरुषांना स्त्रियांच्या बुद्धिगुणाचा आणि अंतःकरणाच्या वैभवाचा उपभोग घ्यावासा वाटतच नाहीं काय ? त्यांना फक्त स्त्रीचं शरीरच हवं असतं, अन् त्यामुळं फक्त स्त्रीच्या देहसौंदर्यावरच ते प्रेम करतात ?......

इत्यादि विचारांनीं राजाचं मन बरंचसं गोंधळून गेलं.

त्याचं त्यालाच आश्चर्य वाटलं कीं उमाबद्दल आपण हे काय विचार करूं लागलों ? आणि मनांतील विचार बंद करण्यासाठीं स्तब्धता मोडून त्यानं विचारलं,

" काय काम आहे सांगा ना."

उमानं वर मान करून क्षणभर त्याच्या दृष्टीला दृष्टी दिली, पण मग लगेच खालीं करून ती म्हणाली,

" तें सांगण्यासाठींच मी आलें, पण आतां मला वाटतं आलें नसतें तर बरं झालं असतं. जें मला बोलायचं आहे तें बोलण्याचा मला विलक्षण संकोच वाटतो. तुमच्या सौजन्याचा मी फायदा घ्यावा किंवा

नाहीं, किंबहुना त्याची अपेक्षा तरी मी करावी किंवा नाहीं हें मला समजत नाहीं."

"तुम्ही मुळींच संकोच करूं नका. काय बोलायचं असेल तें खुशाल मोकळ्या मनानं बोला."

तिनं मान खालीं घातली होती ती तशींच ठेवली आणि म्हटलं,

"मी एका संकटांत आहे म्हणून तुमच्याकडे आलें आहे."

"कसलं संकट म्हणतां?"

"आमचं सहा महिन्यांचं भाडं थकलं आहे. तुम्हांला माहितच असेल."

"हो, आमच्या कारकुनानं मला तें परवां सांगितलं आहे."

"परवां तो कारकून म्हणाला, कीं या महिन्याची दहा तारीख टळली तर आम्हांला जागा सोडून जावं लागेल. उद्यां दहा तारीख, आणखी भाडं भरतां येईल अशी तर मला यत्किंचितही आशा नाहीं. कारकुनाजवळ कांहीं सांगण्याची सोय नाहीं. तो कांहीं तरी बोलतो, अन् तें सहन करणं मला कठीण जातं. त्याचं बरोबरच आहे. त्याला तरी काय दोष द्यायचा? दुर्दैवाचाच सारा दोष! गेले पांच महिने आमचे अण्णा अंथरुणाला खिळलेले आहेत. औषधपाण्याला पैसा थोडा का लागतो? पावसाळ्यांत माझ्याकडे शिवणकाम शिकायला येणाऱ्या बायका कमी होतात, त्यामुळं गेल्या तीन महिन्यांत क्लासाची फी अगदीं कमीच आली. कितीही काटकसरीनं राहिलं तरी पैसा पुरत नाहीं. पण या साऱ्या गोष्टी कारकुनाजवळ कशा आणि कितीदां सांगायच्या? तेव्हां म्हटलं—"

तिला पुढें बोलूं द्यावं हें राजाला बरं वाटलं नाहीं. कारण ती जेवढं बोलली होती तेवढ्यानंच तिच्या मनाला किती विलक्षण व्यथा झाली असली पाहिजे तें त्याला स्पष्ट दिसत होतं. तो चटकन् म्हणाला,

"आलं माझ्या लक्षांत. मी कारकुनाला सांगतों. तो तुम्हाला भाड्याबद्दल विचारणार नाहीं. तुम्हांला सवड झाली म्हणजे मला सांगा. मगच कारकून तुमच्याकडे येईल. मग तर झालं ना?"

उमानं गाढ कृतज्ञतेची नजर त्याच्याकडे टाकली आणि मग ती खाली पाहूं लागली. पण आपण उलट कांहींच बोललों नाहीं ही गोष्ट तिच्या मनाला बरी वाटली नसावी. कारण, क्षणभरानं मान वर करून ती म्हणाली,

"तुमचे माझ्यावर फार फार उपकार झाले."

"छे, छे, तुम्ही असं बोलतां कामा नये."

असं म्हणून राजा किंचित् हंसला, आणि मग उमाच्या मनांतील विषाद घालविण्यासाठीं दुसरेच विषय काढून तो तिच्याशीं बोलत राहिला.

त्या बोलण्यांत पुस्तकांच्या गोष्टी निघाल्या तेव्हां उमा मध्येंच म्हणाली,

"मला वाचनाची फार हौस आहे पण ती मला मारावी लागते."

राजा चटकन् म्हणाला,

"मी तुम्हाला देत जाईन पुस्तकं. माझ्याजवळ मागत जा. आतां देऊं कां कांहीं? मराठी देऊं कीं इंग्रजी देऊं? हें पहा, हें चालेल?"

त्यानं टेबलावर कडेलाच पडलेलं एक इंग्रजी पुस्तक उचललं आणि दाखवलं.

उमानं त्याचं नांव वाचलं आणि म्हटलं,

"हें मी कॉलेजांत असतांनाच वाचलं आहे."

राजानं आश्चर्यानं विचारलं,

"तुम्ही कॉलेजांत होतां?"

"हो, एक वर्षभर होते. त्यानंतर माझं लग्न झालं आणि—"

ती एकदम गप्प झाली. जणूं तिच्या आयुष्याचा पुढचा इतिहास म्हणजे एक मोठी शोककथा आहे असा तिच्या त्या एकदम स्तब्ध होण्याचा अर्थ होता!

ती एकदम गप्प झाली हें आपल्या लक्षांतच आलं नाहीं असं राजानं दाखवलं. त्यानं तिला दुसरी दोन पुस्तकं दाखवलीं आणि तीं आपल्याला किती व कां आवडलीं तें सांगितलं.

त्याचं बोलणं ऐकतांना उमाचा चेहरा विलक्षण प्रकाशित झाला होता. बोलतां बोलतां तो जेव्हां गप्प झाला तेव्हां तो बोलत राहिला असता तर

आपल्याला हवं होतं असा भाव तिच्या मुद्रेवर दिसत होता. त्यानं पुढें केलेलीं पुस्तकं तिनं हातीं घेतलीं आणि त्याचा निरोप घेऊन ती निघून गेली.

ती गेल्यावर चंचलेच्या तोंडून संध्याकाळीं ऐकलेल्या गाण्याचा पीहला चरण पुन्हां एकदां मोठ्यानं म्हणावा म्हणून राजानं प्रयत्न केला. पण त्याच्या कंठांतून तेच स्वर नीटसे येईनात.

त्याची मन:स्थिति विचित्र झाली होती.

दोन घटकांच्या अंतरानं त्यानं स्त्रियांचे दोन भिन्न भिन्न नमुने पाहिले होते.

एकीवर तो स्वत: अनुरक्त झाला होता, आणि दुसरी त्याच्यावर अनुरक्त झाल्याची त्याला कल्पना नव्हती.

त्या दोन स्त्रियांचा त्याच्या स्वत:च्या जीवितावर किती मोठा परिणाम होणार होता तें तर त्याला मुळींच माहित नव्हतं !

———

[ ८ ]

यानंतर सुमारें सहा महिन्यांनीं-म्हणजे १९१८ च्या मार्च महिन्यां-तील एके दिवशीं सकाळीं अकरा वाजण्याच्या सुमारास ××× कॉलेजांत मुख्य हॉलपुढच्या प्रशस्त गॅलरींत पहिल्या वर्षाचे विद्यार्थी वार्षिक परीक्षेसाठीं जमूं लागले होते. पांच दहा मिनिटांत घंटा होणार होती, व ती होतांच ही सर्व विद्यार्थि मंडळी आंत हॉलमध्यें जाऊन आपापल्या जागीं बसून पेपर लिहावयास लागणार होती. सबंध वर्षभर स्मृतींत साठवलेलं ज्ञान त्यांस आंत जाऊन पेपर हातीं येतांच योग्य प्रकारें कागदावर लिहून दाखवा-यचं होतं; व शर्यतींत सुटणाऱ्या घोड्याला ज्याप्रमाणें अगदीं शर्यत सुटण्याच्या क्षणापर्यंत घोडेस्वार गोंजारून उत्तेजन देत असतो त्याप्रमाणें घंटेची प्रतीक्षा करणारी गॅलरींतली ही विद्यार्थिमंडळी आपल्या स्मृतीला अखेरचा उजळा देण्यांत गुंतली होती. मात्र आपापल्या टिपणवह्या पुढें घेऊन त्यांतल्या

महत्त्वाच्या टिपणांवरून घाईची नजर फिरवितां फिरवितां त्या विद्यार्थ्यांच्या आपापसांत अभ्यासाव्यतिरिक्त इतरही गप्पा चालल्या होत्या. कोणी यंदा पुण्यास उन्हाळा लवकर कसा सुरू झाला याबद्दलचं आश्चर्य एकमेकाजवळ बोलून बोलून दाखवीत होते; कोणी त्या दिवशीं महायुद्धाच्या ज्या बातम्या वर्तमानपत्रांत आल्या होत्या त्यांची चर्चा करीत होतें; कोणी परीक्षेनंतरच्या उन्हाळयाच्या मोठ्या सुटींत कोणता उद्योग अगर चैन करायची त्याविषयींचे बेत ऐकमेकांस विचारीत अगर सांगत होते; आणि कोणी त्या दिवशींच्या पेपरमध्यें कोणते प्रश्न येणार याबद्दलचे आपापले तर्क बोलून दाखवतां दाखवतां तो पेपर काढणारा अध्यापक राजाभाऊ सरंजामे याच्याबद्दलची खाजगी माहिती देत होते.

असल्या गोष्टी विद्यार्थी एकमेकांत बोलूं लागले, कीं त्यांना सत्यनिष्ठेचा तोल फारसा रहात नाहीं. आपल्या अध्यापकाबद्दल आपल्याला जेवढं माहित आहे तेवढंच सांगण्यापेक्षां इतर सर्वांपेक्षां आपल्याला अधिक माहिती आहे असं भासविण्याचीच इच्छा प्रत्येक विद्यार्थ्याला बहुतकरून होते. असं असल्यामुळं ××× कॉलेजच्या गॅलरींत जमलेल्या त्या विद्यार्थ्यांपैकीं पांच सहाजण एक छोटासा घोळका करून आपला प्रिय अध्यापक राजाभाऊ सरंजामे याच्याबद्दल जेव्हां बोलूं लागले तेव्हां त्यांच्या संभाषणांत सत्य आणि असत्य या दोन गोष्टींचं मोठं विचित्र मिश्रण उत्पन्न झालं.

एकजण म्हणाला,

"अरे ब्राउनिंगचं तें प्रेमगीत तुम्ही नीट करून ठेवलं आहे ना? आजच्या पेपरमध्यें तें अगदीं खचित येणार. वाटेल ती पैज मारायला तयार आहें मी."

"अरे वा, राजाभाऊंच्या घरीं जाऊन त्यांनीं काढलेला पेपर चोरून पाहिल्यासारखं बोलतो आहेस कीं अगदीं!"

"अरे, जी गोष्ट उघड दिसते आहे ती चोरून कशाला पाहायला पाहिजे आहे?"

"म्हणजे कसं म्हणतोस?"

" येवढं कळत नाहीं तुम्हां लोकांना ? अरे, पेपरमध्यें कोणते प्रश्न येणार याचा आदमास करताना ज्या अनेक गोष्टी लक्षांत घ्यायच्या असतात त्यांतली एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे पेपर काढणाऱ्या माणसाची तो काढायच्या वेळची मनःस्थिति."

" शाबास ! आम्ही इतके दिवस इतकंच समजत होतो, कीं काव्याचा अभ्यास करतांना तें लिहिणाऱ्या कवीची त्या वेळची मनःस्थिति समजून घेणं अवश्य आहे. पण आतां हा सिद्धांत तूं पेपरलाही लावूं पहातोस होय ? अन् समज, तुझा हा सिद्धांत एक वेळ खरा असला, तरी आपले अध्यापक राजाभाऊ सध्यां प्रेमपाशांत सापडले आहेत ही तुझी कल्पना खरी कशावरून ?"

" कशावरून ? 'मनोरंजन' मासिकाच्या ताज्या अंकातली " प्रेमपाश " ही त्यांची कविता वाचली नाहींस वाटतं ?"

" ती वाचली रे ! पण त्या कवितेवरून काय सिद्ध होणार ? प्रेमगीतं रचणारा कवि प्रेमांत सांपडलेला असतो असं थोडंच आहे ? उलट आपल्या मराठी काव्यांत प्रेमगीतांचा अगदीं सुकाळ झाला असला तरी ती रचणाऱ्या एका कवीला तरी खऱ्या स्त्रीप्रेमाचा अनुभव असेल कीं नाही मला शंका आहे. राजाभाऊंच्या एका कवितेवरून ते सध्यां प्रेमांत सांपडले आहे असं मानायला मी मुळींच तयार नाहीं !"

" तूं काय आंधळा आहेस, का बहिरा आहेस, कां दोन्ही आहेस ?"

" म्हणजे काय ?"

" नाहीं तर काय ? जी गोष्ट साऱ्या गांवाला दिसते अन् जिच्याबद्दल गांवांतल्या साऱ्या लोकांत बुजबुज चालली आहे ती तुला माहीत नाहीं ? चंचला बादेकर हें नांव तरी ऐकलं आहेस कां ?"

" वा, म्हणजे काय ? तिचं गाणंसुद्धां ऐकलं आहे मी !"

" अरे, चंचलेचं एकटीचं नांव हल्लीं कुणी घेत नाहीं बरं ! चंचला आणि राजाभाऊ या दोन नांवांची एकत्र चर्चा होत असते हल्लीं गांवांत. अन् अशी

चर्चा व्हावी याला कारणही सबळ आहे. राजाभाऊ इथें कॉलेजांत तीन तास शिकवतात, पण तिकडे चंचलेच्या घरीं चार चार तास असतात! मी त्याच आळींत रहातों ना. मला विचार?"

"असेल बुवा खरं तुझं म्हणणं. पण आपल्याला काय करायचं आहे?"

"काय करायचं आहे कसं? पेपर सोडवायचा आहे कीं नाहीं? त्या-वरनं तर गोष्ट निघाली. मी पुन्हां सांगतों तुम्हां लोकांना ब्राउनिंगचं तें प्रेमगीत आजच्या पेपरमध्यें अगदीं नक्की—"

तितक्यांत मोठमोठ्यानं घंटा वाजली, आणि ती चर्चा तशीच टाकून ते विद्यार्थी हॉलमध्यें घाईघाईनं प्रवेश करणाऱ्या इतर विद्यार्थ्यांच्या गर्दींत सामील झाले.

पेपरमध्यें ब्राउनिंगच्या प्रेमगीतावर खरोखरच प्रश्न आला होता!

ज्या विद्यार्थ्यानं त्याबद्दलचा तर्क बोलून दाखवला होता त्यानं टीप-कागदाची एक लहानशी गोळी करून त्याच्याशीं मघाशीं वाद घालणाऱ्या मित्राला मारली, व त्या मित्रानं दचकून वळून पहातांच डोळ्याच्या खुणेनं म्हटलं,

"बघ लेका, आला कां नाहीं प्रश्न!"

"आला खरा बाबा!" त्या मित्रानं नेत्रपल्लवी केली.

* * *

याच वेळीं—म्हणजे अकरा वाजण्याच्या सुमारास चंचला आपल्या खोलींत अंथरुणावर अंग टाकून राजाभाऊबद्दलचे विचार करीत होती.

त्या दिवशीं कसला तरी मुसलमानी सण असल्यामुळं इस्माएल तिला शिकवायला येणार नव्हता. अशा सुटीच्या दिवशीं नऊ दहा वाजेपर्यंत झोंपून रहाण्याची तिला फार आवड होती. पोरकट आळस हा तिच्या स्वभा-वांतला एक विशेष होता. आजही ती अशीच दहाच्या सुमाराला उठली होती. उठल्यावर तिनं धड तोंडही धुतलं नव्हतं. अर्धवट अंधाऱ्या स्वयंपाक-घरांतल्या एका खिडकींत ठेवलेल्या आरशांत बघून तिनं आपला अंबाडा

कसाबसा गुंडाळला होता, अन् घरांतल्या घाणेरड्या मांजराशीं खेळत स्वयंपाकघराच्या ओलसर जमिनीवर ती किती वेळ तरी आळसून बसली होती. सैंपाकीणबाईनं तिला दिलेला चहा बिघडल्याबद्दल तिनं तिच्यावर बरंच तोंड सोडलं होतं, अन् तिची आई तिथं येऊन जेव्हां तिला म्हणाली, " दुसऱ्यानं केलेला चहा तुला आवडत नाहीं, तर स्वतः चहा करून घ्यायला तुला काय झालं ? " तेव्हां आईशींही भांडायला तिनं कमी केलं नव्हतं ! आपण सुंदर आहोंत, नाजूक आहोंत तेव्हां सगळ्यांनीं आपल्याला फुलासारखं झेललं जपलं पाहिजे असं तिला वाटत असे. तिच्या आईनं तिला पुन्हां चहा करून दिला तोहि तिच्या पसंतीस आला नव्हता. तो पुरता न पितां तसाच अर्धवट टाकून ती जागेवरून उठली होती ! तिची आई त्यावर कांहीं बोलली नव्हती. आपली मुलगी हट्टी अन् लहरी आहे हें तिला माहीत होतं, अन् तिच्याशीं बोलावं केव्हां अन् न बोलतां स्तब्ध रहावं केव्हां हें तिला कळत होतं.

चंचला सैपाकघरांतून बाहेरच्या दिवाणखान्यांत यायला आणखी पोस्ट-मननं तिच्या नांवचं एक पत्र तिथं टाकायला एक गांठ पडली होती. पत्रावरच्या अक्षरावरून तें राजाभाऊचं आहे हें तिनं ओळखलं होतं, व तें तिनं फोडलं तेव्हां तिच्या दृष्टीस पुढील मजकूर पडला होताः—

" गेल्या तीन दिवस मी बारीक तापानं थोडा आजारी होतों. त्यामुळं मला तुझ्याकडे येतां आलं नाहीं. उद्यां दिवसभर मला कॉलेजचं काम आहे. त्यामुळें यायला सवड होणार नाहीं. पण रात्रीं बहुतेक येईन. तूं कदाचित् वाट पहात असशील म्हणून कळवलं आहे. "

तें पत्र तसंच हातांत ठेवून चंचला आपल्या खोलींत गेली आणि अंथरुणावर पडली. पडल्या पडल्या ती राजाभाऊबद्दल विचार करूं लागली......

" तूं वाट पहात असशील म्हणून कळवलं आहे " असं राजाभाऊनं लिहिलं होतं खरं, पण खरं म्हणजे ती वाट पहात नव्हती. गेल्या तीन दिवसांत राजाभाऊ तिच्याकडे आला नव्हता याबद्दल तिच्या मनाला कांहींच वाटलं नव्हतं. आश्चर्य वाटलं नव्हतं, राग आला नव्हता, किंवा त्यानं आतां लवकर

यावं अन् भेटावं असंही तिच्या मनांत आलं नव्हतं. किंबहुना 'तूं वाट पहात असशील' असं त्यानं कां लिहावं हेंच चंचलेला कळेना. ज्या मनोवृत्तीच्या उद्‌भवानंतर स्त्री पुरुषाची वाट पहाते, ती वृत्ति चंचलेच्या ठिकाणीं नव्हती. राजाभाऊच्या बाबतींत नव्हती येवढंच नव्हे तर कुठल्याच पुरुषाच्या बाबतींत नव्हती. ती वयानं आतां लहान होती असं नव्हे. पण कदाचित् असं असेल, कीं काव्यमय प्रीतीचा उद्‌भव व्हायला केवळ वयाची योग्यता पुरत नाहीं, तर मनाचे कांहीं विशिष्ट संस्कार अन् अंतःकरणाचे धर्म आवश्यक असतात; आणखी चंचलेल्या ठिकाणीं त्यांचा पूर्ण अभाव होता. प्रीतिजन्य विविध भावनांचीं प्रतिबिंबं उमटायला माणसाचं अंतःकरण सजल असावं लागतं, चंचलेचं अंतःकरण तसं नव्हतं. निसर्गानं निर्माण केलेल्या अपवादात्मक स्त्रियां-पैकीं ती कदाचित् असूं शकेल; पण तिचं अंतःकरण रुक्ष भूमीसारखं होतं येवढं खरं......

त्यामुळं रोज येणारा राजाभाऊ तीन दिवस आला नाहीं तर त्याचं तिला आश्चर्य वाटावं, किंवा तिला हुरहुर लागावी हें संभवनीय नव्हतं. गेल्या पांच सहा महिन्यांत राजाभाऊ तिच्याकडे अधिकाधिक आकर्षित होत गेला होता; स्वतःचा मनोभाव त्यानं कित्येक वेळां कमी अधिक व्यक्तही केला होता हें खरं. पण राजाभाऊचं आपल्यावर प्रेम आहे अशी शंका चंचलेला आली नव्हती. सामान्य बुद्धिचातुर्य अंगीं असणाऱ्या कोणत्याही तरुण स्त्रीनं जें ओळखलं असतं तें तिला ओळखतां आलं नव्हतं. कारण ती खरोखरच सामान्य नव्हती. तिच्या ठिकाणचं देहसौंदर्य जसं असामान्य होतं त्याप्रमाणें तिच्या बुद्धीचं मंदत्व आणि अंतःकरणाचा थंडपणा याहि गोष्टी असामान्य होत्या. चंचला म्हणजे निसर्गाचा एक विलक्षण चमत्कार होता; आणि दुर्दैव हेंच, कीं राजाभाऊ या गूढ चमत्काराकडे आकर्षिला जात होता.

'तूं माझी वाट पहात असशील' या शब्दांनीं सामान्यतः कोणत्याहि स्त्रीचं अंतःकरण उचंबळून आलं असतं. पण चंचलेच्या बाबतींत तसं झालं नाहीं. ती मनाशीं येवढंच म्हणाली,

"इश्श्! मी कधीं यांची वाट पहातें आहें? कांहीं तरीच यांचं लिहिणं!"

प्रीतीचा उलट जबाब देणं दूरच राहिलं, पण राजाभाऊसारख्या माणसाची प्रीति ओळखण्याचंसुद्धां सामर्थ्य चंचलेच्या ठिकाणीं नव्हतं. तिला कधींमधीं येवढीच शंका आली होती, कीं राजाभाऊ आपल्या नादीं आहे कीं काय? ज्या धंद्यांत तिचा जन्म झाला होता त्यांतल्या मुलींना या गोष्टी ओळखण्याची दृष्टि घरांतल्या मोठ्या माणसांनीं दिलेली असते. पण या दृष्टीबरोबरच असाहि हिशोब त्यांच्या मनांत बिंबविलेला असतो, कीं आपल्या नादीं लागणारा पुरुष श्रीमंत आहे कीं नाहीं हें आपण प्रथम पाहिलं पाहिजे! राजाभाऊ श्रीमंत नव्हता. अर्थात् तो आपल्या नादीं लागला असावा अशी जरी चंचलेला कित्येकदां शंका आली तरी त्या शंकेच्या नादीं तीं कधींच लागली नव्हती. राजाभाऊला आपल्याकडे अधिक ओढून घेण्यासाठीं आपण कांहीं केलं पाहिजे असा विचार तर तिच्या मनाला कधींच शिवला नव्हता.

उलट राजाभाऊ ज्या तऱ्हेनं तिच्याशीं वागे, त्याचा तिच्या असंस्कृत मनाला त्रासच होत असे, आणि तो उघड दाखवायला ती कमी करीत नसे. आपण लिहिलं वाचलं पाहिजे, इंग्रजीसुद्धां शिकलं पाहिजे, गाण्याखेरीज हर-तऱ्हेच्या विषयांत लक्ष घातलं पाहिजे, लोकांचीं मतं समजून घेतलीं पाहिजेत, आपलीं बनविलीं पाहिजेत असा राजाभाऊनं नेहमीं आग्रह कां करावा तें तिला कधीं समजत नसे. त्यांचा तो आग्रह तिला एखाद्या छळासारखा वाटे. कित्येकदां ती त्याला अपमानास्पद असं कांहीं तरी बोलेसुद्धां. तसं ती बोलली म्हणजे त्याच्या मुद्रेवर जी क्लेशाची छाया येई तिचा अर्थ कळण्याचं सामर्थ्य तिच्या ठिकाणीं नव्हतं. तिच्या मनांत येई, हे काय म्हणून असे माझ्या राशीला लागतात? कशासाठीं माझ्यामागं यांचा हा सासुरवास?......

आतां जेव्हां ती राजाभाऊचं पत्र वाचून पलंगावर पडली, तेव्हां त्याच्याबद्दलचे असलेच विचार तिच्या मनांत आले.

तिनं घड्याळांत पाहिलं तों बारा वाजायला आले होते.

तिची आई दाराशीं डोकावली व म्हणाली,

"चंचल, ऊठ, अंगबिंग धुवायचं आहे कीं नाहीं तुला आज? जेवण तयार आहे."

चंचलेनं जांभई दिली, हातांतलं पत्र पायगतीं टाकून दिलं आणि आळोखे पिळोखे देऊन दोन्ही हातांची मिठी डोक्याखालीं घेत म्हटलं,

" पडूं दे बाई जरा. काय ग तुझा हा त्रास ? "

तितक्यांत बाहेरच्या दाराशीं कुणी तरी ओरडलं,

" बाई आहेत कां घरांत ? "

चंचलेच्या आईनं खोलींतनंच विचारलं,

" कोण आहे ? "

" मी आहे बाई. बनारसी पातळं आलीं कीं दाखवायला आणा म्हणाला होतात ना ? आणलीं आहेत. "

" अग बाई ! " असं उद्गारून पलंगावरून एकदम उठत चंचला म्हणाली, " आई, टापरे शेटजींच्याकडला माणूस आलेला दिसतो आहे. आतां अंग धुणं, जेवण सगळं राहूं दे बाई. आधीं पातळ घ्यायचं अन् मग सगळं.

तिनं आपल्या आईला ओढीतच बाहेरच्या दिवाणखान्यांत नेलं !

याच तिच्या छानछोकीच्या हव्यासाबद्दल राजाभाऊला तिचा राग येई. पण चमत्कार असा, कीं तिच्या बुद्धीच्या निकृष्टपणाबद्दल आणि अंतःकरणाच्या निर्विकारतेबद्दल त्याला तिचा कितीहि राग आला, तरी तिच्या असामान्य कंठमाधुर्यानं आणि अनुपम लावण्यानं त्याच्या ठिकाणीं उत्पन्न केलेली शारीरिक आसक्ति त्या रागामुळं कमी होत नसे.

किंबहुना, ती आसक्ति म्हणजे जिच्याशीं गेले पांच सहा महिने तो झुंजला होता व पुढेंहि त्याला झुंजावं लागणार होतं अशी एक विचित्र शक्तीच होऊन बसली होती !

* * *

याच वेळीं—म्हणजे बारा वाजण्याच्या सुमारास उमा राजाभाऊबद्दलचे विचार करीत होती.

तिचं घरकाम नुकतंच आटपलं होतं, आतां थोडे हिंडूं फिरूं लागलेले तिचे अण्णा वाचनालयांत गेले होते. आनंद शेजारच्या बिऱ्हाडांतल्या मुलांशीं

खेळायला गेला होता. तिच्या शिवणकामाच्या वर्गात शिकणाऱ्या बायका यायला अजून तास दीड तास अवकाश होता, आणि थोडी विश्रांति घ्यायसाठीं म्हणून ती एका चटईवर भिंतीशीं टेकली होती.

ती केव्हांही अशी एकटी बसली, कीं तिचं मन राजाभाऊबद्दल विचार करूं लागे. याचं कारण कदाचित् असं असेल, कीं राजाभाऊच्या प्रत्यक्ष सान्निध्यांत ती असली, कीं ती विवेकानं आपल्या मनाचा विलक्षण संयम करीत असे, त्याच्याशीं बोलतां चालतांना किंवा त्याच्याविषयीं दुसऱ्यांशीं बोलतांना आपल्या मनांतल्या गुप्त भावना यत्किंचितही प्रगट होणार नाहींत अशी कठोर दक्षता ती घेत असे, आणि त्यामुळं तिला एकांत सांपडला, कीं तिच्या मनांतले दाबलेले सारे विचार एकदम उसळत; आणि त्यांना तसं उसळूं देण्यांत तिला एक प्रकारचं समाधान वाटे. तिच्या एकंदर आयुष्यांत समाधानाला फार थोडी जागा होती, आणि त्यामुळं एकांतांत राजाभाऊविषयींचे विचार करण्याचं समाधान आपण घ्यावं हें उचित नाहीं असं तिच्या विवेकबुद्धीला कितीही वाटलं, तरी तें घेण्याचा मोह तिला आवरतां येत नसे. ते विचार मनांतून दूर करण्याचा ती थोडीशी धडपड करी, पण त्या प्रयत्नाचे क्लेश असह्य झाले, कीं तो प्रयत्न ती सोडून देई आणि राजाभाऊविषयींचे विचार करावयास उत्सुक असणाऱ्या आपल्या मनाला मग ती स्वैर सोडी !

आज राजाभाऊविषयींचे विचार तिच्या मनांत विशेषेंकरून येण्याचं कारण असं होतं, कीं काल व आज तो तिच्याशी थोडासा कठोरपणानं वागला होता. यापूर्वी तिच्याशीं होणाऱ्या त्याच्या वर्तनांत कठोरता कधींच दिसली नव्हती; व गेल्या दोन दिवसांत जी तिला अनपेक्षितपणे दिसली तिच्या कारणाचा तिला काहीच तर्क होईना !

काल संध्याकाळी त्याला थोडासा चहा द्यायसाठीं ती त्याच्या खोलींत गेली होती तेव्हां तो म्हणाला होता,

" आज मला पुष्कळ बरं वाटतं आहे. "

डॉक्टरच्या औषधाची बाटली भरलेलीच्या भरलेली टेबलावर दिसत होती। तिच्याकडे पाहून उमा म्हणाली होती,

" म्हणून लगेच औषध घ्यायचं बंद केलंत वाटतं ? आजच्या दिवस तरी घ्यायला हवं होतं औषध ! "

" फार कडु आहे तें, अन् दर्प तर असा आहे त्याला !..."

" तुम्ही पुष्कळदां अगदीं लहान मुलासारखं बोलतां. औषध कधीं गोड असतं कां ? घ्या. मी देऊं कां डोज ओतून ? "

अंगावर शहारे आल्यासारखं करून राजाभाऊ म्हणाला,

" नको. मला खरंच आज पुष्कळ बरं वाटतं आहे. मी तर मनांत विचार करतो आहे, कीं जरा बाहेर जाऊन यावं. "

" वेड तर नाहीं लागलं तुम्हांला ? दोन दिवसांच्या तापानं अशक्तता आली असणार. बाहेर जायचे श्रम सोसवतील कां ? मी तर म्हणते आतां दोन चार दिवस अगदीं स्वस्थ पडून रहा. "

" पण उद्यां तर कॉलेजांत वार्षिक परीक्षा सुरू होणार अन् मला सुपरव्हिजनच्या कामासाठीं जावंच लागणार. "

" मग तर आज पूर्ण विश्रांति घेणं अधिकच आवश्यक आहे. बाहेर गेलंच पाहिजे असं कांहीं काम नाही ना ? आहे ? "

चंचलेकडे जाऊन येण्याचा आपण विचार करीत आहोंत हें तिला सांगणं राजाभाऊला शक्य नव्हतं. त्यामुळं तो म्हणाला,

" अं......काम नाहीं, पण जरा जाऊन आलों तर बरं वाटेल असं मला वाटतं. "

" छे, असा वेडपणा नका करूं. "

त्यावर त्यानं कांहीं उत्तर केलं नाहीं. तेव्हां तिला वाटलं, कीं आपलं म्हणणं त्यानं ऐकलं.

पण चहा पिऊन झाल्यावर जेव्हां त्यानं साबणानं तोंड धुतलं आणि शर्ट बदलला, तेव्हां तिला पुन्हां शंका आली व तिनं विचारलं,

" हें काय ? ही कसली तयारी ? "

" जरा बाहेर जाऊन येतों. "

" जाण्यावांचून अडलेलं नाहीं म्हणालांत ना ? "

"पण जाऊन आलों तर जरा बरं वाटेल असंहि म्हटलं कीं."

"ती खोटी आहे तुमची कल्पना. खोलींत तीन दिवस सारखं पडल्यानं तुमच्या मनाला आंबल्यासारखं झालं आहे. तेव्हां जरा बाहेर गेलांत तर तुमच्या मनाला बरं वाटेल. पण तुमच्या शरिराला तें सोसायचं नाहीं."

"पण मला जावंसं फार वाटतं आहे."

"तरी जाऊं नका."

"जातों."

"मी नाहीं जाऊं देणार." असं म्हणून त्यानं हातीं घेतलेला कोट त्याच्या हातांतून काढून घेऊन तिनं तो खुंटीवर अडकवला होता.

राजाभाऊनं तिच्याकडे क्रुद्ध नजरेनं पाहिलं होतं अन् म्हटलं होतं,

"पण तुमचा माझ्यावर येवढा जुलूम काय म्हणून ? असा अधिकार काय म्हणून चालवतां आहांत तुम्ही माझ्यावर ?"

यावर कांहीं एक न बोलतां तिनें फक्त एक आर्जवाचा कटाक्ष त्याच्याकडे टाकला होता, आणि ती त्याच्या खोलींतून बाहेर पडली होती.

त्यानं तिचं ऐकून बाहेर जाण्याची आपली कल्पना सोडून दिली होती. पण "असा अधिकार काय म्हणून चालवतां आहांत तुम्ही माझ्यावर ?" हे त्याचे कठोर शब्द आणि ते उच्चारतांना त्याच्या चर्येवर उमटलेला राग उमाला लवकर विसरतां आला नव्हता.

आज कॉलेजांत तीन तास सुपरव्हिजनचं काम त्याला करावं लागणार होतं; म्हणून त्यानं थोडंसं खाऊन जावं असा तिनं त्याला सकाळीं आग्रह केला होता. तो म्हणाला होता,

"मला अगदीं वासना नाहीं. तोंडाला चव नाहीं."

"चांगलं चवदार करून देतें, पहा तरी."

"कॉलेजांत घेईन मी चहा आणि ब्रेड."

"मग दुपारच्या वेळेस खाण्यांत काय अर्थ आहे ? आतांच थोडंसं खा."

"नको मी तसाच जातों."

"मी नाहीं जाऊं देणार."

हें ऐकतांच राजानं कालच्यासारखीच क्रुद्ध नजर केली होती आणि कालचेच शब्द उच्चारले होते,

"असा अधिकार काय म्हणून चालवतां तुम्ही माझ्यावर ?"

आणि त्याच्या कालच्या व आजच्या वागण्यांत फरक असा होता, की काल त्यानं जरी कठोर शब्द उच्चारले होते तरी तिचं ऐकलं होतं. पण आज तिचा आग्रह न जुमानतां, कांहीं न खातां तो कॉलेजांत तसाच गेला होता.

भिंतीला टेकून चटईवर बसून विचार करतां करतां उमाला हे दोन्ही प्रसंग पुन:पुन्हां आठवत होते, आणि विशेषत: राजाभाऊचा तो कठोर प्रश्न तिच्या मनांत पुन:पुन्हां येत होता.

ती स्वत:ला विचारूं लागली, "यांच्यावर अधिकार गाजवण्याच्या आविर्भावानं यांच्याशीं मी वागतें आहे कां ?"......

अधिकार !......

तिला मनांतल्या मनांत त्या शब्दाचा चमत्कार वाटला. ती विचार करूं लागली,

या जगांत कुणाचा कुणावर अधिकार असतो बरं ? आईचा लेकीवर ? पुत्राचा पित्यावर ? पत्नीचा पतीवर तरी ?......

मग, राजाभाऊ, मी तुमच्यावर कसला अधिकार चालवणार ?...

ज्या मला स्वत:च्या आयुष्यावरही चालवायला हवा तेव्हां अधिकार चालवतां आला नाहीं, ती मी तुमच्यावर कसला अधिकार चालवणार ?...

तिला आपल्या आयुष्यांतले दोन महत्त्वाचे प्रसंग आठवले, आणि त्या प्रत्येक प्रसंगीं आपण झंझावातांत सांपडलेल्या दुबळ्या प्रवाशाप्रमाणें आपल्या इच्छेविरुद्ध कशा पुढें पुढें ढकलल्या गेलों होतों, आणि आपला

जीवितप्रवास सध्यांच्या या अनुकंपनीय दशेपर्यंत कसा येऊन पोंचला होता तें मनांत येऊन तिच्या डोळ्यांतून आसवं ओघळूं लागलीं.

सहा सातच वर्षांपूर्वी उमा ही कॉलेजांत शिकणारी आनंदी, स्वच्छंदी, हुषार मुलगी होती हें आज कुणाला सांगून तरी खरं वाटण्यासारखं होतं कां? त्या वेळेस तिचे आण्णा श्रीमंत नसले तरी सधन होते, आणि ती स्वतः आपल्या महत्त्वाकांक्षेचे आणि मनोरथांचे पतंग आकाशांत किती तरी उंच उंच उडविण्यांत गर्क झालेली होती! पण अण्णांना त्याच वेळीं एक चांगलं स्थळ कुणीतरी सांगितलं. तिथं उमा जन्माची सुखी होईल असं त्यांना वाटलं. पदवीचा अभ्यास पूर्ण करण्याची लेकीची कल्पना त्यांनीं ऐकली नाही. हुंड्याची अडचण होती ती आपली लहानशी जमिन विकून अन् सांठवलेला सारा पैसा एकत्र करून त्यांनीं भागवली. त्यांनीं तिचं लग्न करून टाकलं. उमाला कुठं आपल्या आयुष्यावर अधिकार चालवितां आला?......

पुढं दोन वर्षांनीं उमाच्या पोटीं आनंद आला, पण त्याच्या आधींच तिच्या संसारांतला आनंद नष्ट होऊं लागला होता. व्यसनी पतीशीं संसार करणं तिला अधिकाधिक क्लेशदायक व्हायला लागलं. तिच्या नवऱ्यानं स्वतःची सगळी इस्टेट उधळून टाकली. एक दोन फौजदारी गुन्ह्यांतही तो सांपडला. तरीही त्याच्यापासून ती दूर झाली नसती. त्याची सेवा करणं हें आपलं पहिलं कर्तव्य आहे असं ती आपल्या मनाला शिकवून राहिली असती. पण अखेर तिचा नवरा जेव्हां निर्दय पशूसारखी मारहाण करूं लागला, आणि आपल्या मुलाच्या शारीरिक सुरक्षितेबद्दलसुद्धां जेव्हां तिला चिंता वाटूं लागली, तेव्हां एके दिवशीं पतिगृह सोडून ती आपल्या अण्णांच्या घरीं रहा-वयास आली! या प्रसंगीं तरी तिला आपल्या आयुष्यावर अधिकार चालवितां आला होता काय?......

मग अशी ही उमा राजाभाऊवर कसला अधिकार चालविणार?... ...अधिकार!......

तिनं पदरानं डोळे टिपले आणि मान वर करून समोर पाहिलं. तिच्या दारांतून राजाभाऊच्या खोलीची एक खिडकी दिसत होती. कितीदां तरी त्या

खिडकीकडे ती टक लावून पहात बसत असे. राजाभाऊची हालचाल तिला त्या खिडकींतून दिसत असे; किंवा निदान खुंटीवरचे त्याचे कपडे, हातांत धरायची त्याची काठी अन् त्याच्या पुस्तकांच्या कपाटाचा एक कोपरा तिला दिसत असे त्या वस्तु पहातांना तिच्या मनांत अनेक वेळां येई, कीं त्यांकडे ज्याप्रमाणं आपण दुरून पहात आहोंत त्याप्रमाणेंच राजाभाऊकडेही आपण फक्त दुरूनच पाह्यला पाहिजे, आपलं त्याच्यावर जडलेलं प्रेम कधीं सुफलित होणं शक्य नाहीं; इतकंच नव्हे, तर आपल्या प्रेमाची त्याला ओळख देणं म्हणजेसुद्धां त्याच्या सुंदर आयुष्याचा एक प्रकारें घात करण्यासारखं ठरेल! आपण येवढीच तीव्र इच्छा मनाशीं धरावी, कीं दुरून का होईना राजाभाऊ सदैव आपल्या दृष्टीस पडावा!

आत्तां हेच विचार उमाच्या मनांत आले, व समोरच्या त्या खिडकीकडे ती तशीच किती वेळ तरी पहात राहिली!

* * *

याच वेळीं—म्हणजे सुमारें दीड वाजतां ××× कॉलेजचे प्रिन्सिपल आणि ज्या विषयाचं अध्यापन राजाभाऊ करीत असे त्या विषयाचे वृद्ध वरिष्ठ अध्यापक या दोघांत प्रिन्सिपलसाहेबांच्या कचेरींत राजाभाऊबद्दलचंच बोलणं चाललं होतं.

प्रिन्सिपल म्हणत होते,

" राजाभाऊच्या हुषारीबद्दल प्रश्नच नाहीं हो! तुमचा तो अतिशय आवडता का आहे हें मला समजतं अन् माझंही त्याच्यावर प्रेम नाहीं अशी समजूत तुम्ही करून घेऊं नका. पण त्याच्या बाबतींत मी कसा पेंचांत पडलों आहे तें तुम्ही लक्षांत घ्यायला पाहिजे. तुमचं आतां वय झालं, अन् अध्यापनाच्या कामातनं पुढच्या जून महिन्यापासून निवृत्त होण्याची तुमची इच्छा आहे. पहिल्यापासून आपली सर्वांची कल्पना अशी कीं तुमच्या जागीं राजाभाऊची नेमणूक करतां येईल, अन् ती केली कीं सगळं कांहीं ठीक होईल. या वर्षी राजाभाऊला अध्यापनाचं थोडंसं काम आपण दिलं तें याच कल्पनेनं. त्यानं तें उत्तम बजावलं यांतही शंका नाहीं. विद्यार्थ्यांत तो अतिशय

लोकप्रिय झाला आहे हें मला स्पष्ट दिसतं. पण हें सगळं जरी खरं असलं तरी—"

इतकं बोलून प्रिन्सिपल थोडेसे थांबले. आत्तांपर्यंत ते जें बोलले त्यापेक्षां यापुढं ते जें बोलणार होते तेंच अधिक महत्त्वाचं होतं, व त्या बाबतींत ज्या वृद्ध अध्यापकाशीं आपण बोलत आहोंत त्यांचा आपला मतभेद होण्याचा संभव आहे अशा कांहींशा कल्पनेनंच ते आपलं वाक्य अर्धवट सोडून किंचित् थांबले असावेत. अशा थांबण्याच्या वेळीं माणूस दुसऱ्याकडे लावलेली दृष्टि बाजूला वळवितो त्याप्रमाणं प्रिन्सिपलनींहि समोर बसलेल्या अध्यापकां-कडे पहायचं सोडून दृष्टि खालीं केली, आणि उगीचच्या उगीच तांबडी जांभळी पेन्सिल हातांत उचलून तिचा टेबलावर टक्टक् असा आवाज केला.

समोर बसलेले वृद्ध अध्यापक म्हणाले,

"तरी काय? स्पष्ट बोला ना—"

"हो, स्पष्ट बोलायचीच वेळ आहे. राजाभाऊची नेमणूक करतांना केवळ त्याची विद्वत्ता अन् अध्यापनाचं कौशल्य येवढंच पाहून चालणार नाहीं, एक जबाबदार शिक्षणसंस्था या नात्यानं कॉलेजची इभ्रत मला प्रत्येक गोष्टींत संभाळली पाहिजे. अन्...अं...तुम्हाला कदाचित् रुचणार नाहीं पण बोलतोंच, कीं कॉलेजच्या अध्यापक वर्गांत राजाभाऊला कायमचं सामील करून घेतल्यानं आपल्या संस्थेचा लौकिक कमी तर होणार नाहीं अशी काळजी वाटावी असं राजाभाऊचं सध्यांचं वर्तन आहे. अं...माझ्या म्हणण्याचा अर्थ तुमच्या लक्षांत आलाच असेल......"

"हो. राजाभाऊ संगीताचा अभ्यास करतो हें तुम्हांला अन् आपल्या सहकारी अध्यापकांपैकीं कित्येकांना अगदीं नापसंत आहे हें मला माहीत आहे!"

"नुसत्या अभ्यासावर थांबलेलं नाहीं."

"मग आणखी काय? एका नायकिणीच्या घरीं त्यानं फार येणं जाणं ठेवलेलं आहे हेंच कीं नाहीं?"

" हो. राजाभाऊचं हें वर्तन आपल्या संस्थेच्या पुष्कळशा तहाहयात सभासदांना अगदी गर्हणीय वाटतं, आणि राजाभाऊला संस्थेंत कायमचा घेण्याचा ठराव ते मंजूर होऊं देणार नाहींत अशी मला भीति वाटते. "

" हे पहा प्रिन्सिपलसाहेब, माझीं मतं या बाबतींत विचित्र आहेत हे तुम्हांला माहीतच आहे. कॉलेजांतला अध्यापक आपला फुरसतीचा वेळ कसा घालवतो, स्वतःला कोणत्या विषयांचा नाद लावून घेतो, अन् कुठें जातो येतो या गोष्टीचा अध्यापक या नात्यानं त्याची जी योग्यता असेल तिच्याशीं काय संबंध येतो मला कांहीं कळत नाहीं; अन् लोकांनीं तो कां जोडावा, अन् जोडला तर तुम्ही जबाबदार अधिकाऱ्यांनीं त्या मूर्ख लोकापवादाला— "

" अहो, पण राजाभाऊच्या बाबतींत लोकापवाद कुठल्या थराला पोंचला आहे माहीत आहे ना तुम्हांला ? त्या नायकिणीवर त्याचं प्रेम बसलं आहे असं लोक उघड उघड बोलतात ! "

" मी म्हणतों प्रेम बसलं आहे येवढंच का, तो तिच्याशीं लग्न करणार आहे असंसुद्धां आपण गृहीत धरूं. पण तसं त्यानं केलं, तरी अध्यापक या नात्याची त्याची योग्यता एकदम कमी कशी होते, अन् संस्थेच्या इभ्रतीला धक्का कसा पोंचतो हें मला समजत नाहीं. "

त्यांचे हे शब्द ऐकून प्रिन्सिपल त्यांच्याकडे विस्मयानें पहातच राहिले, म्हणून ते पुन्हां म्हणाले,

" खरंच समजत नाहीं. "

" तुम्हींच असं म्हटल्यावर मग काय बोलायचं ? "

" मला जें मनापासून वाटतं ते मी बोललों. नाहीं तरी सगळ्या पुण्यानं 'सिनिक' ही पदवी मला दिलीच आहे. 'सिनिक' म्हणजे काय ? लपवाछपव न करतां स्पष्ट विचार करणारा अन् बोलणारा ! असं बोलणं मला आवडतं यांत शंकाच नाहीं. वेळच आली म्हणून तुम्हांला विचारतो, ज्या या आपल्या कॉलेजच्या नैतिक इभ्रतीचा येवढा बागुलबोवा तुम्ही करतांहात, त्याच्याच एका पूर्वीच्या प्रिन्सिपलनी एका विद्यार्थिनीला खाजगी शिकवणी

देतां देतां तिच्याशीं लग्न केलं असा लोकापवाद होता ना? अन् तसंच एका प्रोफेसरांनीं एक सोडून तीन लग्न केलीं ना? या गांवांतल्याच दुसऱ्या एका कॉलेजच्या प्रिन्सिपलचा एका अध्यापकाच्या पत्नीशीं प्रेमसंबंध असल्याचा बोभाटा थोडा का होता? आणि तिसऱ्या एका कॉलेजचे प्रिन्सिपल नांवाला ब्रह्मचारी पण चांगलेच संसारी होते, हेंहि तुम्हांला माहीत असेलच कीं? या व्यक्तींच्या बाबतींत त्यांच्या वर्तनानं कॉलेजची इभ्रत नाहीशी झाली कां? मला तरी माहीत नाही झाल्याचं! मग राजाभाऊच्या बाबतींत तुम्ही काय सांगतांहा इभ्रतीच्या गोष्टी!"

प्रिन्सिपलनी पुन्हां तांबडी जांभळी पेन्सिल उचलली आणि टेबलावर टक् टक् असा आवाज केला. किंचित् थांबून ते म्हणाले,

"आपल्या संभाषणाला भलतंच वळण मिळालं. मी तुम्हांला आज मुद्दाम बोलावलं तें अशा हेतूनं—"

"कीं राजाभाऊला चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याचं काम माझ्यावर सोपवावं, माहीत आहे मला. तुमच्या इच्छेप्रमाणं मी करणार नाही असं समजूं नका. पण राजाभाऊनं माझं ऐकलं नाही, अन् आपलं सध्यांचंच वर्तन चालूं ठेवलं, तरी त्याला कायमचा अध्यापक म्हणून घ्यायला तुम्हांला हरकत वाटूं नये हें तुमच्या मनावर बिंबविण्यासाठीं मी हें इतकं बोललों!"

"नाही, तुम्ही बोललांत त्याचा राग नाही मी मानीत. उलट त्याची समजूत घालायची तयारी तुम्ही दाखवतां याबद्दल मला फार आनंद होतो आहे. अहो माझं अन् राजाभाऊचं व्यक्तिशः का वाकडं आहे कांही? पण संस्थेसाठी......"

"समजलों! कशाला हवा त्याचा पुन्हां उच्चार अन् पुन्हां वाद!! राजाभाऊला मी बोलावून घेतो घरीं अन् त्याच्याशीं काय बोलायचं तें बोलतों. हें माझं वचन समजा मग तर झालं?"

"केव्हां बोलावतां?"

"आज रात्रीं."

"Thank you."

"थँक्स कसले त्यांत?"

असं म्हणून त्या वृद्ध अध्यापकांनीं प्रिन्सिपलचा निरोप घेतला आणि घरीं परत आल्यावर संध्याकाळीं राजाभाऊकडे चिठी पाठविली, कीं मला तुमच्याशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींबद्दल बोलायचं आहे, येऊन जा.

पण राजाभाऊ त्यांच्याकडे गेला नाहीं. उद्यां येईन म्हणून त्यानं त्यांस निरोप पाठविला. त्या दिवशीं रात्रीं चंचलेकडे जायचं त्यानं ठरवलं होतं. त्याप्रमाणें तो तिच्याकडेच गेला !



# [९]

एखाद्या माणसाच्या हातीं पितळेचा तुकडा द्यावा, तो सोन्याचा असता तर फार बरं झालं असतं असं त्याला वाटावं, त्याचं सोनं करण्याचा वेडा प्रयत्न त्यानं पुष्कळ करावा, आणि तो साधला नाहीं तरी त्याचा नाद मात्र त्याला सोडतां येऊं नये असं झालं म्हणजे त्याची जशी अवस्था होईल तशी राजाभाऊची झाली होती.

त्याच्या सुसंस्कृत बुद्धीला चंचलेच्या बुद्धिहीनत्वाचा तिटकारा येत होता, तिच्या भावनाशून्यत्वाचा विस्मय वाटून राग येत होता, पण तिच्या शरीर-सौंदर्यानं त्याच्यावर जी मोहनी घातली होती तिचे पाश त्याला तोडतां येत नव्हते!

आणि यामुळं तो स्वतःला रोज अधिकाधिक दुःखी मात्र करून घेत होता!

कॉलेजला सुटी झाल्यापासून आतांशा चंचलेकडे जाऊन बसण्यांत दिवसाचा बहुतेक वेळ तो घालवूं लागला होता. आणि तिच्याकडून परत येतांना सुखापेक्षां मनस्तापाचं ओझंच अंतःकरणावर घेऊन तो घरीं येत असे.

आज तो चंचलेच्या घरीं गेला तेव्हां बाहेरच्या दिवाणखान्यांत ती, तिची आई आणखी आजपर्यंत त्यानं कधीं न पाहिलेली दोन तीन पोरसवदा पुरुषमंडळी बसलेली त्याला दिसली. गोव्याकडे चंचलेचं जें मूळ गांव होतं तिकडील ती मंडळी होती असं त्याला नंतर कळलं. त्या तरुणांपैकीं एकानं डग्यावर ठेका धरला होता, आणि दुसरा हलक्या आवाजांत कांहींतरी म्हणून दाखवीत होता. राजाभाऊला प्रथम वाटलं, कीं रागदारींतली एखादी अस्ताई तो चंचलेला ऐकवीत असेल. म्हणून तक्क्याशीं टेकून गादीवर बसल्या बसल्या तो त्या माणसाचं गाणं प्रथम लक्षपूर्वक ऐकूं लागला.

पण त्या गाण्यांतले एक दोन चरण ऐकतांच तो विलक्षण चमकला.

कमालीचे बीभत्स होते ते चरण!

तें तसलं गाणं स्त्रियांच्या समोर पुरुषांच्या तोंडून बाहेर पडूं शकेल अशी त्याची कल्पना नव्हती!

आणि स्त्रिया तें ऐकून घेऊं शकतील अशी तर मुळींच नव्हती!

पण चंचला तर मोठ्या मजेनं तें ऐकत होती. मधूनच त्या गाण्यांतल्या बीभत्स शृंगाराचं कौतुक करण्यासाठीं टाळ्या वाजवून हंसतसुद्धां होती. तिच्या आईलाहि यांत कांहींच वावगं दिसत नव्हतं. उलट ती मूर्ख रंगेल म्हातारी त्या गाण्याला मधून मधून खुशाल वाहवा देत होती!

राजाभाऊच्या वृत्तीला तो सारा प्रकार असह्य झाला. त्याच्या चर्येवर जेव्हां नापसंती स्पष्ट दिसली, आणि स्पष्ट निषेधाचा कटाक्ष जेव्हां त्यानं चंचलेकडे टाकला तेव्हां आपले मोठमोठे मादक डोळे गरगर फिरवीत तिनं त्याला हंसत विचारलं,

"कां? तुम्हांला आवडत नाहीं हें गाणं? तुम्हीं तर कवी आहांत. तुम्हांला फार आवडायला पाहिजे हें!"

" पुरुषांनीं आपापसांत म्हटलं असतं तर नसतं मला त्याचं कांहीं फारसं वाटलं. पण या मंडळींनीं तुला तें म्हणून दाखवावं, अन् तूं खुशाल—"

त्याचं वाक्य पुरं होऊं न देतां चंचलेनं आपल्या सुंदर नाजूक करपल्लवांचे विचित्र विक्षेप केले आणि ती मोठमोठ्यांदा हंसूं लागली.

त्या तिच्या हंसण्याचा आपल्याला कांहीं अर्थच कळत नाहीं असं जेव्हां राजाभाऊनं भ्रुकुटीभंगानं दर्शविलं, तेव्हां हंसणं थांबवून पानाचा डबा पुढें ओढीत तिनं विचारलं,

" आज कोणता सण आहे लक्षांत नाहीं वाटतं आपल्याला रावसाहेब ? आज होळी आहे म्हटलं होळी ! "

" असेल ! "

" असेल काय ? या सणाच्या दिवशीं असलीं गाणींच गायचीं असतात. येवढ्याशा गाण्याला बिचकतां तुम्ही, मग आमच्या गांवच्या अस्सल शिमग्यांत सांपडलांत तर कसं कराल ? "

असं बोलतां बोलतां तिनं पट्टी तयार केली, आणि ती तोंडांत घालीत समोर बसलेल्या पोरसवद्या तरुणांपैकीं एकाला म्हटलं,

" ए विष्ण्या, यांना सांग रे आपल्या गांवच्या शिमग्याच्या सणांतल्या एकेक गमती ! "

" नको, मला त्या गोष्टी ऐकायची मुळींच इच्छा नाहीं."

असं स्पष्ट सांगून राजाभाऊनं तिथली ती घाणेरडी चर्चा बंद केली खरी; पण त्या एकंदर प्रसंगाचा त्याच्या मनाला त्रास झाल्यावांचून राहिला नाहीं.

घरीं येऊन अंथरुणावर पडल्या पडल्या तो विचार करूं लागला,

'या चंचलेच्या बाबतींत कसल्या पाशांत मी सांपडलों आहे ? तिच्यापासून मला काय पाहिजे आहे बरं ? प्रेम ? प्रेम करायची, इतकंच नव्हे तर प्रेम समजायचीसुद्धां कुवत तिच्या अंगीं नाहीं. माझ्या बुद्धीचं समाधान व्हावं असा बुद्धिगुणहि तिच्या ठिकाणीं नाहीं. अन् हें सारं कळत असून मी तिच्याकडे कां ओढला जावा ? कसल्या प्रकारचं हें विचित्र दास्य मी पत्करतों आहे ? अन् कशासाठीं ? केवळ मला तिचा देह हवा आहे म्हणून ? माझ्या वडिलांच्या

ठिकाणीं स्त्रीभोगाची जी असामान्य प्रवृत्ति होती ती माझ्या रक्तांत वंशगुणानं उतरून माझ्याकडून या चमत्कारिक मार्गाचा प्रवास करवीत आहे असं तर नसेल ?...'

तसंच होतं !

तसं नसतं, तर आपल्या वर्तनाचा त्याचा त्यालाच चमत्कार वाटत असतांहि चंचलेच्या नादीं तो राहिला नसता.

आणि त्याचा तो नाद रोजच्या रोज वाढत राहिला नसता !

गोव्यांतल्या आपल्या कुलदेवतेच्या दर्शनासाठीं आपल्या गांवीं जायला चंचला निघाली, तेव्हां तोहि तिकडे जायला निघाला. ती तिकडे महिनाभर रहाणार होती, व इतके दिवस तिच्या दर्शनावांचून आपल्याला राहवणार नाहीं असं राजाभाऊला वाटलं. "चला कीं आमच्याबरोबर आमच्या गांवीं !" असं चंचलेनं सहज म्हणतांच त्यानं तें एकदम कबूल केलं. तो तिच्याबरोबर गोव्यांतल्या तिच्या गांवीं गेला.

आणि तिथें गेल्यावर अल्पावकाशांतच त्याच्या जिवाचा कोंडमारा झाला.

त्या गांवांत निसर्गसौंदर्य विपुल होतं. जिकडे पहावं तिकडे गर्दी करून उभीं राहिलेलीं नारळीचीं उंच झाडं, दिवसाच्या वेगवेगळ्या घटकांना वेगवेगळ्या काळ्या निळ्या अगर तांबूस छटांनीं खुलणाऱ्या लहानमोठ्या टेकड्या, पिकां-वांचूनहि मनोहर दिसणारीं छोटीं छोटीं भात खाचरं, गलिच्छ पण कडेला उगवलेल्या रानफुलांनीं सुशोभित केलेलीं पाण्याचीं लहानमोठीं उथळ डबकीं आणि रात्रींच्या शांत वेळीं आपल्या भरतीचे धीर गंभीर ध्वनी गांवांतल्या लोकांच्या कर्णपथापर्यंत पोंचविणारा मैल दोन मैल अंतरावरचा समुद्र–या साऱ्या गोष्टी कुणाच्याहि हृदयांतलं काव्य उचंबळून सोडतील अशाच होत्या. पण यांखेरीज दुसरं काय होतं तिथं ?......

जें जें होतं तें तें गलिच्छ, तिरस्करणीय, तापदायक असंच होतं. लोकांचं खाणं पिणं घाणेरडं होतं, रहाणी गलिच्छ होती, कल्पना विलक्षण कोत्या होत्या, श्रद्धा मूर्खपणाच्या होत्या–किंबहुना त्या प्रांताला विसाव्या

शतकाचा स्पर्शही झाला नसून पंधराव्या किंवा सोळाव्या शतकांत तिथले सारे लोक रहात आहेत असं राजाभाऊच्या मनांत घडोघडीं येऊं लागलं.

ज्या परिस्थितींत चंचलेचा जन्म झाला होता आणि तिचं बहुतेक लहानपण गेलं होतं, तिचं स्पष्ट दर्शन राजाभाऊला झालं. एखाद्या सुंदर फुलाच्या झुडपांचीं पाळंमुळं कुठल्या घाणींत किती खोल गेलेली आहेत तें दिसलं म्हणजे माणसाच्या मनाला जो विषाद वाटावा तो राजाभाऊच्या मनाला वाटला!

पण चमत्कार मात्र असा, कीं त्याला अजूनही चंचला हवीशीच वाटत होती!

कधीं कधीं तो व ती एकटींच देवदर्शनाला देवळांत, किंवा सहज फिरायला म्हणून टेकडीवर, किंवा समुद्राकडे जात असत.

अशा वेळीं तो कांहीं तरी सुंदर बोलणं काढी पण त्यांत तो जें काय बोलेल तेवढंच असे. तें वाढवण्याची ताकद चंचलेच्या ठिकाणीं कुठें होती? गावांतल्या वाण्याचं अन् ताडीच्या मक्तेदाराचं सकाळीं केवढं भांडण झालं, किंवा देवळांतल्या पुजाऱ्यानं देवस्थानचे पैसे खाल्याचं कसं उघडकीस आलं, किंवा मासळी विकणाऱ्या बायकांना हिशोबांत फसविण्यांत आपली आई किती निपुण आहे असल्याच गोष्टी ती राजाभाऊला सांगूं लागे.

मग त्याला तिचा अगदीं तिटकारा येई, आणि तो आपल्या मनाशीं गुप्तपणें बेत करूं लागे कीं केवळ हिच्या शरीरासाठींच जर माझा मूर्ख जीव येवढा हपापलेला आहे, तर तें घेऊन मी मोकळा कां होत नाहीं?...

पण तोही बेत त्याच्या हातून पार पडेना.

चंचलेबरोबर तो पुण्यास परत आला तों त्याचा पूर्वीचा मनस्ताप जसाच्या तसा कायमच होता.

कॉलेज पुन्हां सुरूं झालं.

अध्यापनाच्या नोकरीचा राजीनामा द्यायची राजाभाऊची तयारी होती. पण त्याच्या वरिष्ठ अध्यापकांनीं त्याला तसं करूं दिलं नाहीं. त्याची कायमची नेमणूक करायची कॉलेजच्या अधिकारी मंडळींची इच्छा नव्हती; पण अध्यापनांत तो किती निष्णात आहे अन् विद्यार्थ्यांना तो किती प्रिय आहे या

गोष्टी माहीत असल्यामुळं त्याला हातचा जाऊं देण्याचाही त्यांना धीर झाला नाहीं. आणखी एक वर्ष राजाभाऊला हंगामी अध्यापक म्हणून काम करूं द्यावं असं त्यांनीं ठरविलं. तें मान्य करण्याची राजाभाऊच्या वृद्ध वरिष्ठ अध्यापकांनीं त्याला गळ घातली, त्याचं मन मोडण्याची राजाभाऊची इच्छा नव्हती.

१९१८ सालचा जून महिना अशा प्रकारें सुरू झाला.



# [१०]

एके दिवशीं सकाळीं उमा राजाभाऊच्या खोलींत आली व म्हणाली,

" आज तुमच्या कॉलेजांत सरोजिनी नायडूंचं व्याख्यान आहे, खरं कां ? "

तो म्हणाला, " मला माहीत नाहीं. असेल."

" म्हणजे ? तुमच्या कॉलेजांत व्याख्यान अन् तुम्हांला माहीत नाहीं ? "

" माझी हाजिरी घेऊं नकोस. असेल सरोजिनी नायडूंचं व्याख्यान. पुढें काय ? "

" असलं तर मला ऐकायचं आहे तें. "

" तूं तर नेहमीं म्हणतेस जगाला कंटाळलें आहे मी. मग आज ही व्याख्यानाची हौस कुठली आली ? "

" पूर्वी कंटाळलें होतें मी; आतां नाहीं ! "

" पूर्वी म्हणजे केव्हां ? "

उमानं क्षणमात्र आपली नजर खालीं केली, पण पुन्हां ती त्याच्याकडे लावून, मनांतल्या अतिशय महत्त्वाच्या भावना बोलून दाखविण्याची दुर्लभ संधि आलेली पहातांच माणूस ज्या अधीर, कंपित स्वरानं झटकन् बोलतं, त्या स्वरानं ती म्हणाली,

" पूर्वी म्हणजे तुमची माझी भेट झाली नव्हती तेव्हां. त्यावेळी दुःखातिशयानं मी गांगरून गेले होतें, जगाला कंटाळलें होतें, पण आतां नाही. "

तिच्या बोलण्यांतल्या ज्या अभिप्रायाची किंचित् तरी शंका राजाभाऊस वास्तविक यावयास पाहिजे होती ती त्याला आली नाहीं. कारण, त्याच्या प्रीतिविषयक सर्व भावना चंचलेच्या ठिकाणीं गुंतल्या होत्या. उमाचं बोलणं ऐकतांना त्या यत्किंचित् देखील जागृत नव्हत्या. भाषेंतल्या प्रीतीच्या छटा योग्य त्या भावनांच्या श्रुतिद्वारा ऐकल्या तरच ऐकूं येतात. नाही तर नाहीं. त्यामुळं राजाभाऊनं उमाला विचारलं,

" आतां नाहीं ? आतां काय झालं ? पतीपासून दूर परित्यक्त स्थितींत तूं रहात होतीस तशीच अजूनही रहात आहेस; पोटाला मिळवण्यासाठीं तुला कष्ट करावे लागत होते तसेंच अजूनही लागताहेत, लोकांचा उपहास अन् अपवाद सोशीत होतीस तशी अजूनही सोसते आहेस ! दुःख, दारिद्र्य आणि टीका हीं तुझ्या वांट्याला आली तीं अजूनही कायम आहेत ! मग तुझ्या स्थितींत बदल तो काय झाला ? "

" सांगितलं नाहीं कां काय झाला तो ? "

" काय ? "

" तुम्ही भेटलांत ना ? "

" मग, मीं काय केलं ? तुझ्या मागचा भाड्याचा तगादा थांबवला येवढंच कीं नाहीं ? उलट मला चहा करून देणं, माझं औषधपाणी करणं असलीं कामं तूं करूं लागलीस तीं तुला करूं देऊन तुझ्यामागचा त्रास वाढलाच ना ? मी तुझ्यासाठीं काय केलं मला कळत नाहीं. "

उमानं आपली दृष्टि अगदीं स्थिरपणें त्याच्याकडे लावली आणि अतिशय गंभीर चर्येनं ती म्हणाली,

" तें तुम्हांला कधीं कळायचं नाहीं. नकोच कळायला ! "

पण लगेच तिच्या मनांत आलं, आपण हे शब्द फारच गंभीरपणानं बोललों कीं काय ? ज्या आपल्या भावना कटाक्षानं सतत गुप्त ठेवल्या पाहिजेत असं आपण स्वतःला नेहमीं बजावलं, त्या आपल्या या बोलण्यांत व्यक्त झाल्या कीं काय ?......

म्हणून चर्येवर हास्य आणून अन् अर्धवट थट्टेचा स्वर काढून ती घाईघाईनं म्हणाली,

" तुमच्या स्वभावांत चांगुलपणा इतका भरलेला आहे, कीं जें केलंत तें तुमच्या लक्षांतही राहूं नये. तुम्हांला आठवण देण्यासाठीं पाढा वाचूं का ? ऐका. माझी पैशाची विवंचना तर तुम्हीं कमी केलीतच, पण त्याहून अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे माझ्या मनाचं पोषण मध्यंतरीं पांच सहा वर्षं थांबलं होतं तें तुम्हीं पुन्हां सुरू केलंत. पुस्तकं दिलींत वाचायला. त्या पुस्तकांतल्या विषयाबद्दल मीं शंका विचारल्या तर त्यांची चर्चा करायला कधीं कंटाळला नाहींत. मीं वेडंवाकडं कांहीं लिहून दिलं, तर तें तपासण्याचा आळस केला नाहींत. माझं लिहिणं कधीं काळीं प्रसिद्ध होईल अशी मला कल्पनासुद्धां नव्हती. 'मनोरंजन' मासिकांत लेख लिहिणारी " तापसी " कोण असं माझ्या क्लासांत येणाऱ्या बायका मलाच विचारतात तेव्हां मला मोठी गंमत वाटते. अन् तुम्ही मला विचारतां, माझ्यासाठीं तुम्हीं काय केलंत ? कधीं कधीं माझ्या मनांत येतं, लग्नापूर्वी मी कॉलेजांत शिकत होतें तेव्हां थांबलेलं माझं आयुष्य तुमची भेट झाल्यानंतर जणूं पुन्हां सुरू झालं ! खरंच, मी आता आयुष्याला कंटाळलेली नाहीं. मला आतां जगावंसं वाटतं. कॉलेजांत जाणाऱ्या एखाद्या तरुण मुलीला वाटावी तशी मला हौस वाटते. खूप वाचावं, खूप लिहावं व्याख्यानं ऐकावींत......"

हें बोलताना उमाची चर्या खरोखरीच प्रफुल्लित झाली. ती पाहून राजाभाऊच्या मनांत क्षणमात्र आलं, उमाच्या साध्यासुध्या चेहऱ्यावर या वेळीं प्रकट झालेल्या विभावातही एक प्रकारचं सूक्ष्म पण विलक्षण सौंदर्य

नाहीं काय ? वर्णानं आणि रूपानं सामान्य प्रतीची असलेली स्त्रीदेखील पुरुषाच्या दृष्टीला अशा क्षणीं मोह घालूं शकणार नाहीं काय ?......

स्वतःचे ते विचार राजाभाऊला जरा चमत्कारिक वाटले, आणि ते टाळण्यासाठीं तो म्हणाला,

" मग ऐक व्याख्यानं. मी तुला नको म्हणतों कीं काय ? "

" नको म्हणण्यापैकींच करतांहांत. कॉलेजांत व्याख्यान आहे कां नाहीं विचारलं, तर तें सुद्धां सरळ सांगत नाहीं ! "

" मला माहीत नाहीं तर मी काय सांगू ? "

" कॉलेजांत शिकवतां हें तरी खरं का ? "

" शिकवतों, पण त्यापलिकडे कॉलेजांत होणारी कुठलीही गोष्ट मला माहीत नसते. माझं मन कशांतच रमत नाहीं."

" कां ? काय झालं आहे मनाला ? "

" तुला सांगणार आहे केव्हां तरी. "

असं म्हणून त्यानं कोट टोपी घातली आणि तो बाहेर गेला.

यानंतर बरेच दिवसांनीं एकदां जेव्हां पूर्वी कधीं न दिसलेला एक फोटो राजाभाऊच्या टेबलावर उमाला दिसला, तेव्हां ती प्रथम कांहीं वेळ कांहींच बोलली नाहीं. पण तेथून उठून जायच्या वेळेस ती त्याला म्हणाली,

" तुम्ही मला एकदां केव्हां तरी जें सांगेन म्हणाला होतात पण सांगितलं नाहींत तें तुम्ही न सांगताच मला कळलं ! "

तिच्या बोलण्याचा अर्थ न समजल्यामुळं तिच्याकडे आश्चर्यानं पाहून राजाभाऊनं विचारलं,

" काय कळलं ? "

" तुमच्या मनाला काय झालं आहे तें ! "

" माझ्या मनाला ? काय झालं आहे माझ्या मनाला ? "

" त्याचा उच्चार कशाला हवा ? "

" अन् तुला कोणी सांगितलं ? "

" त्या फोटोनं."

तें ऐकतांच तो तिला रागानं कांहींतरी बोलणार होता; पण त्याचे शब्द ऐकायला उमा तिथं उभी राहिली नव्हती.

परंतु नंतर कांहीं दिवसांनीं ती त्याला म्हणाली,

" एक गोष्ट विचारूं का तुम्हांला ? "

" हं, विचार कीं. "

" विचारल्याबरोबर न थांबतां ताबडतोब उत्तर दिलं पाहिजे ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे असं, कीं खरं तें सांगितलं पाहिजे. प्रश्नाचं उत्तर द्यायला अवसर मिळाला नाहीं कीं माणसाला खरी गोष्ट सहसा लपवतां येत नाहीं. "

" मानसशास्त्राचे सिद्धांत नको सांगूंस. काय विचारणार आहेस तें विचार. "

" या फोटोविषयीं तुमच्या काय भावना आहेत ? "

" तुला काय करायचं आहे त्याच्याशीं ? "

" हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नाहीं झालं ! "

राजाभाऊ रागानं म्हणाला,

" उत्तर द्यायची माझी इच्छा नाहीं. "

" नका देऊं, पण काय सांगतें तें नीट ऐका. मला सगळी माहिती मिळाली आहे. तुम्ही किती मोठे आहांत, तुमची विद्वत्ता अन् योग्यता केवढी आहे तें विसरूं नका. भलत्या ठिकाणीं आपलं मन गुंतूं देऊं नका. "

राजाभाऊनं मोठमोठे डोळे करून तिच्याकडे पाहिलं आणि त्यानं तिला कठोर स्वरांत बजावलं,

" उमा, हा विषय बंद कर. "

" नाहीं. मी बोलणार ! "

" एक अक्षरसुद्धां बोलूं देणार नाहीं. तुझा काय अधिकार आहे माझ्यावर ? "

" अधिकार ?... त्या अधिकाराचा कधींही उच्चार न करण्याची शपथ माझ्या मनाला मीं घातली आहे म्हणून, नाहीं तर सांगितला असता !"

" नको सांगूस. पण चंचलेच्या बाबतींत एक अक्षरसुद्धां बोलूं नकोस ! "

हे बोलतांना राजाभाऊचा स्वर उंच चढला होता आणि तो थरथर कांपत होता.

पण त्याच्या क्रोधाची भीति न बाळगतां उमा म्हणाली,

" पुन्हां सांगते, स्वतःचा मोठेपणा तुम्हीं विसरतां कामा नये, अन् भलत्या ठिकाणीं गुंतणाऱ्या आपल्या मनाला—"

" उमा, बोलूं नकोस ! " राजाभाऊ मोठ्यानें ओरडला.

" बोललें तर काय कराल ? "

विलक्षण उग्र मुद्रा करून राजाभाऊ ओरडला,

" उमा, माझ्या शांतपणाची परीक्षा पाहूं नकोस. अमुक करा अन् तमुक करूं नका असं मला सांगणारी तूं कोण ? तुझा माझा काय संबंध ? चालती हो पाहूं इथून......"

पण उमा गेली नाहीं. तिचे पाय लटपटूं लागले. ती खुर्चीवर बसली, आणि दोन्हीं हातांनीं तोंड झांकून रडूं लागली.

राजाभाऊ तिच्याकडे पहात राहिला.



# [११]

१९१९ सालचा जानेवारी महिना उजाडला.

एके दिवशीं शिकवणी संपल्यावर राजाभाऊ एस्माएलला म्हणाला,

" तूं खरंच का पांच सहा दिवसांत आपल्या मुलखाला जाणार आहेस ? "

" हो. येतोस का माझ्याबरोबर ? या दिवसांत आमच्या देशांत हवा फार सुंदर असते. चल येत असलास तर. "

" आलों असतों पण अजून दोन अडीच महिने कॉलेज आहे. नोकरींत गुंतलो आहे बाबा मी ! "

" नोकरीचं निमित्त कशाला सांगतोस ? तूं खरा कुठं गुंतला आहेस माहीत आहे मला ! "

" कुठं ? हंः, कांहीं तरीच ! "

" अरे, मला खुदानं डोळे दिले आहेत अन् त्यांचा उपयोग मला चांगला करतां येतो ! पण तें जाऊं दे, नको येऊस तूं. मी जाणार येवढं खरं ! "

" परत केव्हां येशील ? "

" तें कांहीं सांगवत नाहीं. देशावर रमलों तर येणारही नाहीं इकडे परत ! "

" वा, शहाणाच आहेस कीं ! मग माझं शिकणं ? "

" शिकला आहेस तेवढं पुष्कळ झालं कीं आतां ! "

" अन् चंचलेची शिकवणी ? "

" चंचलेची शिकवणी ? मी देशावर गेलो नाहीं तरी ती आतां लवकरच बंद होणार आहे. "

" म्हणजे ? कळलं नाहीं मला. "

" तुला कळायच्या नाहींत या गोष्टी ! "

" या गोष्टी म्हणजे कुठल्या गोष्टी ? "

" त्या घडतील तेव्हां तुला समजतील. मात्र त्या घडल्यावर तूं स्वतःला दुःखी करून घेणार आहेस, म्हणून तुला वेळींच दोन शब्द सांगणं माझं कर्तव्य आहे. "

इस्माएलच्या त्या बोलण्यानं गोंधळून जाऊन राजाभाऊ त्याच्याकडे पहात राहिला.

इस्माएल म्हणाला,

" असं पाहूं नकोस माझ्याकडे. तुझं मन चंचलेवर बसलं आहे ही गोष्ट इतके दिवस मजजवळ कां नाहीं सांगितलीस ? मला तूं आपला मित्र समजतोस ना ? "

" आपल्या मनांतल्या प्रेमाची चर्चा दुसऱ्याजवळ–मित्राजवळसुद्धां–करणं म्हणजे त्या प्रेमाचा अपमान करण्यासारखं आहे असं मला नेहमीं वाटत आलं आहे. "

" काय म्हणालास ? प्रेम ? चंचलेवर तुझं प्रेम आहे ? "

" हो. "

" नीट सरळ बोल. तुझं तिच्यावर मन बसलं आहे म्हण. तें मला अधिक समजेल ! हें बघ राजाभाऊ, ' प्रेम ' हा शब्द मीं पुष्कळ ऐकला आहे. प्रेमानं तळमळणाऱ्या आपुकमापुकांचीं विरहगीतंही पुष्कळ तोंडपाठ आहेत मला. पण त्या काव्याचा प्रत्यय व्यवहारांत कधींच आला नाहीं मला ! प्रत्यक्ष व्यवहारांत मला येवढंच दिसलेलं आहे, कीं पुरुषाला स्त्री हवी असते अन् स्त्रीला पुरुष हवा असतो. हा सारा शरीरधर्माचा खेळ आहे. तुझं मन चंचलेवर बसलं याबद्दल मी तुला मुळींच दोष देत नाहीं; पण काल्पनिक गोष्टींच्या मागं लागून तूं जो आपला स्वतःचा छळ करून घेतो आहेस त्याबद्दल मात्र तुला दोष दिला पाहिजे. चंचला तुला हवीशी वाटते असं जेव्हां प्रथम मला दिसून आलं, तेव्हां मीं मनाशीं म्हटलं, शाबास, राजाभाऊच्या ठिकाणीं मर्दपणा आहे. ज्या पंजाबरावांच्या गोष्टी लोकांकडून आम्ही ऐकतों त्यांना शोभेसा बेटा आहे खरा ! पण नंतर पहातों तों तूं कांहीं चमत्कारिकच तऱ्हेनं वागूं लागलास. तुझं वागणं मला समजेना. आज वर्ष दीड वर्ष होत आलं, तुझं वागणं मी बारकाईनं पहातों आहे अन् मनाशीं विचार करतों आहें, याला चंचला हवी आहे का नको आहे ? अन् मला अजून या कोडयाचा उलगडा झाला नाहीं. सांग, तुला चंचला हवी आहे ? "

मनांतल्या संकोचाशीं क्षणभर झटपटून राजाभाऊ म्हणाला,

" हो, हवी आहे. "

" मग तुला हवी असून ती तुला मिळत नाहीं ? चंचला म्हणजे काय अशी मोठी बादशहाची बेगम लागून राहिली आहे ? गाणारीण म्हणून तिचा दर्जा थोडा उंच असेल, कबूल. पण बोलून चालून ती अशा कुळांतली, कीं कुणा पुरुषाला ती हवीशी वाटली तर त्यानं तसं स्पष्ट सांगायला हरकत नाहीं. आज दीड वर्ष तूं कुठल्या अडचणीशीं झगडतो आहेस मला कळत नाहीं. तूं साऱ्या मुलखाचा भित्रा तरी असला पाहिजेस किंवा मूर्ख तरी असला पाहिजेस. तुझ्यासारख्या मोठ्या विद्वानाला मी मूर्ख म्हणावं हें वावगं खरंच. बोलण्याच्या भरांत मी तो शब्द वापरला याबद्दल मला क्षमा कर. पण तुझ्या

वागण्याचं खरंच मला कोडं पडलेलं आहे. मला खरं सांग पाहूं तुला चंचला हवी आहे का? सांग ना. गप्प नको बसूस."

तो असं म्हणाला तरी राजाभाऊ कांहीं वेळ गप्पच बसला.

पुढ्यातल्या तंबोऱ्याच्या तारांवरचे घोडीखालचे सारे मणी त्यानं खालीं सरकवले आणि चारी तारांवरून बोटं फिरवलीं.

विलक्षण विसंवादी बदसूर निघाले त्यांतून......

इस्माएलकडे पाहून तो म्हणाला,

"इस्माएल, काय सांगूं तुला? माझं बोलणं तुला कळायचं नाहीं. पण तें कळलं नाहीं तरी मला हसूं नकोस मला चंचला हवी आहे. तिच्या रुपानं मला पुरती भुरळ घातली आहे. ती जवळ आली किंवा नुसती दृष्टीस पडली, कीं माझं सबंध शरीर रोमांचित होतं. पण चंचला जशी आहे तशी नको आहे मला. माझ्या मनाला अन् अंतःकरणाला ती जशी असावीशी वाटते, तशी होऊन ती मला मिळाली तरच मला हवी आहे. बुद्धीनं अन् अंतःकरणानं तिचा उपभोग मला घेता आला तरच तिच्याशीं केलेल्या शरीरसंबंधापासून माझ्या जीवाला समाधान मिळेल. नाहीं तर केवळ शरीरसुखानं माझा मलाच तिटकारा मात्र वाटेल; अन् मी अधिक दुःखी होईन."

इस्माएल कांहीं वेळ कांहीच बोलला नाहीं.

राजाभाऊनं बोटांचा चाळा करून उतरविलेल्या तंबोऱ्याच्या तारा त्यानं खुंट्या पिळून आणि मणी सरकवून पुन्हां जुळविल्या, व त्यावरून आपलीं बोटं फिरविलीं.

षड्ज पंचमांचे मधूर संवादी स्वर बाहेर पडले......

मग तो राजाभाऊला म्हणाला,

"खरंच, तूं काय म्हणतोस तें मला कळत नाहीं. तें कळण्याइतकी बुद्धीची पात्रता माझ्या ठिकाणीं नाहीं असंही असेल कदाचित्. पण माझं अडाण्याचं साधं सरळ सांगणं पुन्हां एकदा ऐकून ठेव. तुला चंचला हवी आहे तर जशी आहे तशी ती घे. बुद्धीच्या अन् अंतःकरणाच्या आकर्षणाची वाट पाहिलीस तर असाच सदा वाट पहात बसशील."

"इस्माएल, राहूं दे हा विषय. ह्या गोष्टीच अशा आहेत कीं एकाच्या दुसऱ्याला समजायच्या नाहींत, अन् कुणाला कुणापासून शिकतां यायच्या नाहीत..."

*　　　*　　　*

राजाभाऊ इस्माएलला असं म्हणाला खरा, पण दुसरे दिवशीं तिन्ही-सांजा तो चंचलेच्या घरीं गेला तो एक अगदीं विचित्र निश्चय करून !

तो निश्चय आपल्या मनाशीं गुप्तपणें केल्यापासून साऱ्या चित्तवृत्तींचा विलक्षण प्रक्षोभ त्याच्या अनुभवाला येत होता, आणि त्याचं सर्वांग कांपत होतं !

चंचलेच्या बाबतींत जें कांहीं मिळण्यासारखं आहे तें केवळ शारीरिक असलं अन् कितीही हीन असलं तरी घेऊन मोकळं व्हायचा त्यानं निश्चय केला होता !...

असली कल्पना पूर्वीही कधी कधी त्याच्या मनांत येऊन गेली होती. पण आज ती केवळ तरळती कल्पना राहिली नव्हती. तिला धीट निश्चयाचं स्वरूप त्यानं दिलं होतं.

आणि त्या नवख्या धीटपणामुळंच त्याचं मन घाबरलं होतं, अंतःकरण बावरलं होतं, छाती धडधडत होती आणि हातपाय कांपत होते.

योगायोग असा कीं तो गेला त्या वेळेस चंचला घरांत एकटी होती.

तो येतांच ती बाहेर दिवाणखान्यांत आली व त्याच्यासमोर बसली.

नोकरानं दिवाणखान्यांत येऊन दिवा लावला, तेव्हां तिनं दिव्याला नमस्कार केला आणि डोळे मिटून मनाशीं कसलं तरी स्तोत्र म्हटलं.

राजाभाऊ तिच्याकडे टक लावून पहात राहिला. तिचे मिटलेले डोळे ते उघडे असतांना दिसत त्यापेक्षांही अधिक सुंदर नव्हते काय ? आणि हळूच हलणारे तिचे लाल लाल ओंठ...

तिची प्रार्थना संपली तेव्हां तिनं पानाचा डबा पुढें ओढून पट्टी बनविली आणि त्याच्यापुढें धरली.

राजाभाऊनं ती हातीं न घेतां तिच्या नाजूक, सुंदर हाताकडे दृष्टि लावून म्हटलं,

"मला नको!"

"इश्श, नको म्हणजे काय? कां नको?"

"मला आतां कंटाळा आला."

"कसला?"

"आज दीड वर्ष तूं मला नुसतं पान द्यावंस अन् मी घ्यावं असंच चाललं आहे!"

आपल्या हातांतली पट्टी एखाद्या बोटासारखी आपल्या अधरावर टेकीत, अर्धवट हंसत आणि अर्धवट गोंधळल्यासारखं दाखवीत चंचलेनं विचारलं,

"अय्या! म्हणजे आणखी कांहीं हवं आहे म्हणतां तुम्हांला?"

एका सुकुमार, सुंदर स्त्रीचे लाडके लाघवी शब्द होते ते!

पण तोफेचा गडगडाट ऐकून नवख्या शिपायाची धडधडणार नाहीं इतकी राजाभाऊची छाती धडधडूं लागली.

त्याला हवा तो क्षण आला होता.

पण तो येतांच त्यानं प्रयत्नपूर्वक केलेला निश्चय ढांसळूं लागला होता.

मनांतली गोष्ट कशी बोलावी त्याला कळेना.

तो फक्त म्हणाला, "आज सबंध दिवस मी सारखा तुझा विचार करतों आहे!"

हे शब्द बोलतांना त्याची दृष्टि आपल्या अर्धव्यक्त वक्षस्थलाकडे लागली आहे हें चंचलेला कसं कळलं कुणाला माहीत? कोणत्या तरी गूढ अशा सहाव्या ज्ञानेंद्रियानं स्त्रियांना असल्या गोष्टी कळतात असंही कदाचित् असेल. तिला तें कळलं खरं! झटकन् पदर नीट करीत ती म्हणाली,

"मलासुद्धां आज तुमची सारखी आठवण होत होती."

पण असं म्हणून ती उठली, आणि पुन्हां बसली ती त्याच्यापासून बरीचशी दूरच!

तिनं उठल्यावर कोपऱ्यांतला तंबोरा चाळवून नीट उभा केला हें जरी खरं, तरी वास्तविक तो पहिल्यांदाच सुरक्षित उभा होता, आणि केवळ आपण दूर सरकून बसल्याचं उघड दिसूं नये म्हणूनच तिनं उठण्याचं निमित्त केलं होतं, हें राजाभाऊच्या लक्षांत आल्यावांचून राहिलं नाहीं.

त्या गोष्टीचं त्याला आश्चर्य वाटलं, आणि तो जरासा गप्पच झाला.

चंचला म्हणाली,

" ऐकलं नाहींत वाटतं ? "

" काय ? "

" म्हटलं आज दिवसभर तुमची फार फार आठवण होत होती मला. एक मोठी बातमी आहे सांगण्यासारखी. अन् ती तुम्हांला केव्हां सांगेन असं झालं आहे मला ! आमची आईसुद्धां दोन चारदां म्हणाली आज राजाभाऊ कसे नाहीं आले ? "

किंचित् गोंधळून राजाभाऊनं विचारलं,

" येवढी कसली मोठी बातमी आहे ? "

" ओळखा कीं ! "

किंचित् त्रासानं राजाभाऊ म्हणाला,

" मला उखाणे घालूं नकोस. सरळ सांग. "

" असं रागवायचं असेल तर सांगतच नाहीं जा. "

" बरं नाहीं रागावत, सांग. "

" आम्ही दोन चार दिवसांत हैद्राबादला जाणार—"

" कशाला ? "

" इश्श, कशाला म्हणजे ? कायमचं रहायला ! तिथल्या एका श्रीमंत राजानीं मला घातलेली मागणी आईनं कबूल केली आहे. "

" म्हणजे तुझं लग्न होणार म्हणतेस ? "

" इश्श, आमचीं लग्न कां होतात ? राजांकडे मी रहाणार येवढंच. ते तीस हजार रुपये माझ्या नांवानं बँकेंत ठेवणार आहेत. "

ते शब्द राजाच्या कानाला सहन झाले नाहींत. 'त्या गोष्टी तुला कळायच्या नाहीत. त्या घडतील तेव्हांच तुला समजतील' असं कांहींसं इस्माएल त्याला म्हणाला होता तें त्याला एकदम आठवलं. इस्माएलला सूचित करायच्या होत्या त्या याच गोष्टी तर? इतक्या गलिच्छ? इतक्या ओंगळ?...

तो एकदम त्वेषानं म्हणाला,

"म्हणजे तीस हजाराला तूं आपलं तारुण्य अन् सौंदर्य विकलंस बाटतं? तुझी आई इतके दिवस बाट पहात होती, ती केवळ चांगला भाव येईल म्हणूनच कीं काय?"

त्याच्या त्या बोलण्याचा राग आल्यासारखं दाखवून चंचला म्हणाली,

"मग, तुमचं म्हणणं काय माझ्या आईनं मला तुमच्यासारख्या एखाद्याच्या स्वाधीन करून माझ्या जन्माचं मातेरं करावं?"

ते तिचे शब्द ऐकतांच दिवाणखान्यांतला सारा प्रकाश नाहींसा होऊन एकदम अंधार झाल्यासारखं राजाभाऊला वाटलं. पण लगेच त्याला असंही वाटलं, कीं आजपर्यंत ज्या अंधारांत आपण चांचपडत, धडपडत होतों त्यावर एकदम झगझगीत, भेदक प्रकाश पडला. अंधारानं आपली फसवणूक केली याची त्याला त्या क्षणार्धात असह्य लज्जा वाटली, चीड आली; आणि जो भेदक प्रकाश एकदम त्या क्षणीं पडला त्याचेही चटके त्याला सोसवेनात.

तो अतिशय त्वेषानं म्हणाला,

"नाहीं नाहीं, असं माझं म्हणणं नाहीं. तूं आपला देह विकलास हेंच फार छान झालं. येवढंच कीं रेखीव नाकाडोळ्यांची, लुसलुशीत अंगाची, गोरीगोमटी, बाजारहाटांत मांडलेली पुतळी यापलीकडे तूं स्वतःला अधिक मानीत नाहींस अशी निर्लज्ज कबुलीच तूं या कृत्यानं दिली आहेस त्याचा मनस्वी संताप येतो. तूं केवळ सुंदर बाहुली नसावंस, तुला उदात्त भावना असाव्यात, तुझ्या ठिकाणीं बुद्धिचातुर्य असावं अशी आज दीड वर्ष माझ्या जीवाला मी ओढ लावून घेतली. माझी मी केवढी फसवणूक करून घेतली ही जाणीव माझ्याच्यानं या क्षणीं सहन होत नाहीं. तूं सुंदर नसतीस फार बरं

झालं असतं. मग कदाचित् बुद्धीचे अन् भावनांचे अंकुर तुझ्या ठिकाणीं धरले असते. या वेळीं असं वाटतं, कीं, ज्या तुझ्या सौंदर्यानं मला तुझं दास्य करायला लावलं तें सौंदर्य कांहीं तरी करून नष्ट करावं......"

"हां हां ! हें काय ?"

असं ओरडून चंचला एकदम जागेवरून उठली.

कारण, तिच्या तोंडावर फेंकून मारण्यासाठीं राजाभाऊनं हातीं घेतलेला आडकित्ता तिला दिसला.

पण तिच्या ओरडण्याला न जुमानतां राजाभाऊनं तो तिच्या तोंडावर फेंकलाच.

चंचलेनं झटकन् तोंड चुकवलं त्यामुळं त्या अडकित्त्याचा प्रहार तिच्या-मागच्या भिंतीवरच्या मोठ्या बिलोरी आरशावर झाला, आणि तो फुटून त्याचे तुकडे निखळले त्यांचा खळखळ असा आवाज झाला !



# [१२]

त्या दिवशीं रात्रीं राजाभाऊला झोंप क्वचितच लागत होती, आणि लागली तरी अस्वस्थ. असंबद्ध स्वप्नांत आरशाच्या निखळत्या तुकड्यांचा खळखळाट एकदम ऐकूं येऊन तो पुनःपुन्हां दचकून जागा होत होता !

अभ्रप्रमाणेंच सुखही कांचेसारखं आहे, तीहि कांच एकदां फुटली कीं पुन्हां सांधणं शक्य नाहीं असं त्याच्या सारखं मनांत येई जें सुख आपल्याला मिळत नव्हतं पण कधीं काळीं मिळेल अशीं मनाशीं आशा धरून आपण होतों, तें आतां कायमचं फुटलं, आपल्या हातचं गेलं या विचारानं त्याला पुनःपुन्हां मोठी व्यथा होई......

पण उलट एखादे वेळीं फुटलेल्या बिलोरी कांचेचा खळखळाट एकदम कानीं पडून स्वप्नांतून दचकून जागृत होतांच त्याला वाटे, आपण जो

खळखळाट ऐकला तो आरशाच्या कांचेचा नव्हे, तर आपल्या हातापायांत ज्या शृंखला आपण अडकवून घेतल्या होत्या त्या तुटल्या त्यांचा तो आवाज !...

त्या रात्रीं त्याला आपल्या लहानपणाच्या अनेक आठवणी पुन:पुन्हां झाल्या.

माणसाला आयुष्यांत एखादेवेळीं विरोधाचा आणि पराभवाचा असा कांहीं जबरदस्त तडाखा बसतो, कीं त्या योगानं भविष्य अन् वर्तमान या दोन्ही कालाविषयींची त्याची दृष्टि एकदम अंध होते, त्या कालांतल्या योजनांची अगर सुखदु:खांची त्याची जाणीव मुंग्या आलेल्या एखाद्या अवयवाप्रमाणें बधिर होते. आणि मग विचारापेक्षां त्याच्या स्मृतींचाच चाळा अधिक सुरु होऊन त्याला भूतकालांतल्या अनेक गोष्टी मनश्चक्षूंपुढें दिसूं लागतात.

राजाभाऊच्या उगीच नांवाला मिटलेल्या डोळयांना शाळेंत जाणारा लहान राजा दिसला, त्यावेळचे सवंगडी दिसले, शाळेच्या भिंतीवर त्यानं व त्याच्या सवंगड्यांनीं चोरटेपणानं ज्या शब्दाचा अर्थ वास्तविक त्यांनाही माहीत नव्हता असे बीभत्स शब्द लिहिलेले दिसले, खांसाहेब आणि जुलिया यांच्या मूर्ती पुन:पुन्हां दिसल्या, आणि आपल्या वडिलांचा उग्र, करारी चेहरा दिसूं लागला. लहानपणीं त्या मुद्रेची त्याला बहुतांशीं भीतीच वाटली होती. पण आज ती मुद्रा दिसतांच आपला पिता आपल्यावर मनांतल्या मनांत अतिशय प्रेम करीत होता येवढीच गोष्ट त्याच्या मनांत आली, व त्याला एकदम रडूं आलं. त्यानं एकदम मान फिरवून उशीवर आपले डोळे टिपले, आणि आपल्या पित्याच्या आठवणी काढण्यास आपल्या मनाला पुरतं मोकळं सोडलं......

त्याचे वडील अखेरचे आजारी असतांना त्यांच्याशी त्याचं झालेलं एक बोलणं त्याला आठवल्यावाचून राहिलं नाहीं. त्या बोलण्यांत त्यानं आपल्या पित्याला आश्वासन दिलं होतं,

"बाबा, माझी चिंता कशाला करतां ? मी सुखांत राहीन, मोठा होईल, निदान माझ्या हातून क्षुद्र कृत्य कधीं घडणार नाहीं येवढी खात्री ठेवा."

ती आठवण होतांच त्याच्या मनांत आलं, 'बरं झालं, चंचलेच्या पाशांतून आपण कायमचे सुटलों. कदाचित् असं असेल, कीं चंचलेविषयीं

आपण धरलेला नाद म्हणजे एक क्षुद्र कृत्यच होतं, आणि आपल्या कल्याणासाठीं आपल्याभोंवतीं अदृश्य स्वरूपांत घिरट्या घालणाऱ्या आपल्या पित्याच्या आत्म्यानंच त्या क्षुद्र कृत्याच्या मोहांतून आज अकल्पितपणें आपली सुटका केली !'

वास्तविक चंचलेवर प्रेम करण्यांत हीनत्व अगर क्षुद्रत्व आहे असं राजाभाऊला आजपर्यंत कधींही वाटलं नव्हतं, किंवा माणसं मेली तरी त्यांचें आत्मे मागं रहातात अन् ते आपल्या प्रियजनांचं रक्षण करतात असंही आजपर्यंत त्याच्या विवेचक मनानं कधीं ग्राह्य मानलं नव्हतं ! पण आतांची ही घटकाच अशी होती, कीं त्या वेळीं आग्रह आणि तर्क सोडून त्याच्या मनोवृत्तींनीं कुठल्याही दिशेला भटकावं.

आपल्या वडिलांप्रमाणं राधाबाईचीही आठवण राजाभाऊला फार फार झाली. ती त्याची आई नव्हती, पण आईपेक्षांहि अधिक जिव्हाळ्याचं प्रेम तिनं त्याच्यावर केलं होतं. तिनं त्याचे हट्ट पुरवले होते, प्रसंगीं उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या होत्या, तूं मोठं झालं पाहिजेस असं उत्तेजन त्याला नेहमीं दिलं होतं, आणि ज्या ज्या वेळीं त्यानं योग्य अगर अयोग्य कारणांनीं आपलं बालमन दुःखी करून घेतलं होतं त्या त्या वेळीं तिनं त्याला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलं होतं, आणि तिच्या हृदयातलीं मायेची ऊब लागतांच अन् तिच्या बाहूंचा स्पर्श होतांच त्याचं दुःख दर वेळीं क्षणांत नाहींसं होऊन तो पुन्हां उल्हसित झाला होता !

आज राधाबाई असती तर...... ?

असा निराशेचा आणि निरुपायाचा प्रश्न राजाभाऊच्या मनांत पुनःपुन्हां आला.

पण मग एकाएकीं त्याच्या मनांत आलं, राधाबाई–माझी आई—आज असती तर, असं मी कां म्हणावं ? ती आहे ! पार्थीव देहरूपानं नसली, तरी तिचा सहवास मला मिळण्यासारखा आहे. मला तिच्याकडे जातां येणं शक्य आहे.

पंजाबरावांनीं राधाबाईच्या स्मरणार्थ तिच्या गांवीं शिवमंदीर आणि धर्मशाळा बांधली होती.

तिथं आपण गेलों तर आपल्या मनाला शांति मिळेल असं राजा-भाऊला वाटलं.

दुसऱ्या दिवशीं रविवार होता. कॉलेजचं काम नव्हतं. तो गेला आणि मग तो रविवारीं व इतर सुटीच्या दिवशींच नव्हे, तर मधून मधून मुद्दाम रजा घेऊनहि त्या खेडेगांवांत जाऊन राहूं लागला.

शिशिर ऋतूचे अखेरचे दिवस होते ते. रात्री मोठ्या होत्या, दिवस लहान वाटत. कधींमधीं कडक थंडी पडे. रात्रीं वाहणारा वारा गारठ्यानं भरलेला असे, आणि दुपारच्या वेळीं मध्येंच कुठेंतरी जोराची वावटळ उठे तीं धूळ, पाचोळा, चिंध्या, काय सांपडेल तें गोळा करून चक्राकार फिरून आकाशांत थोडीशीं उंच भरारी घेई आणि पुढें जाई! गांवाच्या आसपास कुठें कुठें उभ्या असलेल्या पिकांवरहि पिवळा रंगच बहुतांशीं पसरलेला दिसे, आणि हरभऱ्याचीं टेंगणीं ठेंगणीं झुडपच काय तीं आपला काळसर हिरवट रंग डौलानं दाखवीत. गांवांतल्या आणि आसमंतांतल्या मोठमोठ्या झाडांच्या फांद्या पर्णहीन दिसत, आणि आपल्या देहावरून गळलेलीं जुनीं शुष्क पानं वाऱ्याच्या लोटाबरोबर धुळींत मिसळून इकडे तिकडे उडालेलीं पहाण्याच्या दुःखानं ते वृक्ष अधिकच उदास झाल्यासारखे वाटत. पण आतां वसंत ऋतूलाहि फारसा अवकाश नव्हता, आणि ऋतुराजाच्या आगमनासाठीं अधीर झालेली सृष्टि त्याच्या स्वागताची जी तयारी करीत होती तिचीं चिन्हं ठिक-ठिकाणीं दृष्टीस पडत. पिंपळांच्या झाडांवर मध्यच एखाद्या शाखेला नवपल्लव फुटलेला दिसत, आणि सूर्यप्रकाशांत तीं लालसर छोटीं छोटीं पानं हाललीं कीं मोठी गंमत वाटे. आम्रवृक्षांना नवतीचा कोवळा मोहोर फुटूं लागला होता आणि त्याच्या किंचित् आंबट पण मधुर सुगंधाची बातमी दूर दूर पसरविल्या-वांचून वाऱ्याला रहावत नसे. गांवच्या सीमेवरच्या राईत मधूनच ‘कुहू’ करणाऱ्या कोकिळेचं संगीत कधींमधीं कानावर पडे. आणि कोठून तरी येणारीं आणि कुठेंतरी जाणारीं लहानसहान पाखरं आपल्या थव्याच्या निरनिराळ्या आकृती बनवीत अंतराळांतून जातांना जो चिवचिवाट करीत, तो ऐकला कीं वाटे यांना वसंताच्या आगमनाची बातमी खचित समजली आहे!

सृष्टीच्या या रमणीय क्रीडा दृष्टीस पडल्या कीं, राजाभाऊला कांहीं एका विलक्षण गूढ समाधानाचा प्रत्यय येई. आपल्या निराशेचा आणि कटु

अनुभवाचा दाह शांत व्हावा या हेतूनं राधाबाईचं स्मृतिस्थान असलेल्या या गांवीं तो येऊं लागला होता; आणि जितका अधिक वारंवार या गांवीं तो आला होता तितकं अधिकाधिकच त्याला यावंसं वाटत गेलं होतं. चंचलेच्या बाबतींत आपल्या हृदयाला झालेली जखम अल्पावधींत बरी होईल अशी त्याची कल्पना नव्हती. पण खरोखरच ती जखम बरी होत चालली होती.

मात्र त्याच्या अंत:करणाला दुसरीच एक जखम व्हावयास लागली होती. एका नवीनच दु:खाचा आघात त्याच्या मनावर होऊं लागला होता.

कारण, शिशिर आणि वसंत या दोन ऋतूंच्या संधिकालांतलं सृष्टीचं रमणीय स्वरूप पाहून त्याच्या निराश आणि उदास अंत:करणाला शांति मिळे खरी, पण त्या खेडगांवांतल्या माणसांचा नित्यनैमित्तिक व्यवहार जो जो त्याच्या दृष्टीस अधिकाधिक पडे, आणि स्वभावानंच चिकित्सेखोर असलेलं त्याचं मन त्याविषयीं जों जों अधिकाधिक विचार करी, तों तों त्याच्या मन:शांतीला अधिकाधिक मोठमोठे धक्के बसत.

गांवचे सारे लोक दारिद्र्यांत पिचत पडलेले त्याला स्पष्ट दिसत. त्याच्या वडिलांनीं बांधलेलं शिवमंदिर सुंदर होतं, पण तिथें दर्शनासाठीं येणारी प्रत्येक व्यक्ति प्रार्थनेसाठीं हात जोडून डोळे मिटतांना कोठल्या तरी गुप्त तीव्र दु:खाचे उसासे टाकीत आहे असा त्याला भास होई. गांवच्या नदीचं पाणी मुबलक नसलं तरी गोड आणि सुंदर होतं, पण त्या पाणवठ्यावर येणारे सारे जीव, इतकंच नाहीं तर मुकीं जनावरंसुद्धां गांजलेलीं दिसत. शेतावर हिरव्या पिवळ्या रंगांची शोभा दिसे, पण तीं शेतं करणारे शेतकरी संध्याकाळीं आसुड खांद्यावर टाकून घरीं परत चाललें कीं त्याच्या गतींत मंदता दिसे आणि बोलण्यांत आशा आणि उत्साह यापेक्षां निराशा आणि वैतागच अधिक ऐकूं येई. जिकडे तिकडे दारिद्र्य माजलं होतं. शेतकऱ्याला सावकार पिळीत होता, सावकाराला अधिकारी छळीत होते, कनिष्ठ अधिकाऱ्याला वरिष्ठ अधिकारी छळीत होते! शेतकरी भीतीनें गांजलें होतें, आणि पाटील कुलकर्णी तरी भीतीपासून मुक्त कुठें होतें? जो तो खालच्याला खात होता, आणि वरच्याचं भक्ष्य होऊन बसला होता. प्रत्येकजण कुणाच्या तरी भीतीनं घाबरलेला होता! आणि सर्वांत दु:खदायक गोष्ट ही, कीं या दारिद्र्याचा,

गांजणुकीचा आणि भयाचा खरा उगम कुठें आहे तें कुणालाच कळत नव्हतं...... !

तें सारं पाहून राजाभाऊच्या मनांत येई, हिंदुस्थानांतल्या लक्षावधी खेड्यांची हीच अवस्था असेल काय ?......

खरा हिंदुस्थान हाच काय ?......

अन् असेल तर त्याच्यावर उपाय ?

आपल्या अंतःकरणांतलं प्रेमाचं दुःख विसरण्याठीं त्या खेडेगांवांत आलेला राजाभाऊ एकदम निराळेच विचार करूं लागला.

या त्याच्या क्रांतीचं कदाचित् हेंही कारण असेल, कीं त्याच सुमारास सबंध देशांत राजकीय जागृतीचं वारं जोरानं वाहूं लागलं होतं. इतक्या जोरानं, कीं वैयक्तिक प्रेमद्वेषांत आणि आशानिराशेंत गढून न बसतां आपल्या खंडतुल्य विस्तीर्ण मायदेशाच्या विस्तीर्ण सुखदुःखाशीं समरस होण्याचा हा समय आहे असं प्रत्येक सुबुद्ध माणसाला वाटावं.

ता. ११ नोव्हेंबर १९१८ रोजीं महायुद्ध तहकूब झालं होतं. दोस्त-राष्ट्रांचा पूर्ण विजय झाला होता, व त्या राष्ट्रांतील मुत्सद्यांनीं स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाची घोषणा केली होती. पूर्ण जबाबदारीचं स्वराज्य आपल्या देशाला या वेळीं मिळेल अशा आशेचे अंकुर हिंदी लोकांच्या मनांत उत्पन्न होऊं लागले होते. पण उलट या अंकुरांचा बीमोड करण्याचा हिंदुस्थान सरकारचा उद्देश असावा अशी शंका लोकांना यायला लागली होती. सुलतानशाहीला शोभणारीं "रौलॅट बिलं" कायदेमंडळापुढं मांडलीं गेलीं होतीं, आणि त्यांना कायद्याचं स्वरूप देण्याचा सरकारचा अट्टाहास उघड उघड दिसत होता. या बिलाविरुद्ध देशांत जिकडे तिकडे असंतोष पसरला होता. महात्मा गांधींनीं राजकारणांत पदार्पण केलं होतं, अन् त्यांचं नांव देशांतल्या तेहतीस कोटी लोकांच्या तोंडी भिजत होतं. "रौलॅट बिलं" पास होतां कामा नयेत असं महात्मा गांधींनीं सरकारला उघड उघड बजावलं होतं, येवढंच नव्हे तर तीं बिलं पास झाल्यास सबंध देशभर सत्याग्रहाची प्रचंड चळवळ आपण सुरू करूं असं तारीख २४ फेब्रुवारीस त्यांनीं जाहीर केलं होतं.

महात्मा गांधींच्या या जाहीर घोषणेनं सबंध देशभर अपूर्व उत्साहाची

प्रचंड लाट उसळली. याचं कारण मुख्यत: असं होतं, कीं महात्मा गांधी ज्या तऱ्हेच्या युद्धाची भाषा बोलत होते त्या युद्धांत ज्याची इच्छा असेल अशा कुणालाही सामील होता येण्यासारखं होतं. युद्धाची प्रबळ इच्छा हीच एक गांधींच्या नि:शस्त्र सैन्यांत भरती होण्याची अट होती. आणि याहूनही विशेष म्हणजे सैन्यांत भरती झाल्यावर सैनिकानं काय करायचं याविषयीं गांधींनीं संदेह ठेवला नव्हता. स्पष्ट कार्यक्रम प्रत्येक सैनिकापुढं तयार होता. हिंदी राजकारणांत ही गोष्ट अभूतपूर्व होती. कारण, यापूर्वी कित्येक वर्षें ब्रिटिश सरकार व हिंदी लोक यांच्यांत राजकीय लडा चालला होता हें जरी खरं. तरी तो लढा लोक लढत नव्हते. त्यांचें पुढारी लढत होते. काय करायचं आहे तें आमचे पुढारी करताहेत असं म्हणून सामान्य लोक स्वस्थ बसले होते. सरकारशीं प्रत्यक्ष दोन हात करण्याचं समाधान मिळविण्याची संधि सामान्य माणसाला कधीं दिली गेली नव्हती. मोठमोठे विद्वान, मोठमोठे वक्ते आणि बडेबडे श्रीमंत यांच्याकडेच लढाईचं सारं काम सोपवलं गेलं होतं. पण गांधींच्या सत्याग्रहाच्या घोषणेनं ही स्थिति एकदम पालटली. दरिद्र्याला, दुर्बळाला अन् अशिक्षितालाही एकदम वाटूं लागलं, कीं सरकारशीं झगडण्याची माझी इच्छा असेल तर मला दोन हात करतां येतील......

यामुळं देशांत एकदम प्रचंड जागृति झाली. आजपर्यंत जागं व्हायचं कसं, अन् जागं होऊन तरी करायचं काय हें न समजून लोक निजले होते. पण आतां त्यांना तें समजलं. ते उठले......

राधाबाईचं स्मृतिमंदिर ज्या गांवात होतं तिथली परिस्थिति पाहून राजाभाऊला नेहमीं वाटलं होतं, या लोकांना स्वतःची दुर्दशा समजणार केव्हां ? पण गांधींच्या सत्याग्रहाची घोषणा त्या गांवापर्यंत पोंचतांच त्यांनाहि आपल्या दुर्दशेची एकदम जाणीव झाली, आणि त्या दुर्दशेवर काय इलाज केला पाहिजे तेंहि एकदम त्यांच्या ध्यानांत आलं.

सत्याग्रह !

आजपर्यंत झोंपलेल्या, आळसलेल्या अशा त्या लहानशा गांवांत तो एकच शब्द जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागला. बाजारांत, देवळांत, पाणवठ्यावर, शेतावर–जिकडे तिकडे !

तें पाहून राजाभाऊला विलक्षण समाधान झालं.

सत्याग्रह सुरू झाल्यावर आपण त्यांत सामील व्हायचं असा राजाभाऊच्या मनाचा निश्चय झाला.

त्याच्या वृत्तीचा धर्मच असा होता, कीं कशावरून तरी जीव कुरबान करून टाकावा, कुठं तरी भावनांचं अनन्यत्व जडवावं, विवेकाच्या संथपणापेक्षां अविवेकाची उत्कंठा व त्वरा अनुभवावा !......

गेल्या दीड वर्षभर एका स्त्रीवर अनुरक्त होऊन त्यानं या गोष्टी केल्या होत्या.

त्याच्या अंतःकरणाचा तो नाद सुटला होता. अशा वेळीं सबंध देशांत विद्युत्प्रवाहाप्रमाणें पसरलेल्या देशसेवेच्या कल्पनांचा त्याच्या अंतःकरणाला स्पर्श झाला. देशासाठीं स्वत्व विसरायला तो तयार झाला !

गेल्या दोन वर्षांप्रमाणेंच यंदाहि त्याच्या कॉलेजांतल्या नेमणुकीबद्दल प्रश्न उपस्थित झाला. आतां कॉलेजचे अधिकारी त्याला कायम करून घ्यावयास तयार होते. पण तोच तयार नव्हता. मनांतले सत्याग्रहाचे बेत त्यानं कॉलेजांत कुणाजवळ बोलून दाखविले नाहींत. कॉलेजच्या अधिकारी वर्गात मवाळ राजकारणाचं प्राबल्य आहे हें त्याला माहीत होतं. म्हणून कायम नेमणुकीची सूचना जेव्हां त्याच्यापुढें मांडली गेली तेव्हां तो इतकंच म्हणाला,

" या संस्थेचा आजन्म सभासद होण्याचा माझा मनाचा निश्चय झालेला नाहीं. तुमची हरकत नसेल तर माझी हंगामी नेमणूक आणखी दोन वर्षं चालू ठेवा. ती तुम्हाला नको असेल तर मी जातों."

पण राजाभाऊला अजीबात सोडण्याची चालकांची इच्छा नव्हती. त्यांनीं त्याची हंगामी नेमणूक पुढें चालू ठेवली.

१० मार्च रोजीं कॉलेज बंद झालं. राजाभाऊ ताबडतोब खेडेगांवाकडे गेला.

मार्च महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत 'रौलॅट बिल' पास झालं आतां सत्याग्रहाची प्रचंड चळवळ होणार हें स्पष्ट दिसूं लागलं चळवळ सुरू करण्याच्या दृष्टीनं गांधींनीं देशभर मोठा दौरा काढला. जिकडे तिकडे त्यांचं

प्रचंड स्वागत झालं. कायदेभंगाच्या उपायानं आपण सरकारला 'रौलॅट बिल' रद्द करावयास लावूं असा गांधींना पूर्ण विश्वास वाटत होता. कायदेभंगांत सामील होणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनं जी शपथ घ्यावयाची तिचा पुढील मसुदा त्यांनीं १८ मार्च रोजीं प्रसिद्ध केला होताः—

"रौलॅट बिलांस कायद्याचं स्वरूप प्राप्त झाल्यास तीं रद्द होईपर्यंत त्या कायद्यांचा, व या कामाकरितां नेमलेली कमेटी यापुढें टरवील त्या कायद्यांचा मी विनयपूर्वक भंग करीन व हा लढा चालू असेपर्यंत जीवित, व्यक्ति व मालमत्ता या बाबतींत अनत्याचार व सत्य यांचं परिपलन करीन अशी मी प्रतिज्ञा करतो."

राजाभाऊनं या प्रतिज्ञापत्रकावर सही केली, आणि गांवांतल्या सुमारें शंभर लोकांकडून तें प्रतिज्ञापत्रक भरून घेतलं.

मनाला मानेल तो स्वार्थत्याग करण्यास आपण मोकळे आहोंत. आपल्याला आईबाप नाहींत, नात्यागोत्याचीं कुणी माणसं नाहींत, आपल्याला ओढणारे कसलेही मायेचे पाश नाहींत, या पोरकेपणाचा त्याला त्या दिवशीं विलक्षण आनंद होत होता!

पण त्याची ही कल्पना खरी कुठं होती?

गेल्या दोन अडीच महिन्यांत त्याच्या मनाला जरी उमाचा विसर पडला होता, तरी दैवयोगानं त्याचा व तिचा जो ऋणानुबंध उत्पन्न झाला होता, तो नाहींसा थोडाच झाला होता?

देशासाठीं त्यागाचं दिव्य करण्यास उत्सुक झालेल्या राजाभाऊला त्या ऋणानुबंधाचं भान उरलं नव्हतं, पण ज्या दिवशीं त्यानं प्रतिज्ञा-पत्रकावर सही केली त्याच दिवशीं त्या ऋणानुबंधाची आठवण त्याला स्वतःला करून घ्यावी लागली. त्याचा कारकून पुण्याहून अकस्मात् त्याच्याकडे आला व म्हणाला,

"राजाभाऊ, तुम्हांला तावडतोब पुण्यास आलं पाहिजे."

"कां?"

"उमानं तावडतोब बोलावलं आहे तुम्हांला."

"तिला सांग मी चार सहा दिवसांनीं येईन. जा."

"नाहीं, ती भयंकर संकटांत आहे."

"संकटांत आहे? कसल्या?"

"तिचे अण्णा परवा एकाएकी वारले."

"अरेरे! काय सांगतोस? बिचारी उमा!"

"अन् येवढ्यावरच भागलं नाहीं. तिचा नवरा पुण्यास आला आहे, अन् रोज निरोप पाठवून त्यानं उमाच्या मागं तगादा चालवला आहे, कीं तिनं त्याच्याकडे परत रहायला गेलं पाहिजे."

तें वृत्त ऐकतांच राजाभाऊच्या अंतःकरणांतील सारी अनुकंपा एकदम उचंबळून आली! देशाच्या रक्षणासाठीं शांतियुद्ध करावयास उत्कंठित झालेल्या राजाभाऊच्या मनांत एकच विचार उरला—

उमाचं रक्षण!

तो ताबडतोब पुण्यास परत आला!

देशाच्या महान् सुखदुःखाशीं समरस होऊं पहाणाऱ्या जिवाला वैयक्तिक ऋणानुबंधाचे आणि सुखदुःखांचे पाश आपापल्यापरी सदा ओढीतच असतात हेंच खरं!



# [१३]

उमाचा संसार दुःखाचा आहे येवढी जरी सामान्य कल्पना राजाभाऊला आज वर्ष दीड वर्ष होतीं, तरी तिच्या दुःखाचा तपशील त्याला माहीत नव्हता. तो माहीत करून घेण्याचा प्रयत्नही त्यानं कधीं केला नव्हता. उमा अत्यंत बुद्धिमती आहे, तिच्या अंतःकरणाचा सरळपणा अन् प्रेमळपणा असामान्य आहे, पतिगृहाचा त्याग केल्यावर सच्चरित्रानं अन् स्वतंत्र बाण्यानं रहायची महत्त्वाकांक्षा तिच्या ठिकाणीं आहे येवढ्या गोष्टी त्याच्या पूर्ण प्रत्ययाला आल्या होत्या; आणि त्याच्या अंतःकरणांत तिच्याविषयीं गाढ करुणा आणि सहानुभूति उत्पन्न करावयास त्या पुरेशा होत्या. ती करुणा अन् सहानुभूति दाखवतांना तिच्या भग्न संसाराचा तपशील माहीत करून घेण्याची इच्छा त्याला कधींच झाली नव्हती. तिनं तो विषय नेहमीं टाळला होता, त्यानं तो तिच्या जवळच नव्हे तर इतर कोणाजवळसुद्धां काढला नव्हता.

मनाशीं तो येवढंच समजूत होता, कीं उमाच्या संसाराची कहाणी मोठी दुःखाची असली पाहिजे. ती त्याच्याशीं बोलत बसलेली असली व तिच्या लक्षांत न येतां तिच्याकडे निरखून पहातां आलं, कीं तसं पाहून तो आपल्या मनाला विचारी, या उमाच्या नवऱ्याला हिच्याविषयीं अगदींसुद्धां आकर्षण व जिव्हाळा वाटूं नये असं कां बरं असावं? हिची बुद्धि किती सुंदर आहे, हिचं अंतःकरण किती मोहक आहे. मग केवळ हिच्याजवळ रूपसंपदा नाहीं येवढ्याच कारणासाठीं हिच्या नवऱ्याला ही नकोशी वाटावी? त्याचं चित्त हिच्या ठिकाणीं रममाण होणं अशक्य ठरावं?...

असे विचार मनांत येऊं लागले, कीं उमाचा नवरा म्हणजे एक खल-पुरुष असला पाहिजे असं त्याला अधिकाधिक निश्चयानं वाटूं लागे.

त्याच्या मनानं उमाच्या नवऱ्याची एक काल्पनिक मूर्ति तयार केली होती. शरिरानं काळा सावळा, उंचीनं मध्यम, नाकाडोळ्यांनीं कुरूप, तोंडावर देवीचे वण असलेला, व्यसनांनीं निस्तेज झालेल्या चेहऱ्याचा, बुद्धीची आणि अंतःकरणाची योग्यता ओळखण्याच्या सामर्थ्याचा अभाव दर्शवणाऱ्या मंद दृष्टीचा, साधारण अव्यवस्थित अन् मळकटच पोषाखाचा असा इसम त्याच्या कल्पनेपुढें नेहमीं उभा राही.

त्यामुळं पुण्यास परत आल्यावर उमावरचं नवीन संकट दूर करण्याचा सर्वांत श्रेयस्कर मार्ग म्हणून तिच्या नवऱ्याला आपल्याकडे बोलावून घेऊन त्याच्याशीं बोलणं करायचं जेव्हां राजाभाऊनं ठरवलं, आणि त्याच्या बोलावण्या-प्रमाणें उमाचा नवरा–महेश्वर–जेव्हां त्याच्याकडे आला, तेव्हां त्याला पहातांच राजाभाऊला विस्मयाचा लहानसा धक्का बसला.

त्यानं कल्पनेनं बनविलेल्या महेश्वराशीं या महेश्वराचं यत्किंचित्‌ही साम्य नव्हतं!

हा गोरापान होता. साधारण उंचच होता. नाकाडोळ्यांनीं नीटस होता. बहुतांशीं पांढरे झालेले डोक्यावरचे केस व किंचित् लालसर रागावल्यासारखी वाटणारी खुनशी दृष्टि याखेरीज व्यसनीपणा दर्शविणारी कुठलीच खूण त्याच्या चर्येत नव्हती, आणि त्याचा पोषाख फार उंची नसला तरी चांगला ऐटबाज होता.

उमासारख्या सुशील पत्नीचा छळ करणारा दुष्ट पति महेश्वराच्या ठिकाणीं राजाभाऊला चटकन् दिसेना.

आणि महेश्वर जेव्हां बोलूं लागला तेव्हां तर त्याच्या मनांत आलं, किती सरळ आणि प्रेमळ माणूस आहे हा! उमा याला सोडून काय म्हणून आली? आणि याच्याकडे परत जावं लागलं तर त्यांत तिला भयंकर संकट कां वाटावं?

आदल्या रात्रीं उमा राजाभाऊला म्हणाली होती, "तुम्हां त्यांना भेटायला बोलावलं आहांत तर भेटा. मी नको म्हणत नाहीं. पण येवढंच लक्षांत ठेवा, की त्यांना चार गोष्टी समजून सांगून शहाणं करायचं असा प्रश्नच उरलेला नाहीं. कांहां तरी सामोपचार घडवून आणून मला पतिगृहीं परत जायला लावावं असा जर तुमच्या मनांतला हिशोब असेल तर तो चुकीचा आहे. असलं सहाय्य मी तुमच्याजवळ मागत नाहीं. मी तुमच्याजवळ जें सहाय्य मागतें तें अगदीं निराळ्या स्वरूपाचं आहे, अन् तें देण्याइतकी माझ्याबद्दलची करुणा अन् लोकापवादाला तुच्छ समजण्याची धिटाई तुमच्याजवळ आहे कीं नाहीं हाच खरा प्रश्न आहे. मला परत त्यांच्याकडे जायला न सांगतां माझं जन्मभर रक्षण करण्याचं सामर्थ्य अन् धैर्य तुमच्या अंगीं आहे कीं नाहीं येवढंच तुम्हांला ठरवायचं आहे, तें असेल तर मी जिवंत राहीन, नाहीं तर माझ्या आनंदाला तुमच्या पायांवर ठेवून मी स्वतःच्या जिवाचा अंत करून टाकीन..."

असं म्हणून ती किती वेळ तरी स्फुंदून स्फुंदून रडली होती!

तें तिचं रडणं आणि निर्वाणीचं बोलणं एकीकडे आठवतां आठवतां आज आतां समोर बसलेल्या महेश्वराचं बोलणं जेव्हां राजाभाऊ ऐकूं लागला, तेव्हां तो मोठ्या बुचकळ्यांत पडला.

कारण, महेश्वर एखाद्या दुष्ट दांडग्या खलपुरुषाप्रमाणें बोलत नव्हता. त्याच्या बोलण्यांत सरळपणा होता, गोडी होती, नम्रतासुद्धां होती.

तो म्हणत होता, "उमानं माझ्याकडे परत यावं असा मी आग्रह धरला तर त्यांत वावगं काय आहे? मी तिला कधीं घराबाहेर काढली नाहीं. तीच निघून आली! कायदाच पाहिला तर माझ्या बाजूचा आहे. मी तिचा ताबा

मागूं शकेन अन् तो मला मिळेल. पण मला कायद्यापेक्षां सामोपचार हवा आहे. वास्तविक ती इकडे आपल्या वडिलांकडे निघून आली तेव्हांच मी तिला न्ययला येणार होतो. पण तितक्यांत आमच्या बँकेंतल्या एका खटल्यांत मी सापडलों अन् मला दोन वर्षांची शिक्षा झाली. शत्रूंनीं माझं वैर साधलं! अहो शत्रू नसतात कुणाला? पण तें जाऊं द्या. तुम्हीच सांगा, मी आतां सुटून आलों, पुन्हां कुठें तरी नोकरीचा जम बसवावा, गेलेली अब्रू साफ करावी, संसार करावा असं मला वाटणं सहाजिक नाहीं? अन् अशा वेळीं उमा जवळ असावी असं मला वाटलं तर त्यांत माझा कांहीं दोष आहे? तिच्यावर माझं फार फार प्रेम आहे. खोटं नाहीं सांगत. तुमच्या गळयाची शपथ! तिच्यासाठीं माझा जीव तिळ तिळ तुटतो......”

असं बोलतां बोलतां त्यानं राजाभाऊचा हात झटकन् पकडला, आणि राजाभाऊनं पाहिलं तों त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आलेलें त्याला दिसले.

‘तुम्हीं घाई करूं नका. पाहूं, यांतून मार्ग काढूं आपण’ असं महेश्वराला आश्वासन देऊन राजाभाऊनं त्याची रवानगी केली तेव्हां त्याची स्वतःची मनःस्थिति मोठी गोंधळल्यासारखी झाली होती.

त्याला वाटलं होतं, महेश्वर कायद्याच्या, हक्काच्या अन् अरेरावीच्याच गोष्टी करील, आणि आपल्याला त्याच्याशीं चांगलंच भांडण करावं लागेल.

पण तसं कांहींच झालं नव्हतं!

तो अगदीं गोंधळून गेला.

रात्रीं उमाजवळ जेव्हां त्यानं ती सारी हकीगत सांगितली, आणि आपल्या मनाचा गोंधळ स्पष्ट बोलून दाखवला, तेव्हा तिनं आपल्या कपाळावर हात मारला अन् म्हटलं,

“कर्म माझं! माझ्या दुर्दैवाचा विशेष तो हाच आहे हो राजाभाऊ! मला वाटतं या जगांत निर्दय दुष्टांच्या दोन तऱ्हा आहेत. कांहीं निर्दय उघड उघड निर्दयासारखे दिसतात अन् बोलतात. पण कांहीं दिसायला मोठे सोज्वळ दिसतात, अन् सज्जनासारखं बोलतात! त्यांचा दुष्टपणा पहायचा असेल, तर दुष्ट कृत्य करण्याच्या त्यांच्या ज्या ठरलेल्या वेळा असतात त्यावेळींच

त्यांना पाहिलं पाहिजे. माझ्या संसाराची चर्चा मीं तुमच्याजवळ कधीं केली नाहीं. तुमच्या सुंदर मुग्ध अंतःकरणाला या जगांतली गुप्त निर्दयता कशाला माहीत करून द्यायची असं मला नेहमी वाटे. पण आतां मला स्पष्ट बोललं पाहिजे. माझे पति बुद्धिमान आहेत, प्रेमळ आहेत, एकदां श्रीमंतही फार होते. या सगळ्या गोष्टींना भुलून तर माझ्या अण्णांनीं जमीन विकून गांठचा सगळा पैसा एकत्र करून मला या स्थळीं दिलं. पण लग्नानंतर अवघ्या एक दीड वर्षांत यांनीं सगळी इस्टेट व्यसनापायीं घालवली! अन् जसा पैसा गेला तसाच यांचा प्रेमळपणासुद्धां असून नसल्यासारखा झाला हो! सकाळीं दहा वाजतां उठले कीं तेव्हांपासून संध्याकाळपर्यंत ते मोठ्या प्रेमळपणानं वागत, माझी विचारपूस करीत, मला हवं तें आणून देत, आनंदला कडेखांद्यावर घेऊन बाजारांत जात, आणि त्याला उंची खेळणीं आणि खाऊ घेऊन देत. पण संध्याकाळ झाली, कीं एकदम सारा देखावा निराळा! चार मित्र बरोबर घेऊन येत, आणखी मदिरापान जें सुरू होई तें रात्रीं बारा बारा, एक एक वाजेपर्यंत. त्या वेळीं मग राक्षस बरा असे ते वागत. ओरडणं, शिव्यागाळी, मारहाण अशा प्रकारांना ऊत येई. मुंबईस आम्हांला कुठें बिऱ्हाडाला जागासुद्धां मिळेना. मालक आमच्या या तमाशाला सहाजिकच कंटाळे. मी मालकाकडे जाई, त्याची प्रार्थना करी, त्याचे पायदेखील धरी तेव्हां दया आली तर आली. आणखी काय वर्णन करूं मी? आयती वडिलार्जित श्रीमंती होती ती यांनीं केव्हांच घालवली. व्यसनानामुळं दारिद्र्य यायला लागलं तेव्हां गुन्हे करून पैसा मिळवण्याकडे यांच्या हुशारीचा उपयोग व्हायला लागला, आणि बायकोला अन् पोटच्या एकुलत्या एक मुलाला दिवसां शुद्धीवर असतांना ममतेनं गोंजरायचं, पण रात्रीं बेभान होऊन मारायचं असा यांचा क्रम सुरू झाला! हा नरकवास असह्य झाला म्हणूनच ना अखेर धीर करून मीं अण्णांकडे आलें? त्याच नरकांत मी परत रहायला जाऊं म्हणतां? त्यांच्या दिखाऊ सौजन्यानं, नाटकी ममतेनं, आणि खोट्या रडण्यानं फसूं नका हो! तो सारा दिवसाचा क्षणिक देखावा आहे. त्यांचा सहवास म्हणजे शुद्ध नरक आहे. त्यांत लोटणार तुम्ही मला पुन्हां? माझे अण्णा गेले. माझं असं मला आतां कुणी उरलं नाहीं. अशा वेळीं तुम्हांला मी माझे—"

बोलतां बोलतां उमाला अतिशय मोठा हुंदका आला, आणि तिचं

गदगदणारं शरीर आणि दाबूनही फुटलेल्या रडण्याचा करुण स्वर राजाभाऊच्या दृष्टीला आणि कानांना सहन करवेना.

*　　　*　　　*

या वेळीं त्यानं अनत्याचारी सत्याग्रहाच्या प्रतिज्ञेवर सही केलेली होती. 'सत्य आणि अहिंसा' या गांधींच्या नव्या घोषणेचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झालेला होता. अन्यायाशीं आणि जुलमाशीं झगडण्याचं साधन म्हणून अहिंसेचा आणि सत्यनिष्ठ अनत्याचाराचा खरोखरच उपयोग होण्यासारखा आहे अशी श्रद्धा त्याच्या मनांत उदय पावली होती, आणि ज्या त्या प्रश्नाला तें तत्त्व लावून पहाण्यास त्याचं मन उद्युक्त होतं.

त्यामुळें उमाला दुःखमुक्त करण्याच्या प्रश्नाचाही त्या तत्त्वानुसार तो विचार करूं लागला.

बलिष्ठ परकीय राजसत्तेशीं झुंज करून यश मिळवण्याचं सामर्थ्य जर सत्याग्रहांत आहे, तर जुलमी नवऱ्याचा छळ नष्ट करण्याचं सामर्थ्यही सत्याग्रहांत असेल काय? असा सत्याग्रह उमानं करायचा म्हटला तर तिनं काय केलं पाहिजे? राजसत्तेशीं जो प्रचंड सत्याग्रह सुरूं होणार आहे त्यांत आमचा मार्ग अन् आमचं कर्तव्य स्पष्ट आहे. कायदेभंग करायचा, सरकारनं पकडलं तर पकडूं द्यायचं, शिक्षा झाली तर तुरुंगांत जायचं, तुरुंगांतून सुटलं कीं पुन्हां कायदेभंग, पुन्हां शिक्षा, पुन्हां तुरुंग! पण उमानं काय करायचं? तिनं कोणता कायदा मोडायचा? कोणाची शिक्षा ऐकायची? कोणत्या तुरुंगांत जायचं? —आणखी विशेष म्हणजे हें सारं करतांना कोणती आशा मनाशीं ठेवायची?...

उमानं कायदा मोडावयाचा म्हणजे नवऱ्याकडे परत जायचं, कीं जात नाहीं म्हणून साफ सांगायचं? पण असं करणं तिला कितपत शक्य होतं? तिनं असं केलं, अन् समजा तिचा नवरा तिला बलात्कारानं घेऊन गेला तर? तोहि एक तुरुंगवासच घडणार होता तिला! पण त्या तुरुंगांतून तिची कधीं सुटका होण्यासारखी होती का? मृत्यूबरोबरच काय ती तिची सुटका होण्याची आशा होती!...

मग असल्या तुरुंगवासाला तिनं तयार व्हायचं? असा तुरुंगवास घड-विणाऱ्या सत्याग्रहाचा तिनं आश्रय करायचा ?

हिंदु धर्माचा कायदा मान्य करून ती नवऱ्याकडे गेली, तरी तुरुंगांतच पडणार होती, आणि त्या कायद्याचा भंग करून अनत्याचाराचं व्रत तिनं अंगिकारलं, तरीहि ती त्या तुरुंगांत पडत होती! मग त्या दोन मार्गांत फरक तो कुठें राहिला, अन् सत्याग्रहाची श्रेष्ठता ती काय राहिली ?...

म्हणजे असंच म्हटलं पाहिजे की काय, कीं देशाची परदास्यांतून सुटका करणं आणि उमाची नवऱ्याच्या जाचांतून सुटका करणं, हे दोन प्रश्न अगदी भिन्न भिन्न स्वरूपाचे होते ? त्या दोहोंना एकच तत्व लावूं पहाणं चुकीचं होतं ? देशावरचं राजकीय संकट आणि सामाजिक जीवनांतल्या वैगुण्यामुळें आणि आप्तस्वकीयांच्या अन्यायामुळें व्यक्तीवर ओढणारं संकट या दोहांत साम्य असल्याची कल्पना चुकीची होती ? ती चुकीची असेल तर उमाच्या संकटावर सत्याग्रहाऐवजीं दुसराच कांहीं तरी उपाय असला पाहिजे!......इतकंच नव्हे तर हिंदुस्तान ज्या परदास्याच्या संकटांत सांपडला आहे त्या बाबतींत देखील ' सत्याग्रह ' म्हणजे केवळ आजच्या परिस्थितींत सर्वांत अधिक उपयुक्त असा एक उपायच म्हटला पाहिजे. इतर उपाय सोयीचे नाहीत, झेंपण्या-सारखे नाहींत म्हणून सत्याग्रहाचा अवलंब करायचा. सत्याग्रह म्हणचे एक धूर्त धोरण होय. चतुराईनं योजलेलं साधन होय....

पण गांधीं तर म्हणतात, सत्याग्रह हें साधन नसून साध्य आहे...

ते म्हणतात, सत्याग्रहाचं तत्त्व सर्व प्रश्नांस लागूं करतां येण्यासारखं आहे. राजकीय, सामाजिक, वैयक्तिक जीवनांतहि! जिथें जिथें न्याय व अन्याय, अगर सत्ता आणि सत्य यांचा संग्राम सुरू होतो, तिथें तिथें माणसानं सत्याग्रहाची कास धरावी. त्याचा विजय होईल हें निश्चित!...

एवढंच काय, सामान्य संसारांत जिव्हाळ्याच्या नात्यागोत्याच्या माण-सांत जेव्हां जेव्हां लढा उत्पन्न होतो तेव्हां तेव्हां जो सत्याचा आग्रह धरून हालअपेष्टा सोसतो त्याचा विजय कसा होतो हे पाहूनच राजकारणांतही

या सत्याग्रहाच्या तत्त्वाची योजना करण्याची कल्पना आपल्या मनांत आली असंही महात्मा गांधी बोलून दाखवीत होते व लिहीत होते !......

त्यांचे हे उद्गार खरे कसे मानायचे ?

ते खरे असते तर उमानं सत्याग्रह केल्यास तिचं कल्याण कसं होईल तें स्पष्ट दिसायला हवं होतं आणि तें तर मुळींच स्पष्ट दिसत नव्हतं. ही शंका गांधींना विचारली तर कदाचित् असंही म्हणायला ते कमी करायचे नाहींत कीं उमानं सत्याग्रह करावा, त्याचे जे कांहीं परिणाम होतील ते भोगावेत—ते भोगण्यांतच तिचं कल्याण आहे.

पण उमाच्या दुःखविमोचनासाठीं तळमळणाऱ्या आपल्या मनाचं असल्या उत्तरानं समाधान होईल असं राजाभाऊला वाटेना. स्वतः उमाच्या मनाचं समाधान होणं तर शक्यच नव्हतं.

मग धर्माच्या भूमिकेवर राजकारण लढविण्याची गांधींची कल्पना निर्दोष कीं सदोष म्हणायची ? राष्ट्रधर्म आणि व्यक्तिधर्म हे भिन्न भिन्न तर नाहींत ?...

हे गहन प्रश्न राजाभाऊला सुटेनातच. पण उमाबद्दलचा जो व्यावहारिक प्रश्न त्याच्यापुढें तातडीनं उभा होता तोही त्याला सुटेना. अनेक परस्पर विरोधी विचारांची त्याच्या मनांत गर्दी होऊं लागली.

उमाला आपण कोणता सल्ला द्यावा किंवा आपण तिचं रक्षण कसं करावं याचं उत्तर त्याला नीटसं सांपडेना.

मात्र संदिग्धता आणि संशय वाढविणाऱ्या असल्या परस्परविरोधी विचारांचीं आंदोलनं राजाभाऊच्या मनाला एकीकडे बसत असतांना, त्याच्या मनाचा निश्चय करणारी एक गोष्ट दुसरीकडे घडत होती.

ती ही, कीं महेश्वराचं उमानं वर्णन केलेलं खरं खलस्वरूप त्याला अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागलं होतं.

महेश्वर आतां बोलावण्याची वाट न पहातां आपण होऊन हेलपाटे घालूं लागला होता. 'माझं उमावर फार प्रेम आहे' ही त्याच्या बोलण्यांतली

प्रतारणा कमी होत गेली होती, प्रेमापेक्षां हक्काच्या आणि धाकाच्याच गोष्टी तो अधिक सांगूं लागला होता आणि ' बऱ्या बोलानं उमानं माझ्याकडे यावं हें चांगलं, नाहीं तर तुम्हांला कल्पनाही करतां येणार नाहीं असा तुमचा सर्वांचा छळ मी सुरू करीन ' अशी धमकी अखेर द्यायला त्यानं कमी केलं नव्हतं.

एकदां तर तो एकाएकी रात्रीच्या वेळीं आला, व राजाभाऊ आणि उमा बोलत बसलीं होतीं त्या दोघांस पाहून विचित्र हास्य करून म्हणाला,

" मला वाटलंच होतं रात्रीं तुम्ही दोघं एकत्र सांपडाल म्हणून ! "

आणि मग तो अद्वातद्वा वाटेल तें बरळूं लागला.

त्यानं खूप निशापाणी केलं होतं हें उघड उघड दिसत होतं.

आपल्या नेहमींच्या धाकाच्या बोलण्याची त्यानं उजळणी केलीच, पण तेवढ्यावरच न थांबतां तो पुढें म्हणाला,

" कोर्टांत अर्ज करून माझ्या बायकोचा ताबा तर मी मिळवीनच. पण राजाभाऊ तुमच्यावरही मी फिर्याद करीन. काय समजला तुम्ही ? माझ्या बायकोला यानं घरांतून काढून पळवून आणली आहे असं सरकारला सांगेन ! असल्या गुन्हाबद्दल किती मोठी शिक्षा होते माहीत आहे कां मिस्टर तुम्हाला ? आमच्या बँकेचा मॅनेजर असल्या खटल्यांत सांपडला होता तेव्हां तीन वर्षं खडी फोडावी लागली त्याला ! युरोपियन होता तरी सुटला नाही. मग तुम्ही तर काय, काला आदमी है तूम ! "

दारूच्या निशेंतलं हें बोलणं बोलतांना त्याचा शब्दोच्चार नीट होत नव्हता आणि त्याला धड जागच्या जागीं उभंही रहातां येत नव्हतं.

त्याच्या बोलण्याचा राग मानून त्याला शासन करावं कीं त्याच्या अवस्थेची कींव करून त्याला कसाबसा खोलीबाहेर घालवावा हें कळणं कठीण होतं. दोन्ही निश्चय राजाभाऊंच्या अंतःकरणांत आळीपाळीनं उसळत होते. तितक्यांत महेश्वर उमाकडे पाहून पुढें म्हणाला,

" आतां आलं लक्षांत तूं माझ्याकडे यायला कां तयार नाहींस तें. जवळ जवळ तुझ्या वयाचा, कोवळा, छबकडा यार मिळवला आहेस तूं. मग कशाला

आठवेल तुला पतिव्रतेचा धर्म? पण लग्नाच्या नवऱ्याला सोडून खुशाल याच्याजवळ रखेली होऊन —"

पण त्याच्या त्या ओंगळ गलिच्छ वाक्याचे बाकीचे शब्द उच्चारले गेले नाहींत.

राजाभाऊनं पुढे होऊन काडकन् त्याच्या कानशिलांत दिली!

महेश्वराचं मूर्ख गलिच्छ बोलणं ऐकत असतांना राजाभाऊच्या अंतः-करणांत दोन भिन्न विचारांची जी झुंज चालली होती ती त्याला नकळत एकदम संपली, आणि त्याला स्वतःला समजण्यापूर्वीच त्याचा हात उसळून महेश्वरावर प्रहार झाला.

अनत्याचाराची प्रतिज्ञा आपण केलेली आहे हें तो स्वतःला सारखं बजवीत होता. जी प्रतिज्ञा आपण राजकारणासाठीं केली तिचं परिपालन आपण इतर सर्व बाबतींतही अष्टौप्रहर केलं पाहिजे असा विवेक तो स्वतःला शिकवीत होता. पण याच्या उलट महेश्वराचं पाजीपणाचं बरळणं निमुटपणें ऐकण्याऐवजी त्याचा कडक प्रतिकार करणं हेंच आपलं खरं कर्तव्य आहे, राजकारणासाठीं घेतलेल्या शपथेचा या प्रसंगाशीं कांहीं संबंध नाहीं असंही त्याला तीव्रतेनं वाटत होतं. त्याचा एक जीव "विवेक कर, शांत रहा, तूं अनत्याचारी आहेस" असं ओरडत होता; तर त्याच्या तरुण ताज्या रक्तांतला थेंब न् थेंब उसळून स्फुरण पावून आक्रोश करीत होता, "कसली अहिंसा घेऊन बसला आहेस? तूं मानधन आहेस कां भेकड आहेस? उचल हात अन् कर पारिपत्य."

अंतःकरणांतला हा संग्राम राजाभाऊला आधींच असह्य झाला होता; आणि त्यांतच उमाला उद्देशून महेश्वरानं उच्चारलेले किळसवाणें शब्द जेव्हां त्याच्या कानीं पडले तेव्हां त्याला राहवलं नाहीं.

त्यानं काडकन् महेश्वराच्या कानशिलांत लगावली.

*　　*　　*

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उमा राजाभाऊकडे येऊन म्हणाली,

"माझा विचार बदलला आहे. मी जातें त्यांच्याकडे. त्यांना बोलवा अन् सांगा तसं."

राजाभाऊ विलक्षण आश्चर्यचकित झाला आणि तिच्याकडे पहात राहिला.

म्हणून उमा पुन्हां म्हणाली, "खरंच, त्यांच्याकडे जायला मी तयार आहे."

"तुला वेड लागलं कीं काय?"

"वेड नाहीं, सगळ्या गोष्टींचा शांतपणानं विचार करून मी हा निश्चय केला आहे."

"पण आतांच कां करते आहेस हा घातुक निश्चय? कालपर्यंत असं म्हणत नव्हतीस अन् आज कां म्हणते आहेस?"

"काल रात्री जो प्रकार झाला त्यानं आजपर्यंत जी गोष्ट लक्षांत आली नव्हती ती माझ्या लक्षांत आली. एक नवीनच भीति मला वाटूं लागली आहे."

"ती कोणती?"

"माझ्याप्रमाणेंच तुमचाहि छळ होईल ही. आजपर्यंत मला वाटत होतं कीं मी त्यांच्याकडे गेलें नाहीं तर फार फार तें काय होईल? माझ्या-विरुद्ध ते कोर्टांत दाद मागतील, आणखी चौकशीसाठीं कोर्टापुढं उभं रहावं लागलंच तर लाजलज्जा सोडून माझ्या संसाराची हकीगत भर कोर्टात सांगण्याचा सोहळा मला सोसावा लागेल इतकंच. माझा एकटीचा छळ होईल! तेवढयाला मी आपल्या मनाची तयारी केली होती, अन् म्हणूनच तुमची मदत सारखी मागत होतें. पण कालचा प्रकार पाहून मला एक नवीनच भीति वाटायला लागली. या प्रकरणांत माझ्याप्रमाणंच तुमचाहि छळ होणार अशीं चिन्हं दिसूं लागलीं. तुमचा छळ व्हावा अशी माझी इच्छा नाहीं. तो झालेला मला डोळ्यांनीं पाहवणार नाहीं. तुम्ही नका माझं रक्षण करण्याच्या भानगडींत पडूं. मी जाईन परत त्यांच्याकडे—"

असं म्हणून उमानं क्षणभर राजाभाऊकडे दृष्टि लावून असं अवसान दाखवलं कीं, जणूं हें कराराचं बोलणं बोलतांना आपलं हृदय यत्किंचितसुद्धां कंपित होत नाहीं.

पण माणसाचं ज्या व्यक्तींवर विलक्षण प्रेम असतं त्याच्याशीं असं कांहीं निर्वाणीचं बोलतांना आणलेलं कराराचं अवसान फार वेळ टिकत नाहीं. त्याच्या मागोमाग रडणं फुटतं, आणि कोंडलेला दुःखभार हुंदक्यावाटे बाहेर पडतो.

उमा दुसऱ्याच क्षणीं पदरानं तोंड झांकून रडूं लागली.

राजाभाऊ म्हणाला,

" उमा, उमा, हें काय ? "

तोंडावरचा पदर न काढतां स्फुंदत स्फुंदत उमा म्हणाली,

" खोटं नाहीं सांगत. तिकडे जायचं म्हणजे नरकांत पडायचं हें मी पक्कं समजून आहे. पण मी जाईन. तुमचा छळ व्हायला नको. तुम्ही मला प्राणापेक्षांहि—"

पुन्हां तिचे हुंदके तिला अनावर झाले.

राजाभाऊ तिला म्हणाला,

" उमा, असं काय ? रडायचं नाहीं. अंहं, अगदीं रडायचं नाहीं. डोळे पूस अन् माझ्याकडे बघ पाहूं. मी तुला काय सांगतों तें नीट ऐक."

तिनं जेव्हां त्याचं ऐकलं आणि डोळे पुसून आपली थरथरती दृष्टि त्याच्याकडे वळविली तेव्हां तो पुढें म्हणाला,

" हे बघ उमा, तुझा पति कशा तऱ्हेचा मनुष्य आहे हें मला आतां पूर्णपणानं कळलं आहे. अशा पतीच्या घरीं जायला तूं तयार झालीस तरी मी तुला जाऊं देणार नाहीं. दुर्दैव इतकंच, कीं एकीकडे तुझ्यावरच्या या संकटांत तूं सुखरूप रहावंस यासाठीं मी तुझ्याजवळ सतत असणं आवश्यक आहे; पण दुसरीकडे मला तुरुंगांत केव्हां जावं लागेल त्याचा नियम नाहीं—किंबहुना लवकरच जावं लागेल याबद्दल शंका नाहीं. पण मी तुरुंगांत गेलों तरी तुझ्या पतीचा उपद्रव तुला होणार नाहीं अशी कांहीं तरी व्यवस्था करून मगच जाईन याबद्दल खात्री असूं दे."

आतां उमानं आपलं रडणं आवरलं होतं. तिची दृष्टीहि निश्चल झाली होती. ती म्हणाली,

" तुम्ही माझं रक्षण करण्यांत कसूर कराल अशी मला मुळींच शंका नाहीं. पण माझी भीति अगदीं निराळी आहे. तुम्हीं देशसेवेचं जें व्रत स्वीकारलं आहे त्याच्या आड यायची माझी मुळींच इच्छा नाहीं. त्या व्रताचा अलंकार तुमच्या अंगावर तुम्ही चढवलांत त्यामुळें तुम्ही मला अधिकच मोठे दिसता-हांत. पण मला हें माहीत आहे कीं, ज्याला देशसेवा करायची अन् लोकांचं पुढारीपण पत्करायचं त्याच्या चारित्र्यावर कसलासुद्धां डाग असतां कामा नये. उद्यां जर माझ्याविरुद्ध दाद मागतांना माझ्या पतींनीं तुमचं नांव घेतलं अन् तुमच्यावर किळसवाणे आरोप केले तर केवढी वाईट गोष्ट होईल! माझ्या संसर्गानं तुमच्या चारित्र्यावर केवढा ठपका येईल! अन् त्यामुळें तुमच्या देशसेवेच्या मार्गांत केवढा तरी अडथळा येईल! नाहीं का? उद्या लोक जर माझं अन् तुमचं नांव एकत्र उच्चारून भलभलतं बोलूं लागले तर तुमचा मोठेपणा, तुमचा लौकिक, तुमची देशसेवा—"

हें बोलतां बोलतां उमाच्या अंगाला एकदम विलक्षण कंप सुटला, तिचा गळा दाटून आला आणि राजाभाऊकडे अतिशय दीनवाण्या मुद्रेनं एकदां पाहून आपली अंगांतली सारी शक्ति क्षणांत नष्ट झाल्याप्रमाणें तिनं त्याच्या टेबलावर डोकं टेकलं.

तिनं आपल्याकडे असा दीनवाणा कटाक्ष कां टाकावा किंवा तिची अकस्मात् अशी अवस्था होऊन तिचं वाक्य अपुरं कां रहावं तें राजाभाऊला मुळींच कळलं नाहीं. पण आत्यंतिक करुणेनं प्रेरित होऊन त्यानं एकदम तिच्या खांद्यावर हात टेकला आणि तिला हळूहळू थोपटल्यासारखं करीत तो म्हणाला,

" उमा, किती वेडी तूं! तुझं रक्षण करायचं एकदां ठरल्यावर लोकापवादाला भिऊन मी मागं सरकूं म्हणतेस? एका संकटग्रस्त स्त्रीची मुक्तता करून तिचं जन्मभर रक्षण करतांना माझ्या वडिलांनीं लोकमताची यत्किंचितहि पर्वा केली नाहीं. त्यांचं रक्त माझ्यांत आहे. माझ्या बाबतींत इतिहासाची पुनरावृत्ति होत असेल. तुझा माझा प्रेमसंबंध नाहीं इतकाच काय तो फरक."

उमानं आपलं खालीं टेकलेलं मस्तक एकदम वर केलं, हृदयाला कसली तरी जखम होत असल्यासारखी दृष्टि केली, खांद्यावर असलेला त्याचा हात एकदम घट्ट धरला आणि म्हटलं,

"असं बोलूं नका, असं बोलूं नका."

तिच्या त्या स्पर्शानं आणि शब्दानं राजाभाऊ अतिशय गोंधळून गेला !



# [१४]

उमाच्या संसारांत आणि राजाभाऊच्या खोलींत वैयक्तिक सुखदुःखांच्या या घटना ज्या वेळीं घडत होत्या, त्याचवेळीं हिंदुस्तान देशाच्या विस्तीर्ण परिसरांत कोट्यवधी जीवांच्या सुखदुःखांवर परिणाम करणाऱ्या मोठमोठ्या घटना घडत होत्या. आणि ऋणानुबंधाच्या नाजुक धाग्यांनीं पूर्वोक्त घटनांत राजाभाऊ जितका गुंतला होता, तितकाच सत्याग्रहाच्या प्रतिज्ञा-पत्रकावर सही करणारी एक व्यक्ति या नात्यानं तो उत्तरोक्त घटनांतही सांपडलेला होता.

गांधीजींची सत्याग्रहाची इशारत न जुमानतां सरकारनं "रौलेट" बिल पास केलं होतं. अर्थात् आपली प्रतिज्ञा पूर्ण करणं गांधींना क्रमप्राप्तच होतं. सबंध देश आपल्या हांकेला ओ देऊन आपल्या मागोमाग यायला तयार आहे अशी गांधींची खात्री पटली. त्यांनीं उपास करून आपल्या

चळवळीला प्रारंभ केला. मोठमोठ्या शहरांत आणि लहान लहान खेड्यांतहि ता. ६ एप्रिल रोजीं हरताळ पाळण्यांत यावा, प्रार्थना करण्यांत याव्यात व सभा भरविण्यांत याव्यात असा कार्यक्रम जाहीर झाला.

राजाभाऊचं चित्त पुण्यापेक्षां राधाबाईचं स्मृतिमंदिर ज्या खेडेगांवीं होतं त्याकडे जास्ती ओढ घेत होतं. तो तिकडे धांवला. त्यानं मोठी सभा भरविली आणि आपलं पहिलं जाहीर भाषण केलं. तें करतांना हजारों श्रोत्यांच्या अंतःकरणांचा स्पर्श आपल्या अंतःकरणाला होत आहे, जी मायभूमी आजपर्यंत फक्त शब्दरूपच आपल्याला होती तिच्या पुण्यशील पदतलावर आपण आपलं मस्तक टेकलं आहे असा अननूभूत रोमांचकारी अनुभव त्याला आला. 'हालअपेष्टा सोसायला, तुरुंगांत जायला इतकंच काय प्रसंगीं प्राणांची आहुति द्यायला तुम्ही तयार आहात ना ?' असा त्यानं आपल्या श्रोत्यांना प्रश्न केला, त्यावेळीं हजारों जिव्हांनीं एकमुखानं प्रचंड घोषणा केली, 'आहोंत.'

राजाभाऊ परत पुण्यास आला तेव्हां उमाला म्हणाला,

"आतां मी केव्हां तुरुंगात जाईन याचा नियम नाहीं. तूं मला आनंदानं निरोप द्यायला तयार असलं पाहिजेस."

उमानं हास्य केलं आणि झटकन् आपल्या कपाळावरच्या कुंकवाचं बोट त्याच्या कपाळावर टेकून म्हटलं,

"हा तिलक मी तुम्हांला मोठ्या आनंदानं लावतें."

गांधी हुकूम केव्हां सोडतात आणि कायदेभंगाची सार्वत्रिक चळवळ प्रत्यक्ष सुरू होऊन आपल्याला तुरुंगांत केव्हां जायला मिळतं याची राजाभाऊ रोज अधीरतेनं प्रतीक्षा करीत होता !

आणि असे लाखों राजाभाऊ त्यावेळीं युद्धप्रयोगासाठीं अधीर झाले होते.

तो सत्याग्रह संग्राम त्यावेळीं खरोखरच सुरू झाला असता तर हिंदुस्तानला स्वातंत्र्य मिळालंही असतं कदाचित्.

पण विधिघटना तशी नव्हती.

कारण, सत्याग्रहाच्या युद्धाला खरा प्रारंभ होण्यापूर्वीच दंग्यांचा आणि अत्याचारांचा कल्लोळ देशांत जिकडे तिकडे उसळला आणि सरकारच्या दडपशाहीला पूर्वी कधीं नव्हे असा ऊत आला.

सत्याग्रह जाहीर करण्यासाठीं जी मिरवणूक दिल्लीस निघाली त्या मिरवणुकीचा पुढाकार स्वामी श्रद्धानंदांनी घेतला होता. मिरवणुकीच्या अग्रभागीं ते चालले असतांना गोऱ्या सोजिरांनीं त्यांच्यावर गोळी झाडण्याची धमकी दिली. स्वामीजींनीं गोळीचं स्वागत करण्याकरितां आपली छाती उघडी केली आणि त्यांची धमकी पोकळ ठरविली. पण दिल्ली स्टेशनावर दंगा होऊन तिथे गोळीबार. झाला. त्यांत पांच इसम मरण पावले आणि वीस पंचवीस लोक जखमी झाले. अमृतसर शहरी डॉ. किश्लु व डॉ. सत्यपाल यांना डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनं आपल्या बंगल्यावर बोलावून घेतलं आणि एका अज्ञात स्थळीं ठेऊन दिलं. ही बातमी ताबडतोब शहरांत पसरली. लोकांची गर्दी झाली. गर्दीवर गोळीबार करण्यांत आला. एक-दोन माणसं ठार झालीं, बरेंच लोक जखमी झाले. गोळीबाराला बळी पडलेल्या माणसांच्या शवांची लोकांनीं मिरवणूक काढली. रस्त्यावर असलेल्या नॅशनल बँकेला त्यांनीं आग लावली. रेल्वेचा मालधक्का व इतर इमारतीही जाळण्यांत आल्या. अखेर अमृतसर शहर तिथल्या अधिकाऱ्यांनीं लष्कराच्या स्वाधीन केलं. गुजराणवाला, कासूर, लाहोर, कलकत्ता अशा अनेक शहरीं दंगे आणि अत्याचार झाले. स्वामी श्रद्धानंद यांच्या निमंत्रणावरून महात्मा गांधी दिल्लीकडे जायला निघाले. पण पंजाब व दिल्ली भागांत त्यांनीं जाऊं नये अशी नोटीस त्यांच्यावर वाटेंतच बजावण्यांत आली. त्यांनीं हा हुकुम मानण्याचं नाकारल्यावरून त्यांना अटक करण्यांत आली व स्पेशल गाडीनं त्यांना ता. १० एप्रिल रोजीं मुंबईस आणण्यांत आलं. गांधींच्या अटकेची बातमी ऐकतांच अहमदाबाद, विरमगांव, नडियाद, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं लोकांनीं दंगे व अत्याचार केले. अनेक ठिकाणीं लोकांवर गोळीबार करण्यांत आला. मुंबईस आल्यानंतर गांधींनीं लोकांना शांत करण्याचा प्रयत्न केला व ते अहमदाबादला गेले. हे दंगे झालेले पाहून सत्याग्रहाचा कार्यक्रम तहकूब केल्याबद्दलचं एक पत्रक त्यांनीं प्रसिद्ध केलं. पण त्या पत्रकाची शाई पुरती वाळलीहि नव्हती तों ता. १३ एप्रिल रोजीं जालियनवाला बागेंतल्या जाहीर सभेवर जनरल डायर यानं गोळीबार केला, त्यांत चारशें इसम जागच्या जागीं मृत्युमुखीं पडले व हजार ते दोन

हजार लोक जखमी झाले. या गोळीबारानंतर पंजाबांत लष्करी कायद्याच्या नांवाखालीं लोकांचा जो अनन्वित छळ झाला त्याचं वर्णन वाचतांना अगर ऐकतांना कुणाही माणसाच्या अंगावर शहारे येतील. १८५७ सालच्या बंडांतल्या प्रकारांची पुनरावृत्ति झाली. लोकांनीं केलेल्या अत्याचारांची ज्वाला तर मोठी होतीच, पण तिला ग्रासण्यासाठीं सरकारनं उठवलेली दडपशाहीची ज्वाला शतपटीनं प्रचंड होती !

सत्याग्रह आणि स्वराज्य बाजूलाच राहिलं; दडपशाही आणि स्मशानवत् शांतता मात्र सगळ्या देशांत पसरली.

जे खरोखरच सत्याचं परिपालन करून असत्याचाराचं युद्ध करण्यास उद्युक्त झाले होते असे हजारों तरुण ठिकठिकाणीं निराश आणि उदास होऊन स्वस्थ बसले.

राजाभाऊ तर कित्येक दिवस घराच्या बाहेर पडला नाहीं. सुतक्या सारख्या तो आपल्या खोलींत डोकं धरून स्वस्थ बसला होता. सबंध देशाचा ग्रास करणाऱ्या या अनपेक्षित अंधारांतून पुढें कसा मार्ग निघणार आहे त्याला कळेना.

मूर्छेसारख्या या अवस्थेंतून जेव्हां तो हळूं हळूं सावध झाला, तेव्हां उमावरच्या संकटाची त्याला पुन्हां आठवण झाली.

तें संकट अजून कायमच होतं. महेश्वर काय करील त्याचा नेम नव्हता. त्याच्या हालचालींची कांहींच बातमी आज कित्येक दिवसात त्याला कळली नव्हती.

पण एके दिवशीं सकाळीं वर्तमानपत्र वाचीत असतां एक बातमी पहातांच त्याची दृष्टि थबकली.

त्यानं ती सबंध बातमी नीट वाचून पाहिली, व एकदम उद्गार काढला,

"उमावरचं संकट कांहीं काळ तरी दूर झालं म्हणायचं !"

एका जुगाराच्या अड्ड्यावर पोलिसांनीं छापा घातला होता व दहा-बारा इसमांना पकडलं होतं. त्या इसमांच्या यादींत महेश्वरचं नांव होतं.

राजाभाऊ तें वर्तमानपत्र घेऊन घाईघाईनं उमाकडे गेला व म्हणाला,

" उमा, उमा, हें पाहिलंस कां ? "

त्याच्या शब्दांत हर्षाचा स्पष्ट ध्वनि उमाला ऐकूं आला म्हणून तिनं हंसत विचारलं,

" काय तें ? काय पहायचं ? "

" हें बघ. " असं म्हणून राजाभाऊनं तिच्या हातीं वर्तमानपत्र दिलं आणि जी बातमी त्यानं नुकतीच वाचली होती तिच्या मजकुरावर बोट ठेवलं.



[१५]

खेडेगांवांतल्या ज्या लोकांनीं राजाभाऊच्या सांगण्यावरून सत्याग्रहाच्या प्रतिज्ञापत्रकावर सह्या केल्या होत्या त्यांना सत्याग्रह एकाएकी तहकूब व्हावा हें कोडं नीटसं उलगडेना. त्याबद्दल ते लोक जेव्हां राजाभाऊला प्रश्न करीत तेव्हां गांधींची विचारसरणी त्यांना समजावून सांगण्याचा राजाभाऊ शक्य तितका प्रयत्न करी. पण त्यानं ती गोष्ट कितीही खुलासेवार सांगितली तरी ती पटल्यासारखी त्या अडाणी साध्या भोळ्या लोकांची चर्या त्याला दिसत नसे. मग अखेर तो त्यांना इतकंच म्हणे,

" हें पहा, तुम्ही आम्ही सगळेजण या स्वातंत्र्याच्या युद्धांतले शिपाई आहोंत. विचार करणं हें आपलं काम नाहीं. आज्ञेप्रमाणं वागणं हें आपलं काम. 'पुढें चला' असा हुकुम झाला कीं बेडरपणानं पुढें चलायचं, अन् 'थांबा' अशी आज्ञा झाली कीं थांबायचं येवढंच आपलं कर्तव्य आहे. महात्मा

गांधी हे आपले सेनापति आहेत. विचार करायची जबाबदारी त्यांची, आपली नाहीं."

हे म्हणणं मात्र त्या लोकांना समजे, व त्यांचं समाधान झाल्याप्रमाणें त्यांच्या चर्या दिसूं लागत.

पण याचा अर्थ असा नव्हे, कीं राजाभाऊच्या स्वतःच्या मनाचं समाधान झालं होतं.

उलट त्याच्या मनांत ज्या अनेक शंका कुशंका उत्पन्न होत त्यांचं निराकरण करणं त्याला जडच जात असे.

त्याच्या मनांत पुनः पुन्हां येई, कीं चार ठिकाणीं दंगेधोपे झाले म्हणून लगेच सत्याग्रहाची संकल्पित चळवळ गांधीनीं तहकूब केली हें त्यांनीं योग्य केलं कीं अयोग्य ? लोकांनीं दंगेधोपे आणि जाळपोळ करतांच त्याबद्दलच्या दोषाचं खापर सरकारनं गांधींच्या माथीं फोडावं यांत कांहीं आश्चर्य नव्हतं. सरकार अशा निमित्ताला टेकलेलं असणार हें उघड होतं. पण सरकारनं केलेला दोषारोप गांधीनीं मान्य करावा, आणि लोकांची अत्याचाराकडे प्रवृत्ति आहे तेव्हां माझं अनत्याचाराचं युद्ध मी मागं घेतो असं त्यांनीं म्हणावं याचा अर्थ काय ? एक तर, लोकांनी जे दंगेधोपे केले तें कांहीं सुखासुखी आणि कारणावांचून केले असं नव्हतं. सरकारी अधिकाऱ्यांनीं लोकांना डिवचलं, लोक चिडले असाच प्रकार सगळीकडे झाला होता. शिवाय ज्या लोकांनीं सत्याग्रहाची शपथ घेतली होती त्यांनीं दंगे केले असते तर गोष्ट निराळी होती. पण तसा प्रकार कुठेंहि घडला नव्हता. मग गांधीनीं आपली चळवळ एकदम परत कां घ्यावी ? असं केल्यानं लोकांच्या उत्साहाचा अन् सामर्थ्याचा एक प्रकारें विघातच घडला नाहीं का ?

कदाचित् गांधींना असं वाटलं असेल, कीं लोकांनी केलेल्या अत्याचारामुळें मन मानेल तशी दडपशाही करायला सरकारला ही आधीच सबब मिळाली आहे, अशांतच सत्याग्रह सुरू झाला तर तो करणाऱ्या लोकांवर अनन्वित अत्याचार करायला सरकार मागें पुढें पहाणार नाहीं. सरकारी जुलमाचा तडाखा चुकविण्याच्या दृष्टीनं, अन् आपल्या अनुयायांच्या वाट्यास येणारे

हाल टाळण्याच्या दृष्टीनं हा विचार योग्यच होता. व्यवहारचतुर धोरणी पुढाऱ्यास तो शोभण्यासारखाच होता. पण गांधींनीं हाच विचार केला असावा असं मानणं सोपं नव्हतं. कारण, गांधी स्वतःस व्यवहारचतुर अगर धोरणी म्हणवून घ्यावयास कुठें तयार होते ? ते साऱ्या गोष्टी धर्माच्या अन् अंतिम सत्याच्या भाषेत बोलत होते, अहिंसेचा अगर सत्याला कोणी साधन म्हटलं तर त्यांना खपत नव्हतं. तीं दोन्हीं तत्त्वं साध्यस्वरूप आहेत असा त्यांचा आग्रह होता.......

मग गांधींच्या या युद्धतहकुबीची संगति लावायची कशी ?......

राजाभाऊला हें कळत नसे, व अखेर इतरांना तो जें सांगे तेंच तो स्वतःला सांगे. ' विचाराचा शीण आपण कशाला करा ? गांधी करतील तो. आज त्यांनीं युद्ध तहकूब केलं आहे, पण तें कांहीं कायमचं तहकूब झालेलं नाहीं. केव्हां तरी तें सुरू होईलच. '

मात्र तें पुन्हां केव्हां सुरू होईल तें देशांतल्या त्या वेळच्या परिस्थितीवरून सांगणं अतिशय कठीण होतं. भोंवतालीं दृष्टि टाकली कीं माणसाच्या मनाला खिन्नताच यावी अशीच परिस्थिति चहूंकडे दिसत होती. इतर हजारों लोकां-प्रमाणें राजाभाऊही अंतःकरणाच्या उसळीसरशी युद्धभूमीवर पाऊल टाकायला सज्ज झालेला होता. तें पाऊल परत घ्यावं लागतांच त्याचं मन निराशेनं आणि विषण्णतेनं भरून गेलं. त्याला राजकारणाचा मोठासा खोल समज होता असं नव्हे, किंवा त्यानं त्यांत आयुष्याचीं बरींच वर्षं खर्च केलीं होतीं असंहि नव्हे. पण पूर्वी एकदां देशसेवा करतां यावी म्हणून सैन्यांत भरती होण्याचा त्यानं जेव्हां प्रयत्न केला होता तेव्हां त्याला परतावं लागलं होतं आणि आतांहि तो युद्धांत शिरूं पहात होता तों युद्धच बंद झालं होतं !

या अनुभवांचा त्याला मोठा चमत्कार वाटला आणि रागहि आला.

राजकारणांत प्राप्त झालेल्या स्वस्थतेचा आणि औदासिन्याचा हा ऋतु केव्हां संपणार आहे, याची त्याला कल्पना करतां येईना.

पण जणूं राजाभाऊसारखे जे हजारों जीव त्या वेळीं खिन्न आणि असंतुष्ट झाले होते त्यांना ' हाही ऋतु लवकरच संपेल, आशा सोडूं नका. ' असं धीराचं आश्वासन द्यायसाठीं निसर्गाचे प्रयत्न चालू होते. त्याचं ऋतुचक्र फिरत होतं.

वसंतऋतु आला तसा गेला. ग्रीष्मऋतूंत रात्री लहान होऊन दिवस मोठे झाले, वाऱ्याची दिशा बदलली, जलाशयांतलं पाणी आटून गेलं, आणि प्रखर सूर्यतापानं जमीनीला भेगा पडल्या. पुढें आभाळांत हलके हलके ढग जमूं लागले, वादळी वाऱ्यांना सुरवात झाली, आणि विद्युल्लतेचा कडकडाट होऊन वर्षाकालास प्रारंभ झाला. रानोमाळ गवत माजलं, शेतं उंच उंच वाढलीं, लहानमोठीं झाडं पल्लवभारानं आच्छादित झालीं, मृदु आणि उग्र वासांनीं दाही दिशा दरवळून गेल्या, तांबड्या गलिच्छ पाण्यानं नदी नाले खळखळले, आणि पंखांत चोंची खुपसून कुडकुडणारे पक्षी 'बाबा रे, थांबव आतां ही वृष्टि!' अशी वरुणराजाची प्रार्थना करायसाठीं चिवचिवाट करूं लागले. त्यानंतर सृष्टीचा शरदीय उत्सव सुरू झाला. आकाशाच्या निळ्या रंगाला विलक्षण शोभा चढली, चांदण्या रात्री विलक्षण मनोहर वाटूं लागल्या, पक्ष्यांचा स्वैर विहार पुन्हां सुरू होऊन त्यांचे स्वच्छंदी हर्षस्वर ऐकूं येऊं लागले, आणि तिळाच्या व झेंडूच्या फुलांचे गडद पिवळे आणि तांबूस रंग इतस्ततः पसरलेले दिसूं लागले. मग हलके हलके सूर्याची दिशा बदलली; वाऱ्यांत गारवा येऊं लागला, रानांत कुसळी गवत जिकडे तिकडे माजलं. हवेंतला गारठा हळूं हळूं वाढला. वृक्षशाखांवरची पर्णराजी गळूं लागली. शिशिर ऋतु सुरूं झाला आणि यथाकाल संपला. ऋतुचक्राचा एक फेरा संपूर्ण होऊन पुन्हां वसंतागमाचीं चिन्हं सृष्टींत दिसायला लागलीं! सृष्टीची गति अव्याहत चालू होती!

पण राजाभाऊ आणि उमा हे जीवितमार्गावरचे दोन प्रवासी होते त्याच अवस्थेंत होते.

योगायोगानं तीं दोघं एकत्र आलीं होतीं व त्यांच्यांत एक प्रकारचा ऋणानुबंध उत्पन्न झाला होता. तोच ऋणानुबंध अजून चालू होता, व त्याच्या विचित्र स्वरूपाविषयीं दोघंही आपापल्या ठिकाणीं आपापल्यापरी विचार करीत होतीं!

राजाभाऊवर असलेल्या स्वतःच्या प्रेमाचं उमाला आश्चर्य वाटत नव्हतं. निदान आतां तरी वाटत नव्हतं. ज्या पहिल्या दिवशीं स्वतःच्या मनाची चलबिचल तिच्या प्रथम लक्षांत आली होती त्या दिवशीं प्रथम कदाचित् ती

विस्मयानं गांगरली असेल, पण आतां तिची ती मनःस्थिति शिल्लक राहिली नव्हती. स्वतःच्या प्रणयभावनेचा तिला रागही येत नव्हता. तिनं काय म्हणून स्वतःवर रागवायचं? निद्राकालाच्या एकांतांत ती स्वतःला अनेक वेळां विचारी, राजाभाऊवर प्रेम करण्यांत मजकडून पाप घडतं आहे कां? ती तरुण होती. दुःखप्रद विवाहाच्या ज्वाळांनीं भाजलेली होती. वैवाहिक जीवनांत प्रेमाचा यत्किंचित्‌ही अनुभव तिला मिळाला नव्हता. समानशील तरुणाचं प्रेम जिंकावं, निदान अशा तरुणाला आपलं चित्तसर्वस्व अर्पण करावं अशीच तारुण्यसुलभ उत्सुकता तिच्या मनांत स्त्रीस्वभावानुसार होती. राजाभाऊच्या गुणांवर लुब्ध होऊन तिचं त्याच्यावर प्रेम बसलं तर त्यांत पाप होतं काय? शिवाय मनांतलं प्रेम अव्यक्त ठेवण्याचा तिचा निश्चय होता. लग्नसंस्थेनं तिच्या जीवितसुखाचा सर्वनाश केला होता तरी त्या संस्थेविरुद्ध बंड पुकारण्याची तिची इच्छा नव्हती. ती राजाभाऊला कधीं असं म्हणणार नव्हती, कीं 'माझे पति जरी जिवंत आहेत तरी तुम्ही माझ्याशीं लग्न करा.' इतकंच नव्हे तर 'माझं तुमच्यावर प्रेम आहे तेव्हां तुमचं माझ्यावर असूं द्या' असा साधा प्रेमोच्चार करण्याचीसुद्धां तिनं आपल्या जिव्हेला बंदी केली होती. तरी तिच्या हातून पाप घडत होतं?...

या प्रश्नाचा निकाल लावणं उमाला कठीण जात असे. आणि मग जें सहजसुलभ तेवढंच ती करी. मनांतल्या मनांत गुप्तपणानं राजाभाऊविषयीं प्रीतिभाव बाळगून ती त्याची शक्य ती सेवा करीत राही.

पुष्कळदां ती स्वतःला असंसुद्धां विचारी, "मला राजाभाऊ हवे आहेत म्हणजे नक्की काय हवं आहे बरं? ते माझ्या डोळ्यांना दिसायला पाहिजेत. त्यांचा शब्द माझ्या कानांना ऐकूं यायला पाहिजे. तें शिकवतील ते मला शिकायला पाहिजे. ते चर्चा करतील ती मला समजायला पाहिजे. त्यांना आपला सल्ला नेहमीं हवा आहे असं वाटायला पाहिजे. त्यांच्या सुखदुःखांत सदा थोडा तरी भाग घेतां यायला पाहिजे. एवढंच ना? कां आणखी कांहीं? स्वतःची फसवणूक न करतां मला अगदीं स्पष्ट विचार करूं दे. येवढंच, कीं आणखी कांहीं? माझ्या आणि त्यांच्या बुद्धीचा एकजीव व्हावा, माझ्या अंतःकरणाला त्यांच्या अंतःकरणाचा स्पर्श व्हावा,

येवढीच माझ्या जिवाची ओढ ना ? मग ती तर पुरी होत आहे. मग मी अशी असंतुष्ट कां ? मला आणखी काय पाहिजे आहे ? शरीरवासनांच्या आधीन मी होतें आहे ?......"

आत्मसंशोधनाच्या प्रयत्नांत मनापुढें येणाऱ्या या प्रश्नाला 'नाहीं' असं तर उत्तर उमाला चटकन् देतां येत नसे; आणि तें द्यायला आपल्या मनाला विलंब लागावा यांतच निराळ्याच तऱ्हेची कबुली आहे असं वाटून तिला स्वतःच्या शरिराचा एक प्रकारचा तिरस्कार वाटूं लागे. स्वच्छ आणि शुद्ध राहूं पहाणाऱ्या मनाला मलिन करणारा देह म्हणजे माणसाच्या उन्नतींतच नव्हे, तर साध्या सुखांत आणि शांतींतसुद्धां केवढा अडथळा आहे असा विषण्ण विचार मग तिच्या मनांत सारखा येत राही.

एकदां नवज्वरांतून उठलेल्या आनंदाच्या प्रकृतीला हवापालट केल्यानं बरं वाटेल म्हणून राजाभाऊच्या आग्रहावरून ती खेड्यावर गेली असतां एके दिवशीं संध्याकाळीं राजाभाऊ व ती नदीवर गेलीं. तिथें घाटावर पाय सरकून ती पडली व तिचे दोन्ही गुडघे खूप खरचटले. तिला चालवेना. तेव्हां राजाभाऊ म्हणाला,

"थांब, मी तुला थोडंसं असं अलगद उचलल्यासारखं करतों म्हणजे तुला चालवेल."

पण तो जवळ येऊन आपल्या खांद्याखालीं खरोखरच हात घालणार असं वाटतांच ती एकदम ओरडली,

"नको नको. मला धरूं नका."

"नको काय ? मी तुला आधार दिला तर बिघडलं काय त्यांत ?"

"तें तुम्हांला कळायचं नाहीं. तें नदीचं पाणी पाहिलंत कां ?"

"म्हणजे काय ?"

"किती स्वच्छ आणि निर्मळ दिसत आहे ना ?"

"हो."

"पण खालीं त्याच्या तळाशीं घाणेरडा गाळ किती असेल ?"

"असेल. हें तूं काय बोलते आहेस मला कळत नाहीं."

" जाऊं द्या तें. चला जाऊं आपण. हें पाहिलंत मला आतां चालतां येऊं लागलं ! "

मग राजाभाऊ तिच्याबरोबर चालूं लागला पण त्याचं मन तिच्या त्या विचित्र बोलण्यावरच रेंगाळत मागं राहिलं होतं. स्वच्छ पाण्याची आणि तळाच्या कर्दमाची तिनं कशाला उपमा दिली त्याला कळेना.

तो उमाबद्दल पुष्कळदां विचार करी. तिचा आपला ऋणानुबंध कसा योगायोगानं जडला आणि वाढत गेला त्या इतिहासांतील लहान लहान हकीगती एकांत विचाराच्या वेळीं त्याच्या मनश्चक्षूंपुढें पुष्कळदां येत. त्या आल्या कीं त्याला वाटे, असंच माझ्या हातून या बिचाऱ्या अनाथ दुःखी जीवाला पुढेंही नेहमीं साहाय्य मिळो.

तो ज्या तऱ्हेनं उमाशीं वागत होता अगर ज्या तऱ्हेनं ती त्याच्याशीं वागत होती त्यांत कांहीं वावगं असेल अशी शंका त्याला कधींच आली नाहीं.

पण एके दिवशीं त्याचा कारकून त्याला म्हणाला,

" तुमच्याशीं एक महत्वाची गोष्ट बोलायची आहे. "

" होय कां ? बोला कीं. "

" माझ्या बोलण्याचा तुम्हीं राग मानतां कामा नये. "

राजाभाऊनं हंसून मान हलविली.

" मी तुमच्या वडिलांच्या वेळेपासून तुमच्या घराची नोकरी केली आहे. तेव्हां तुम्हांला चार गोष्टी सांगायचा मला अधिकार आहे. "

राजाभाऊ त्याच्याकडे पहात राहिला.

" बरेच दिवस विचार केला, आपण बोलावं कां नाहीं. कदाचित् तुम्ही रागवाल अशी भीति वाटे. पण उलट वाटे, आपलं कर्तव्य आपण करावं, मग यांना राग आला तरी हरकत नाहीं. म्हणून शेवटीं आज ठरवलं, कीं काय वाटेल तें होवो जें मनांत आहे तें बोलून टाकायचं. "

राजाभाऊ म्हणाला,

" अहो, पण इतकी लांबलचक प्रस्तावना कशासाठीं ? बोला कीं काय बोलायचं आहे तें. "

" बोलूं ? "

" हं. "

" उमाच्या बाबतींत तुम्ही काय ठरवलं आहे ? "

" काय ठरवलं आहे म्हणजे ? "

" म्हणजे असं, कीं लोकांत आतां या गोष्टींची फार वाच्यता व्हायला लागली आहे. "

" कुठल्या गोष्टीची ? "

" तुमच्या अन् उमाच्या वर्तणुकीची. "

राजाभाऊनं कपाळाला आठी घातली अन् विचारलं,

" काय म्हणतात लोक ? "

" लोक म्हणतात, उमा किती झालं तरी नवऱ्यानं टाकलेली बायको "

" पण तिचा नवरा कोणत्या तऱ्हेचा मनुष्य आहे अन् ती त्याच्यापासून वेगळी कां झाली आहे याचा विचार लोकांनीं केला आहे कां ? "

" तिचा नवरा असेल वाईट, पण लोकांचं म्हणणं, उमाकडेसुद्धां कांहीं तरी दोष असणारच. एका हातानं कांहीं टाळी वाजत नाहीं ! "

" अस्सं, दोषाची वाटणी करायच्या वेळेस लोक अगदीं फार समतोल बुद्धीचे असतात म्हणायचे ! लोकांचं म्हणणं काय, कीं उमानं आपल्या पतीचा आसरा सोडला तेव्हां जगांत तिला कुठेंच आसरा मिळूं नये ? "

" जगाचं हवं आहे कशाला ? तुमच्यापुरतं बोलतों आहे मी. तुम्हांला फार नांवं ठेवतात लोक. "

" ठेवूं देत हो. उमाला या जगांत तिचं असं मायेचं माणूस नाही. लोकांच्या टीकेला भिऊन मी जर तिला उद्यां सांगितलं, कीं माझ्या वाड्यांतली जागा सोडून जा अन् इतःपर माझ्या मदतीची अपेक्षा करूं नकोस तर तिनं बिचारीनं काय करायचं, अन् कुणाजवळ मदत मागायची ? तिचं संरक्षण करायची जबाबदारी माझी आहे असं मी मनानं एकदां मानलं आहे

तें मी नाहीं म्हणणार नाहीं. माझं मन शुद्ध आहे आणखी उमाही शुद्ध मनानं माझ्याशीं वागते याबद्दल अजून कधीं मला शंका आलेली नाहीं. लोकांची टीका काय नेहमीं चालायचीच! उमा लग्न झालेली स्त्री म्हणून तिचं माझं वागणं लोकांना गैर वाटतं आहे; पण ती कुमारी असती तरी लोक म्हणाले असते, अहो चांगली वयांत आलेली लग्नाची मुलगी, तिचं हें वागणं गैर नाहीं तर काय म्हणायचं? जें नसतं तें असतं तर आपण टीका केली नसती असा आव आणायची लोकांची नेहमींचीच तऱ्हा आहे. असा आव आणल्यानं वास्तविक आपण क्षमाशील आहोंत असा भास लोकांना उत्पन्न करतां येतो; अन् त्याचा फायदा घेऊन जें असतं त्यावर टीकेची झोड उठवितां येते. तुम्ही कशाला ऐकतां लोकांच्या या टीका?"

"मुद्दाम कां मी ऐकायला जातों? पण जिथें जावं तिथें कानावर येतात आणखी मग वाईट वाटतं."

"तुम्ही वाईट वाटून घेऊं नका. याला कांहीं उपाय नाहीं."

"अं...असं म्हणूं नका. एक उपाय आहे."

राजाभाऊनं त्यांच्याकडे आश्चर्यानं पाहिलं अन् विचारलं,

"कोणता उपाय आहे?"

"तुम्ही लग्न करून टाका."

ते शब्द अगदीं अनपेक्षित होते. पण मनांतलं आश्चर्य मुद्रेवर न दाखवितां राजाभाऊनं विचारलं,

"मी लग्न केलं म्हणजे काय होईल?"

"व्हायचं आहे काय? तुमचा स्वतःचा म्हणून एक संसार तुमच्यामागं लागेल. तुम्ही एका स्त्रीचे जबाबदार पति व्हाल. अन् मग तुम्ही उमाला कितीहि मदत केली तरी त्यांत जनदृष्टीला तितकंसं वावगं कांहीं दिसणार नाहीं."

"असं असं, म्हणजे माणसानं पाप करावं पण तें झाकायला प्रतिष्ठित संसाराचं पांघरुण जवळ ठेवावं असं लोकांचं म्हणणं दिसतं आहे! फार नामी आहेत या नीतीच्या कल्पना—"

असं म्हणून राजाभाऊ मोठमोठ्यानं हसूं लागला.

मात्र आपल्या कारकुनानं हिरमुसलेलं तोंड केलं असं पाहून तो नंतर म्हणाला,

" बरं बुवा. करूं लग्न. आपलं काय जातं आहे ? तुमच्या आढळांत आली एकादी फक्कड मुलगी तर सांगा मला."

तें ऐकून कारकून निघून गेला.

राजाभाऊला वाटलं, आपण केवळ चेष्टा केली हें त्याला समजलं असेल. पण दोन दिवसांनीं तो राजाभाऊच्या खोलींत आला तो हातांत दोन फोटो घेऊन आला, व ते टेबलावर ठेवीत म्हणाला,

" हे फोटो बघा बरं जरा."

" कुणाचे हो हे ?"

" तें मग सांगतों. तुम्हीं बघा अन् पसंत आहेत कां सांगा आधीं."

" हं बरे आहेत."

" म्हणजे दोन्ही पसंत आहेत कां तुम्हाला ? असले तर बरंच झालं. पुढचं बोलायला हरकत नाहीं."

" म्हणजे ? तुमच्या बोलण्याचा रोख कळला नाहीं मला."

" रोख कळला नाहीं ? चांगली मुलगी आढळली तर लग्न करूं असं तुम्हींच म्हणालांत ना परवां ? तुम्ही तसं म्हणलांत म्हणून मी लगेच खटपटीला आरंभ केला."

" म्हणजे या दोघी लग्नाच्या मुली आहेत कां काय ?"

" नाहीं तर काय तुम्हांला दोन चित्रं दाखवायला आणली असं समजला कीं काय तुम्ही ?"

" शाबास !" असं म्हणून राजाभाऊ मोठमोठ्यानं हंसूं लागला.

तितक्यांत उमा खोलींत आली.

तिनं विचारलं,

" हें काय ? येवढं हसणं कशासाठीं चाललं आहे ?"

" मी लग्न करावं असा आमच्या या पंतांचा आग्रह आहे अन् त्यांनीं या दोन मुली आणल्या आहेत माझ्यासाठीं. या बघ." असं म्हणून राजा-भाऊनं हंसत हंसत ते दोन फोटो उमाच्या हातीं दिले, आणि कारकुनाकडे वळून म्हटलं,

" खरंच पंत, तुम्ही हिलाच दाखवीत चला फोटो आणलेत कीं."

या प्रकारानं मात्र कारकून जें समजायचं तें समजला. त्यानं राजाभाऊ-जवळ पुन्हां लग्नाची गोष्ट काढली नाहीं.



## [१६]

पावसाळा सुरू झाला. बरसातीच्या प्रारंभीच्या जोराच्या सरी पडून गेल्या, आणि अष्टौप्रहर टिकणारी कंटाळवाणी झिमझिम सुरु झाली. एखादे वेळीं दिवसाच्या कित्येक घटकान् घटका सूर्यदर्शन घडत नसे, साऱ्या दिशा धुंद झाल्यासारख्या वाटत, आणि या टोकापासून त्या टोकापर्यंतचं आभाळ म्हणजे एक अजस्त्र धुरकट मातीचं भांडं असून तें हलके हलके झिरपतं आहे असा भास होई.

ज्या दिवशीं कॉलेज असे त्या दिवशीं चिखलांतून आणि पावसांतून जाण्यायेण्याचा राजाभाऊला कंटाळा येई, आणि सुटी असली कीं त्या दिवशीं खोलींत एका जागीं तासन् तास वाचीत बसण्याचाही त्याला कंटाळा येई.

अशा कंटाळलेल्या आंबलेल्या मनःस्थितीत उठून खिडकीजवळ जाऊन

त्यानं बाहेर दृष्टि टाकली, कीं देशाच्या राजकारणाविषयींचे विचार त्याच्या मनांत येत, व तो स्वतःला प्रश्न करी,

"थंडावलेल्या राजकारणाला उकळी यायची आहे तरी केव्हां कुणास ठाऊक!"

ही उदासीनतेची शंका त्या वेळीं हजारों लोकांच्या अंतःकरणांत येत होती.

याचं कारण इतकंच, कीं लवकरच होणाऱ्या प्रचंड वादळाची तयारी करून देणारे राजकारणाचे जे वारे निरनिराळ्या दिशांनीं वहात होते ते सामान्य लोकांना दिसण्यासारखे नव्हते.

पण ते दिसत नव्हते याचा अर्थ ते वहात नव्हते असा थोडाच होता?

पंजाबांतील सरकारी अत्याचार लोकांच्या स्मरणांतून अजून गेले तर नव्हतेच, पण उलट लोकांच्या मनांतली त्याबद्दलची स्मृति ताजी रहावी अशाच गोष्टी घडत होत्या. पंजाबांत घडलेल्या प्रकारांची चौकशी करणाऱ्या सरकारी कमिटीच्या कामावर लोकांचा विश्वास नव्हता; आणि कॉंग्रेसनं स्वतंत्रपणें नेमलेल्या चौकशी कमिटीपुढें सरकारी जुलमाचे जे प्रकार साक्षीदारांनीं एका-मागोमाग एक सांगितले त्यामुळें लोकांच्या मनांत सरकारविषयीं अधिकच अप्रीति उत्पन्न होत होती. या अप्रीतीचा परिणाम होऊन त्या सुमारास अस्तित्वांत येणाऱ्या नवीन सुधारणांच्या कायद्याबाबतही देशांत स्पष्ट पक्षभेद निर्माण झाले. त्या सुधारणांचा फायदा घेऊन कायदेमंडळांत शिरावं असं एका पक्षाचं म्हणणं होतं, तर एका हातानं सुधारणा देऊन दुसऱ्या हातानं प्रजेवर जुलमाचा वरवंटा फिरवणाऱ्या सरकारशीं सर्वस्वी असहकार्य करावं असं दुसऱ्या पक्षाचं म्हणणं होतं. याच सुमारास खिलाफतीच्या प्रश्नावर हिंदुस्थानांतल्या मुसलमान लोकांमध्यें तीव्र असंतोष पसरला होता. आणि 'आज जें संकट मुसलमानांचं तेंच उद्यां सबंध हिंदुस्तानाचं' अशी भावना देशांत जिकडे तिकडे पसरत होती. १९१९ च्या अमृतसर येथील कॉंग्रेसमध्यें सरकारशीं सहकार्य करण्याचा आग्रह धरणारे महात्मा गांधी आतां पार बदलले होते, व असहकारितेचा पुरस्कार स्पष्टपणें करूं लागले होते. लोकमान्य टिळकांच्या

'कॉंग्रेस डेमोक्रॅटिक' पक्षानं नवीन कायद्यान्वयें होणाऱ्या निवडणुकी लढवून कायदेमंडळं काबीज करण्याचा जोराचा संघटित प्रयत्न चालविला होता; पण उलट असहकारितेची चळवळ जोराला लागून नवीन निवडणुकीवर बहिष्कार घालण्याचं धोरण कॉंग्रेस केव्हां निश्चित करील तें सांगतां येण्यासारखं नव्हतं. मद्रास शहरीं भरलेल्या खिलाफत परिषदेंत तर असहकारितेची चढाईची योजना आखण्यांतदेखील आली होती.

अशा प्रकारें प्रत्यक्ष वादळ जरी सुरू झालं नव्हतं, तरी वारे घोंघावत होते, धुळीचें लोट उठत होते, मधून मधून गडगडाट होत होता, समुद्राच्या लाटा उचंबळत होत्या !

आपल्या असहकारितेच्या चळवळीसाठीं महात्मा गांधी सबंध देशाला जागृत करूं पहात होते. लोकमान्य टिळक त्या चळवळीच्या इष्टानिष्टतेविषयीं साशंक असल्याचा लोकांत बोभाटा होता. हे दोन मोठे पुढारी एकमेकाच्या हातांत हात घालून देशाच्या राजकारणाचा शकट हांकतात, कीं देशांत दोघांचें दोन स्वतंत्र पक्ष निर्माण होतात याची चर्चा देशांत जिकडे तिकडे चालली होती.

पण या चर्चेला जुलई महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत एकाएकी पायबंद बसला.

लोकमान्य टिळक मुंबई इथें सरदारगृहांत मोठ्या तापानं आजारी पडले ! सबंध देशाचं लक्ष बाकीच्या सर्व गोष्टींवरून उडून त्या महापुरुषाच्या रुग्णशय्ये-भोंवतीं घुटमळूं लागलं.

पुणें शहरांत तर जिकडे तिकडे दुःखाची अवकळा पसरली. प्रत्येकाला थोडाच लोकमान्य टिळकांना प्रत्यक्ष भेटून त्याचा समाचार घेतां येण्यासारखा होता ? पण निदान ज्या शहरांत आपल्या पुण्यनगरीची शोभा अत्यवस्थ होऊन शय्येवर पडली आहे, त्या शहरीं नुसतं जाऊन तरी आलं पाहिजे असं प्रत्येकाला वाटत होतं. जो उठला तो पुण्याहून मुंबईस जाऊं लागला.

राजाभाऊही मुंबईस गेला.

ज्या सरदारगृहाच्या इमारतींत टिळकांचा देह मृत्यूशीं झगडत होता

त्या इमारतीला एखाद्या यात्रास्थानाचं स्वरूप प्राप्त झालं होतं. शेंकडों लोकांचे थवेच्या थवे त्या इमारतीच्या दारापाशीं अष्टौप्रहर घोटाळत असत. दैनिक वृत्तपत्रांच्या सध्या व जादा अंकांत टिळकांच्या प्रकृतीची ताजी बातमी छापून येई, पण केवळ ती वाचून कुणाचं समाधान होत नसे. डॉक्टरांचा जागता पहारा टिळकांच्या भोंवतीं असल्यामुळं त्यांच्या भेटीला जायची जवळ जवळ बंदीच होती. पण टिळकांची भेट अगर दर्शन जरी अशक्य असलं तरी ज्या मजल्यावर टिळकांचा बिछाना होता तिथल्या लोकांची नुसती हालचाल पाहून समाधान मानण्यासाठीं लोक तासन् तास इमारतीभोंवतीं ताटकळत उभे रहात !

टिळकांची निकटवर्ती मंडळी पंजाबरावांचा मुलगा म्हणून राजाभाऊला ओळखीत असल्यामुळं वर टिळकांच्या खोलीपर्यंत त्याचा प्रवेश झाला. तेथून हलण्याची त्याची इच्छा नव्हती. स्वयंसेवक बनून त्यानं आपल्याकडे काम घेतलं. तें काम करतांना आजूबाजूस जें दृश्य त्याला दिसे तें पाहून त्याचं भावनाप्रधान अंतःकरण वारंवार भरून येई. मुंबईच्या बहुतेक सर्व नामांकित डॉक्टर मंडळींनीं आपली नित्याचीं कामं जवळ जवळ टाकून दिलीं होतीं. व अहोरात्र परिश्रम चालविले होते. मोठमोठे पुढारी समाचारास येत ते बाहेरच्या खोलींत खिन्न वदनानं बसत, व दीनवाणी मुद्रा करून 'हा पुढाऱ्यांचा पुढारी मृत्युमुखीं पडला तर कसं व्हायचं?' असं न बोलतां एकमेकाला विचारीत. स्वयंसेवक मंडळींनीं वरच्या मजल्यापासून रस्त्यापर्यंत अखंड माळ धरली होती, व कुणी तरी आपल्याला कांहीं तरी काम सांगावं व आपल्याकडून तें व्हावं अशा उत्साहानं इतर शेंकडों स्वयंसेवक चोवीस तास तयार होते. कसंही करून लोकमान्य टिळकांना वाचवलं पाहिजे अशी तीव्र चिंता थोरापासून तों लहानापर्यंत प्रत्येकाच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती. 'तुझे प्राण दिलेस तर लोकमान्य वाचतील. देतोस तुझे प्राण?' असा प्रश्न यमदूतांनीं केला असता तर त्या गर्दीतल्या कुणाही व्यक्तीनं 'होय' असाच चटकन् जबाब दिला असता. टिळकांचे प्राण वाचविणं येवढाच त्या दिवसांत राष्ट्रसेवेचा अर्थ होऊन बसला होता. 'टिळकांना आतां जरा आराम वाटतो आहे' असं हलक्या आवाजांत शेजारच्या इसमाला सांगणारा इसमसुद्धां तें सांगण्यांत आपण एक प्रकारची राष्ट्रसेवा करतो आहोंत अशा आविर्भावानं ते शब्द उच्चारी.

तें सारं पाहून राजाभाऊचं अंतःकरण वारंवार सद्गदित होई; व टिळकांच्या प्रकृतीच्या चिंतेबरोबरच ज्या मायदेशाच्या सेवेंत टिळकांनीं आपलं आयुष्य वेंचलं त्या मायदेशासाठीं आपणही कष्ट सोसले पाहिजेत अशी भावना त्याच्या मनांत उचंबळून येई. तीच भावना त्याला भोंवतालच्या प्रत्येक चेहऱ्यावर दिसे. मग त्याच्या मनांत येई, थोर विभूति आपल्या कृतीनं अन् भाषणानं तर इतरांच्या अंतःकरणांत पराक्रमाची ज्वाला प्रदीप्त करतातच, पण ते अखेरच्या शय्येवर निजले असतांना त्यांची निद्राही तेंच काम करीत असते!

टिळकांना मृत्युमुखांतून सोडविण्यासाठीं मानवी उद्योगाची पराकाष्ठा झाली. पण अखेर ती निष्फळ ठरून ता. १ ऑगस्ट रोजीं त्यांचं प्राणोत्क्रमण झालं.

मुंबईस टिळकांच्या शवाची प्रचंड यात्रा निघाली. आणि मंगळवार ता. ३ ऑगस्ट रोजीं त्यांच्या अस्थि पुण्यास आणण्यांत आल्या तेव्हां स्टेशनपासून गायकवाडवाड्यापर्यंत जी मिरवणूक निघाली ती तर अपूर्व होती. दोन मैल लांबीच्या मार्गावरील प्रत्येक लहान मोठं घर माणसांनीं फुलून गेलं होतं. सज्जांवर, छपरांवर, झाडांवर जागा सांपडेल तिथें माणसं उभीं होतीं. एका मोठ्या चार चाकी रथावर पालखी ठेवलेली होती व त्या पालखींत टिळकांच्या अस्थींची लहानशी चंदनी पेटी होती. स्वयंसेवक मंडळी रथ ओढीत होती. रथापुढें भजनी दिंड्या एकामागोमाग चालल्या होत्या व त्यांच्या टाळमृदंगाच्या नादानं दिशा भरून गेल्या होत्या. भजनाच्या शब्दांत ‘वंदेमातरम्’चा जयशब्द आणि शिवाजीमहाराजांपासून तो खुद्द टिळकांपर्यंतच्या राष्ट्रभक्तांचा जयजयकार पुनः पुन्हां मिसळत होता. वरून पाऊस पडत होता तरी कुणाला त्याची क्षिति नव्हती.

हा शोकसमारंभ आटपून दुपारीं दोन वाजतां राजाभाऊ आपल्या खोलीवर आला तो एकदम अंथरुणावर अंग टाकून स्फुंदून स्फुंदून रडत पडला.

‘मी टिळकांच्या समाचाराला जाऊन येतों’ असं सांगून तो मुंबईस गेला तो आज सात दिवसांनीं उमाला पुन्हां दिसला. तीं त्याच्या खोलींत

गेली व त्याच्याजवळ बसली. तिच्याही डोळ्यांतून अश्रू वहात होते आणि तिलाही हुंदके येत होते. पण त्याच्या मस्तकावर हात थोपटीत ती म्हणाली,

"हें काय हें ?"

राजाभाऊनं तिच्याकडे पाहिलं अन् तीहि रडत आहे असं दिसतांच त्याला फार बरं वाटलं. ती स्त्री व आपण पुरुष आहोंत या अवधानाला त्या क्षणीं अवकाशच नव्हता. त्यानं तिच्या मांडीवर मस्तक टेकलं आणि सद्गदित स्वरानं तो म्हणाला,

"उमा, टिळक गेले !...आपण सगळीजणं आतां पोरकीं झालों ग !"

आणि तो जेव्हां मोठमोठ्यानं हुंदके देऊं लागला तेव्हां एखाद्या अर्भका-प्रमाणें त्याला जवळ घेऊन आपल्या डोळ्यांतून ठिबकणारे उष्ण अश्रू त्याच्या मस्तकावर सांडण्यांत उमाला कसलाही संकोच वाटला नाहीं !



# [१७]

टिळकांच्या मृत्यूबद्दल शोकप्रदर्शन करण्यासाठीं पुण्याच्या नागरिकांची सभा ता. १० ऑगस्ट रोजीं रे मार्केटाच्या पाठीमागच्या पटांगणांत झाली. ही सभा फार मोठी होती. ज्या पुण्यांत टिळकांचं सबंध आयुष्य गेलं त्या पुण्याच्या लोकांना आपल्या प्राणाहून प्रिय असलेल्या पराक्रमी पुढाऱ्या-विषयींची भक्ति प्रदर्शित करण्याची ही अखेरची संधि होती. मार्केटच्या पाठीमागचं विस्तीर्ण पटांगण माणसांनीं खचून भरलं होतं. लाला लजपतराय अमेरिकेहून नुकतेच परत आले होते, ते या शोकसभेचे अध्यक्ष होते. सभेच्या व्यवस्थापकांनीं जेव्हां राजाभाऊला चार दिवस आधीं सांगितलं, कीं तुम्ही या सभेंत बोललं पाहिजे तेव्हां त्याला कांहींसं आश्चर्य वाटलं. तो पुरता पंचवीस वर्षांचाही नव्हता, किंवा मोठा नाणावलेला वक्ताही नव्हता. कधींमधीं कॉलेजच्या सभांतून आणि १९१९ सालीं सत्याग्रह सुरू होणार होता

त्या वेळेस जाहीर सभांतून त्यानं भाषणं केलीं होतीं व तीं लोकांना आवडलीं होतीं इतकंच. पण सभेच्या चालकांनीं त्याला म्हटलं,

" तुम्ही चांगलं बोलतां–इतकंच नव्हे तर नव्या पिढींतले मोठे वक्ते म्हणून तुम्ही गाजाल असं सगळ्यांना वाटतं. शिवाय पुण्यांतल्या कॉलेजांतर्फे कुणी तरी बोलावं अशी आमची इच्छा आहे, अन् ती पूर्ण करणारा तुमच्या-शिवाय दुसरा कुणी आम्हांला दिसत नाहीं."

राजाभाऊनं त्यांचं म्हणणं कबूल केलं.

त्याच्या मनांत शंका आल्यावांचून राहिली नाहीं, कीं या लोकांच्या प्रशंसेनं फुगून जाऊन स्वतःच्या वक्तृत्वाचा डौल मिरविण्यासाठीं तर आपण बोलायचं कबूल केलं नाहीं ? त्यानं नीट आत्मपरीक्षण केलं. पण वृथाभिमाना-पेक्षां लोकमान्य टिळकांच्या पुण्यस्मृतीचा उच्चार करायची तळमळच आपल्या अंतःकरणांत अधिक आहे असं त्याला आढळून आलं, आणि मग त्याला बरं वाटलं.

वीस पंचवीस हजार लोकांच्या त्या प्रचंड शोकसभेंत पाऊल टाकतांच त्याचं अंतःकरण सद्गदित झालं. १९१९ सालच्या डिसेंबरमध्यें टिळक विलायते-हून परत आले तेव्हां त्यांना अडीच लाखांची देणगी सबंध राष्ट्रानं अर्पण केली होती, अन् रे मार्केटमागच्या याच पटांगणांत त्यांचा अपूर्व सत्कारसमारंभ होऊन त्यांना नागरिकांतर्फे मानपत्र अर्पण करण्यांत आलं होतं. आणि एक वर्षहि पुरतं लोटलं नाहीं तोंच तेच टिळक स्वर्गस्थ झाले होते अन् तेच नागरिक त्यांच्या स्मृतींची अखेरची तिलांजली सोडायला जमले होते. कोण विचित्र आणि हृदयविदारक दुर्दैवाची घटना ही ! अशा विचारांनीं राजा-भाऊचं अंतःकरण भरून गेलं, आणि त्या मनःस्थितींत त्यानं भाषण केलं तें अतिशय उत्कृष्ट वठलं.

तो घरीं आला तेव्हां उमा त्याला म्हणाली,

" थांबा, कपडे काढूं नका. जरा इथें असे बसा–मी तुमची दृष्ट काढणार आहे."

राजाभाऊ म्हणाला,

" शी: ! वेड लागलं कीं काय तुला ? दृष्ट कसली काढतेस ? "

" तुमचं आजचं भाषण इतकं सुंदर झालं कीं खरंच तुम्हांला कुणाची दृष्ट लागेल. कुणाची कशाला ? माझीच लागेल ! "

" म्हणजे ? तूं आली होतीस सभेला ? "

" हो ! किती छान बोलतां हो तुम्ही ! "

" उमा, नुसतं बोलण्याचं कसलं कौतुक करतेस ? आतां नुसतं बोलायचे का दिवस राहिले आहेत ? माझ्या हातून देशभक्तीची कांहीं तरी कृति केव्हां घडेल अशी मला उतावीळी वाटते. "

" तुम्ही असं बोलायला लागलांत कीं मला तुमची भीति वाटते. तुम्ही फार भावनाप्रधान आहांत. कधीं एकदम काय कराल अन् त्याचे परिणाम काय होतील असं माझ्या मनांत येतं. "

" परिणाम काय व्हायचे ? फार तर मी तुरुंगांत जाईन. "

" तुम्ही खरोखरच तुरुंगांत गेलांत तर तुमच्या मागोमाग मीसुद्धां येईन. "

" तूं ? "

" हो. मला ना संसार ना पाश ! तुरुंगांत जायला माझ्यापेक्षां अधिक योग्य स्त्री कोणती असेल ? "

" तुला पाश नाहीं असं कसं म्हणतेस ? आनंद आहे ना ? "

" तो मुलगा आहे. त्याला मी तुमच्या पंतांच्या स्वाधीन करीन अन् तुमच्या मागोमाग तुरुंगांत येईन. "

असं एकीकडे बोलतां बोलतां उमानं मीठ-मोहऱ्या हातीं केव्हां घेतल्या तें राजाभाऊला कळलंही नाहीं. तिनं त्याच्यावरून हात ओंवाळले तेव्हां त्याच्या तें लक्षांत आलं.

तो चपापला तेव्हां उमा मोठ्यानं हंसली आणि मीठ-मोहऱ्या चुलींत टाकून म्हणाली,

" पाहिलंत कां किती घाण सुटली ती ! "

किंचित् रागावून राजाभाऊ म्हणाला,

" तूं इतकी मूर्ख असशील अशी माझी नव्हती कल्पना. "

मात्र उमाचं तें अतिप्रेमाचं कृत्य जरी त्याला मूर्खपणाचं वाटलं तरी संध्याकाळच्या सभेंतलं आपलं भाषण अतिशय चांगलं झालं असं त्याचं त्यालाही वाटत होतं. आणि त्या भाषणाचा इतरांवर परिणाम झाला असो वा नसो त्याच्या स्वतःच्या मनावर तो फार झाला होता हेंहि त्याला कळत होतं. त्या रात्रीं तो मनाशीं सारखा विचार करीत होता, एका कॉलेजांत आपण अध्यापकाचं काम करतों यांत आपण देशहित कितीसं साधतों ? जें शिक्षण आपण विद्यार्थ्यांना देतों त्यामुळं देशाच्या उद्धारासाठीं तळमळणारे तरुण निर्माण होतात काय ? उलट तरुणांच्या ठिकाणच्या देशसेवेच्या भावना खच्ची व्हाव्या अशाच तऱ्हेचं धोरण आपली शिक्षणसंस्था शिस्तीच्या नांवाखालीं ठेवीत नाहीं काय ? किंबहुना बहुतांशीं सरकारी नियंत्रणाखालीं असलेली सध्याची शिक्षणपद्धति तरुणांच्या राष्ट्रीय वृत्तीचा परोपरीनं विघातच करीत नाहीं काय ? आणि असं असेल तर या गुलामी शिक्षणपद्धतीचा सबंध सांगाडा एकदां केव्हां तरी मोडून टाकायला नको कां ? तिचा विध्वंस करायला नको ? आणि आपण तर त्या शिक्षणपद्धतीच्या यंत्राचा एक भाग होऊन बसलों आहोंत हीच कां आपली देशसेवा ?...

नंतरच्या दिवसांत राजाभाऊ कॉलेजांत जात होता, शिकविण्याचं कामही करीत होता, पण त्याचं मन असंतोषानं भरलेलं होतं.

त्याच्या अंतःकरणांतल्या असंतोषाचा परिपोष व्हावा अशा तऱ्हेच्या घटना देशांत त्याच वेळीं झपाट्यानं घडत होत्या. टिळकांच्या मृत्यूपर्यंत असहकारितेची चळवळ जरी रीतसर पुकारली गेली नव्हती तरी त्या चळवळीची तयारी दर्शविणारीं पूर्वचिन्हं जिकडे तिकडे स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. पंजाब-

मधील हकीगतींची चौकशी करण्यासाठीं जें ' हंटर कमिशन ' सरकारनं नेमलं होतं त्याचा रिपोर्ट ता. २८ मे रोजीं प्रसिद्ध झाला होता. त्या रिपोर्टानं हिंदी लोकांचं समाधान होण्याऐवजीं लोकांचीं मनं निराशेनं आणि तिरस्कारानं भरून मात्र गेलीं होतीं. ता. ३० मे रोजीं ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा बनारस येथें झाली होती, व त्या सभेनं पंजाब प्रकरणासंबंधानं अत्यंत तीव्र निषेध व्यक्त करून तो प्रश्न काँग्रेसच्या जादा अधिवेशनाकडे सोपवावा असं ठरवलं होतं. ज्या सरकारला पंजाबांतील दडपशाहीबद्दल यत्किंचितही पश्चात्ताप होत नाहीं त्या सरकारवर शक्य तितक्या प्रकारांनीं कडक बहिष्कार घालून असहकारितेच्या मार्गानं देशांत संपूर्ण स्वराज्याची स्थापना करणं हा एकच मार्ग आतां देशापुढे उरला आहे असं महात्मा गांधी निःसंदिग्धपणानं बोलूं लागले होते. इतर पुढाऱ्यांची या त्यांच्या मताविषयींची अनुकूलता वाढत होती. ता. २ जून रोजीं अलाहाबाद येथें सर्व पुढाऱ्यांची मोठी परिषद भरली होती व त्या परिषदेंत असहकारितेच्या धोरणाला मान्यता देण्यांत आली होती. मुसलमानांच्या खिलाफत परिषदेनं तर दोन महिन्यांपूर्वीच मद्रास येथें असहकारितेचा जोराचा पुरस्कार केला होता.

जिकडून तिकडून सुटलेले हे झंझावात ता. ९ सप्टेंबर रोजीं कलकत्ता येथें भरलेल्या काँग्रेसच्या जादा अधिवेशनांत एकत्र जमून प्रगट झाले, आणि त्या अधिवेशनांत गांधींच्या असहकारितेच्या ठरावावर काँग्रेसचं शिक्कामोर्तब झालं. असहकारितेचा प्रारंभ म्हणून पदव्या, विलायती माल, कोर्टकचेऱ्या आणि शाळाकॉलेजं यांच्यावर बहिष्कार पुकारण्यांत आला.

या बहिष्काराची बातमी पुण्यास येऊन थडकल्याबरोबर राजाभाऊनं कॉलेजांतल्या आपल्या नोकरीचा राजीनामा दिला, आणि ' शाळा सोडा, कॉलेजं सोडा, ' अशी घोषणा तो जाहीर सभांतून करूं लागला. विद्यार्थ्यांच्या मोठमोठ्या सभा भरूं लागल्या. रोज शेंकडों विद्यार्थी शाळा कॉलेजं सोडूं लागलें. पुण्यासच नव्हे तर मुंबई, सांगली, मिरज, कोल्हापूर, बेळगांव, धारवाड इत्यादि ठिकाणीं हिंडून राजाभाऊनं बहिष्काराचं प्रचारकार्य जोरानं सुरूं केलं. जाहीर सभांतून बोलतांना राजद्रोहाचं कलम संभाळण्याचं भान त्याला कित्येक वेळां रहात नसे. त्याच्यावर खटला होणार, त्याला पकडणार अशा बातम्या

पुष्कळदां उठत. पण त्यांचा त्याच्या मनावर परिणाम होण्यासारखा नव्हता. 'डर तो पिछे रही ' अशी त्याची वृत्ति खरोखरीच झाली होती. आपण जो प्रचार करीत आहोंत त्यामुळं देशाचं स्वातंत्र्य जवळ येईल अशी त्याची अंतः- करणपूर्वक श्रद्धा होती. श्रद्धेचा उन्माद कांहीं विलक्षण असतो. त्या उन्मादांत राजाभाऊ होता. पूर्वी कधीं नव्हे अशा आनंदानं आणि उत्साहानं त्याचं अंतःकरण कांठोकांठ भरून गेलं होतं !

* * *

कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेसनं असहकारितेच्या कार्यक्रमाला दिलेली मंजुरी तात्पुरती होती. त्या मंजुरीला कायमचं स्वरूप डिसेंबरमध्यें नागपूर येथें भरणाऱ्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत यायचं होतं. मध्यंतरीच्या तीन महिन्यांच्या अवधींत असहकारितेच्या विरुद्ध असलेल्या लोकांना संघटित व्हायचं असेल तर अवकाश होता; पण देशांत असे लोक फार थोडे उरले होते. कलकत्त्यास पास झालेला असहकारितेचा ठराव सबंध देशभर लोकांनीं इतक्या प्रेमानं उचलून धरला, कीं तो ठराव नागपूरला परत घेतला जाईल असं यत्किंचितहि चिन्ह उरलं नाहीं. असहकारितेचा ठराव नागपूरला पक्का होणार असं स्पष्ट दिसूं लागलं.

पुण्याच्या प्रमुख राजकीय कार्यकर्त्यांत राजाभाऊची गणना आतां व्हायला लागली होती. पुण्यातर्फेच्या प्रतिनिधींत त्याची निवड झाली व ते नागपूरच्या कॉंग्रेसला हजर रहावयासाठीं निघाला.

त्यानं उमाला तें सांगितलं व म्हटलं,

"येतेस कां माझ्याबरोबर नागपूरला ?"

ती एकदम आश्चर्य दाखवून म्हणाली,

"अग्गा, कोण ? मी ?"

"हो तूं; कां ?"

"नको बाई. मी तर अशी बातमी ऐकली आहे, कीं नागपूरच्या कॉंग्रेसला जाणाऱ्या सगळ्या लोकांना सरकार पकडणार आहे."

" मग, तूं नेहमीं म्हणतेसना कीं माझ्यामागोमाग तूं तुरुंगांत येणार म्हणून ? "

" मागोमाग येईन, पण बरोबर नको. मी तुमच्याबरोबर असलें म्हणजे लोक तुम्हांला सारखं विचारतील, ही कोण, अन् तुमचा गोंधळ उडेल. लोक नांवं ठेवतील, अन् तुम्हांला न् मला दोघांनाहि वाईट वाटेल. तेव्हां नकोच तें. तुम्ही एकटे जा आपले. परत आल्यावर तुम्ही खूप खूप हकीगती मला सांगा म्हणजे झालं."

मग त्यानं तिला अधिक आग्रह केला नाहीं. त्याच्या लौकिकाला ती किती जपत होती तें उघड करणारं असलं बोलणं ती पुष्कळदां करी, आणि तें ऐकून दर वेळीं राजाभाऊच्या मनांत येई, कीं ही स्वतः जर इतकी सावध आहे तर कुठल्याही विपरीत परिणामाची भीति न बाळगता तिच्या सन्निध सदा रहाणं हेंच आपलं कर्तव्य आहे; लोक काय वाटेल तें बोलोत. मनांतले हे विचार त्याच्या दृष्टींत दर वेळीं प्रतिबिंबित होत असत कीं काय कुणास ठाऊक, आणि त्याच्या त्या अर्थपूर्ण दृष्टीचा उमाला दर वेळीं विस्मय वाटत असे कीं काय तेही कोण जाणे ! आज मात्र तिच्या बोलण्यावर कांहीं उत्तर करण्या-ऐवजीं तो जेव्हा नुसतं तिच्याकडे पहात राहिला तेव्हां ती किंचित् हंसून म्हणाली,

" हें काय, नुसतं पहातां काय माझ्याकडे ? मी काय म्हटलं तें ऐकलंत कीं नाहीं ? "

" हो ऐकलं ना—"

" छे ! खोटं ! लक्ष देऊन नाहीं ऐकलं. मी म्हटलं, परत आल्यावर मला पुष्कळ हकीगती सांगितल्या पाहिजेत तुम्ही नागपूरच्या. "

" हो, सांगेन ना ! "

आणि खरोखरच पुण्याहून निघाल्यापासून वाटेनं आणि नागपूरला जें जें दिसलं तें पहातांना एकीकडे मनांतल्या मनांत उमाला हें सांगायचं तें सांगायचं असं राजाभाऊ सतत म्हणत होता.

नागपूरची काँग्रेस अपूर्व अशी झाली. असहकारितेच्या ध्वनीनं सारं वातावरण भरून गेलं होतं. पूर्वी किंवा नंतरही कोणत्याही काँग्रेसला हजर नव्हत इतके प्रतिनिधि त्या काँग्रेसला जमले होते. त्याची संख्या सुमारें पंधरा हजारांपर्यंत गेली. त्यांत एक हजार मुसलमान होतें व सुमारें दोनशें स्त्रिया होत्या. कर्नल वेजवूड, हॉलफर्ड नाईट आणि बेन स्पूर हे इंग्लंडच्या मजूरपक्षाचें प्रतिनिधी म्हणून काँग्रेसला हजर होते. गांधीच्या मतांचा या अधिवेशनांत जो विजय झाला तो हृदयस्पर्शी होता. देशबंधू दास गांधींच्या कार्यक्रमास प्रतिकूल होते व कलकत्त्यांत जें सफल झालं तें नागपूरला निष्फळ ठरविण्याकरितां चंग बांधून ते आले होते. पूर्व बंगाल व आसाममधून असहकारिताविरोधी अडीचशें प्रतिनिधींची तुकडी त्यांनीं आणली होती व त्यासाठीं त्यांनीं आपल्या खिशांतले छत्तीस हजार रुपये खर्च केले होते. महाराष्ट्राचा विरोधही कांहीं कमी तीव्र व संघटित नव्हता. वेजवूड, बेन स्पूर व नाईट यांनींही काँग्रेसला असहकारितेपासून परावृत्त करण्यासाठीं आपलं बुद्धिसामर्थ्य खर्ची घातलं. विषयनियामक मंडळांत बोलतांना सावधगिरीचा गंभीर इषारा देऊन वेजवूड म्हणाले,

" या असहकारितेच्या कार्यक्रमामुळं तुमचा कैवार घेणाऱ्या इंग्लंडांतील तुमच्या मित्रांची परिस्थिती तुम्ही बिकट करून सोडाल. पोलिस तुमच्या मागं लागेल. राजाशीं एकनिष्ठ राहूं अशा प्रतिज्ञेवर वकील सह्या करींत असतात; ते तुमच्या चळवळींत काम करणार कसे ? नीट विचार करा. तुम्ही अरण्यांत प्रवेश करीत आहांत. "

पण गांधींनीं आपल्या भाषणांत स्पष्ट सांगितलं, कीं—

" हिंदुस्तानाबाहेर आम्हांला कोणी मित्र नाहीं. अशा मित्रांवर आम्ही आजपर्यंत विसंबलों तें पुष्कळ झालं. आमचा उद्धार आमच्याच हातांत आहे हें आम्हीं आतां ओळखलं पाहिजे. अन् म्हणूनच आम्ही असहकारितेच्या कार्यक्रमाला हात घातला आहे. हिंदी राजकारणांत पोलिसांची भीति कांहीं नवीन नाहीं. वकिलांना राजनिष्ठ राहण्याबद्दल सही करावी लागते हें खरं आहे. पण म्हणूनच त्यांनीं आपल्या सनदा फाडून टाकाव्यात असं आम्ही त्यांना

सांगत आहोंत. आम्ही अरण्यांत प्रवेश करीत आहोंत हें आम्ही जाणून आहोंत. पण दुधाच्या व मधाच्या प्रवाहांनीं सुसंपन्न असलेलं नंदनवन गांठायचं असल्यास अरण्यांतूनही प्रथम जाणं भाग आहे. आम्हांला स्वातंत्र्याची भूमि गांठायची आहे. वाटेंतल्या अरण्याला आम्ही भिणार नाहीं."

अशा प्रकारें गांधीनीं सगळ्यांचा विरोध सहज लीलेनं छेदून टाकला. सगळ्यांचीं अंतःकरणं त्यांनीं काबीज केलीं. बिपिनचंद्र पाल व मालवीय यांच्यासारखे मुरलेले पुढारी आणि दास व लाला लजपतराय यांच्यासारखे शूर पुढारी गांधींच्यापुढें फिके पडले. इतक्या अधिकारवाणीनं बोलणारा हा पुरुष कोण व हा कुठून आला असं ते आश्चर्यानं अन् आदरानं एकमेकांस विचारूं लागले. देशांत गांधीयुग सुरू झालं याबद्दल शंका राहिली नाहीं. कलकत्त्यास तात्पुरता मंजूर झालेला असहकारितेचा कार्यक्रम कायमचा मंजूर झाला. चरखा, खादी आणि बहिष्कार याखेरीज देशांत दुसरा शब्द ऐकूं येईनासा झाला. हिंदु मुसलमान एक झाले. 'एक वर्षांत स्वराज्य' अशा जयघोषानं दाही दिशा निनादूं लागल्या.

राजाभाऊ पुण्यास परत आला तो देशसेवेचा उत्साह त्याच्या अंतःकरणांत मावत नव्हता. विद्यार्थ्यांच्या वार्षिक परीक्षा जवळ आल्या होत्या. पण "परिक्षेच्या मोहाला बळी पडूं नका. देशाची हांक ऐका. आपल्या आयुष्यातलं एक वर्षही देशासाठीं खर्च करायला तुम्ही तयार नाहीं ?" अशा प्रकारच्या भाषणांनीं राजाभाऊनं विद्यार्थ्यांचीं अंतःकरणं हलवून सोडलीं. शेंकडों विद्यार्थी बहिष्कारांत सामील झाले. पुण्यास राष्ट्रीय विद्यापीठाची स्थापना झाली. त्यांत राजाभाऊ शिकवूं लागला. खादीच्या चळवळीतही त्यानं पूर्ण लक्ष घातलं. तो दिवसभर विलक्षण परिश्रम करी. लेख लिहिण्यासाठीं रात्रीं जागे. या गांवीं जा, त्या गांवीं जा, अशी त्याची धडपड चालू असे. कधीं कधीं रात्रीं एक एक वाजतां तो घरीं येई; आणि पहांटे पांच वाजतांच उठून बाहेर पडे. उमा त्याची सहकर्ती बनली होती. त्याच्या सहाय्यानं तिनं आपला शिवणकामाचा वर्ग बंद करून चरख्यावर सूत काढण्याचा अन् खादी विणण्याचा वर्ग सुरू केला होता. त्याचा उत्साह पाहून तिला काळजी वाटे. त्याच्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेंत ती अधिक लक्ष घालूं लागली होती. त्यानं जरा नियमित वागावं अन्

आपल्या प्रकृतीची काळजी घ्यावी असं ती त्याला वारंवार बजावी. कधीं कधीं त्याच्यावर रागावेसुद्धां.

एकदां राजाभाऊनं तिला विचारलं,

" तूं कां येवढी माझी काळजी करतेस ? "

" तें मला सांगतां यायचं नाहीं अन् तुम्हांला कळायचं नाहीं "

असं म्हणून तिनं चटकन् डोळ्याला पदर लावला !



*

# [१८]

असहकारितेच्या ऐन धामधुमींत वावरतांना राजाभाऊला अनेक अनुभव आले, मनुष्यस्वभावाचे अनेक नमुने दिसले, आणि प्रामाणिकपणाचीं आणि स्वार्थत्यागाचीं व तशींच ढोंगीपणाचीं आणि लबाडीचीं चित्रंही त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलीं.

एकदां संध्याकाळीं जवळ जवळ दिवे लागणीची वेळ झाल्यावर तो राष्ट्रीय विद्यापीठाच्या आपल्या कचेरींत काम करीत बसला असतांना दोन तरुण मुलगे त्याच्याकडे आले. वयानं सोळा सतरा वर्षांचेच असतील ते. दोघंही शरिरानं जरा कृशच होते. दोघांच्याही अंगावर जाडी भरडी खादी होती. हातांत एक एक पिशवी होती, त्यांत दोन चार कपडे असतीलसं वाटत होतं. दिव्याच्या प्रकाशांत त्यांचे चेहरे न्याहाळण्याचा राजाभाऊनं प्रयत्न

केला. दोन्ही चेहऱ्यांवर बुद्धिमत्तेचं तेज होतं, आणि कुठून तरी लांबून प्रवास करून ते आले असावेत असं दर्शविणारा शीण त्यांच्या मुद्रेवर होता.

राजाभाऊनं विचारलं,

" माझ्याकडे आलांत काय ? "

" होय. "

" काय काम आहे ? "

त्या दोघां तरुणांनीं एकमेकांकडे पाहिलं व जणूं एकानं दुसऱ्याला 'तूं बोल' असं सुचविल्यावरून तो दुसरा राजाभाऊस म्हणाला,

" आम्हांला आश्रय हवा आहे. "

" तुम्ही कोण ? "

" आम्ही दोघंही नगरचे आहोंत. मॅट्रिकच्या वर्गांत होतों. दोघांनाही स्कॉलरशिप मिळत होती. पण तुमचीं व्याख्यानं ऐकलीं अन् शाळा सोडून दिली. इथल्या राष्ट्रीय विद्यापीठांत यायची इच्छा आहे. पण घरची फार गरीबी आहे. माझे वडील एका मारवाड्याच्या घरीं हिशेब लिहितात. ह्याच्या वडिलांचं लहानसं दुकान आहे. दोघांच्याही घरीं मिळवता एकटा अन् खायला माणसं दहा. आम्ही मॅट्रिक होऊं म्हणून दोघांच्याही वडिलांची मोठी आशा. आम्ही शाळा सोडली याबद्दल आमच्यांवर घरच्या माणसांचा राग झाला आहे. इथें आलों ते असहकारिता केलेल्या एका वकिलानीं रेल्वेचं भाडं दिलं म्हणून. इथें राष्ट्रीय विद्यापीठांत शिक्षण घ्यायची इच्छा आहे. पण रहायचं कुठें अन् जेवायची सोय काय करायची अशी आमची अडचण आहे. आपण मदत कराल म्हणून मोठ्या आशेनं आलों आहोंत."

राजानं त्या दोघांकडे पाहिलं आणि नंतर हातांतल्या कागदांची चाळवाचाळव करीत नजर खालीं केली.

गेल्या दोन महिन्यांत अशी कित्येक तरुण मुलं त्याच्या आढळण्यांत आलीं होती. तीं बुद्धिमान् असत. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत खचित पास

होण्यासारखीं असत. कांहीं तर अखेरच्या बी. ए. च्या किंवा वैद्यकीच्या परीक्षेला बसून लगेच चांगल्या नोकरीवर लागलीं असतीं अशी असत. घरची गरीबी तर सगळ्यांचीच होती. त्यांच्या हकीगती ऐकल्या कीं राजाभाऊचं मन अनेक विचारांनीं अस्वस्थ होऊन जाई. त्या तरुणांची धडाडी आणि त्यांचा स्वार्थत्याग त्याला इतका अपूर्व वाटे, कीं आपला स्वतःचा स्वार्थत्याग त्यापुढें कांहींच नव्हे अशा कल्पनेनं त्याला लाजल्यासारखं होई. अशा या मुलांचा प्रश्न कसा सोडवायचा त्याला कळत नसे. राष्ट्रीय विद्यापीठ स्थापन झाल होतं हें खरं. पण तिथें फक्त शिक्षणच काय ते मोफत होतं. राष्ट्रीय शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनाही खायला प्यायला लागतंच. त्यांच्या पोटाचा प्रश्न कसा सोडवायचा ? तो सोडवायला विद्यापीठाजवळ लाखों रुपयांचा फंड असायला पाहिजे होता. आणि खरी स्थिति अशी होती, कीं विद्यापीठाजवळ पुरते हजार पांचशेंही रुपये नव्हते. साराच दरिद्री कारभार चालला होता !......

किंबहुना असहकारितेच्या चळवळीचा एक विचित्र परिणाम असा झाला होता, कीं दरिद्री लोक अधिक दरिद्री झालें होतें. फार थोडीं श्रीमंत माणसं त्या चळवळींत पडली होती. ज्यांनीं वकिली सोडली ते गरीबींत दिवस काढणारेच वकील होतें. ज्यांनीं शाळाकॉलेज सोडलीं तेही दरिद्री कुटुंबांतलेंच विद्यार्थी होतें. असहकारितेच्या चळवळींत सामील झाल्यामुळं या सगळ्यांचं दारिद्र्य अधिकच तीव्र झालं होतं. प्रत्येक व्यक्तीनं चरखा फिरवावा आणि खादी विणावी म्हणजे सगळ्यांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटेल असं गांधी म्हणत होतें. राजाभाऊनं स्वतःही जाहीर व्याख्यानांत हा उपदेश लोकांना केला होता. पण हा उपदेश करायला कितीही सोपा असला तरी आतां त्याच्यापुढें जी दोन मुलं उभीं होतीं तशीं मुलं समोर उभीं राहिलीं, कीं त्या उपदेशावरचा विश्वास दृढ रहाणं फार अवघड होतं......

गांधी मुंबईस असतांना राजाभाऊनं मुद्दाम त्यांची मुलाखत घेऊन राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत उत्पन्न होणारा हा प्रश्न त्यांना विचारला होता. पण गांधींनीं फक्त आपलं सुप्रसिद्ध स्मित केलं होतं आणि चरख्याच्या मंत्राचा पुनरुच्चार केला होता. राजाभाऊला गांधींचा प्रथम राग आला तो त्या वेळीं......

या सगळ्या गोष्टी आतां राजाभाऊला आठवल्या व त्याची खालीं वळलेली नजर पुन्हां चटकन् त्या दोन मुलांकडे वळेना.

तो विचारमग्न झाला आहे असं पाहून त्या दोन मुलांपैकीं मघाशीं जो बोलला होता तो म्हणाला,

" आम्ही फार आशेनं आपणांकडे आलों आहोंत. आमची निराशा करूं नका. "

राजाभाऊनं स्मित केलं आणि म्हटलं,

" छे छे, तुमची निराशा मी करणार नाहीं. भिऊं नका. आतां असं करूं, मी आपलं हें काम आटपून घरीं जायला निघालोंच होतो. तुम्ही माझ्या-बरोबर माझ्या घरीं चला. तुमची रहायची सोय दोन तीन दिवसांत मी दुसरी-कडे करीन. तंवर तुम्ही माझ्याच खोलींत रहा. तुमच्या जेवणाचीही सोय मी लवकरच दुसरीकडे करीन. तंवर तुमच्या खाणावळीचे पैसे मी देईन. चला, जाऊं या आपण. "

असं म्हणून त्यानं टेबलावरचे कागद जुळवून आपल्या खादीच्या पिशवींत घालण्यास प्रारंभ केला. मनाशीं तो विचार करीत होता, गेल्या दोन महिन्यांत गरीब विद्यार्थ्यांना मदत करण्यांत आपले शेंपांचशें रुपये गेले. आपल्या खिशांत तर या वेळेस एक दिडकीही नाहीं. घरीं टेबलाच्या खणांत तरी पांच दहा रुपये तरी निघतील का नाहीं कुणास ठाऊक ?......

* * *

राष्ट्रीय विद्यापीठाला मदत मागण्यासाठीं तो अनेक सधन लोकांच्या गांठी घेत असे. राष्ट्रीय शिक्षणाविषयीं ज्यांची सहानुभूति त्याला थोडी फार माहीत असे, अशाच लोकांकडे जाण्याचं तो धोरण ठेवी पण एखादे वेळीं त्याची अपेक्षा चुकीची ठरे आणि मग त्याला जो अनुभव येई, तो मोठा विषादकारक असे.

सावकारीचा धंदा करणाऱ्या एका गृहस्थांनीं त्याला चक्क सांगितलं.

" मी तुम्हांला एक पैसुद्धां देणार नाहीं. "

अशा उत्तराची सार्वजनिक कार्यकर्त्याला सवय नसते असं नाहीं. अशा उत्तरावर काय बोलायचं हेंही त्याला अनुभवानं माहित झालेलं असतं.

राजाभाऊ त्यांना म्हणाला,

" आपली मर्जी नसेल तर आपण वर्गणी दिलीच पाहिजे असा जुलूम मी आपणांवर करूं शकत नाहीं. पण आमच्या कार्यावर आपला आक्षेप काय आहे तें कळलं तर बरं होईल."

" आक्षेप काय असायचा ? राष्ट्रीय शिक्षण या शब्दांचा अर्थच मुळीं मला कळत नाहीं ! सध्यांच्या शाळा कॉलेजांतून जें शिक्षण मिळतं त्याला राष्ट्रीय कां म्हणायचं नाहीं सांगतां कां ? ते घेऊनच टिळक निर्माण झाले आणि गांधींनींसुद्धां तेंच घेतलं होतं !"

" पण टिळक एकच झाले अन् गांधींसुद्धां एकच आहेत. तेहतीस कोट हिंदी लोक देशभक्त व्हावेत अशी आमची इच्छा आहे. अन् ते निर्माण करण्याची ताकद सध्यांच्या शिक्षणात नाहीं. म्हणून राष्ट्रीय शिक्षण पाहिजे आहे आम्हांला."

" अहो, पण तुमच्या राष्ट्रीय विद्यापीठांत तुम्ही निराळं काय शिकवणार ? सुरत मुंबईच्या पश्चिमेस आहे म्हणणार ? कां पुणें गंगा नदीच्या कांठीं आहे म्हणणार ? दोन अधिक दोन चार असंच शिकवणार ना तुम्ही आपल्या विद्यार्थ्यांना ?"

" दोन अन् दोन चार असंच सांगणार हो; पण दोन गुलाम अधिक दोन गुलाम असं उदाहरण घ्यायच्या ऐवजी दोन शूर देशभक्त अधिक दोन शूर देशभक्त असं घेऊं आम्ही. आणि त्याचप्रमाणं आमचेही विद्यार्थी सुरत मुंबईच्या उत्तरेस आहे असंच शिकतील पण जिथली इंग्रजांची वखार शिवाजीनं लुटली ती सुरत अशी ओळख ठेवतील, आणि ज्या पुण्यांत बंडखोर वासुदेव बळवंत फडके होऊन गेले ते पुणं असा इतिहास पाठ करतील—"

" म्हणजे उघड उघड राजद्रोहाचं शिक्षण देणार तुम्ही असं म्हणा ना ! असल्या संस्थेशीं संबंध नाहीं ठेवायचा मला अन् शिवाय आज आम्ही हजार

पांचशें रुपये द्यायचे तुम्हांला अन् तुम्ही उद्यां ते खाऊन टाकायचे, विद्यापीठ बंद झालं म्हणून जाहीर करायचं, अन् खाका वर करून मोकळं व्हायचं हें माहित आहे आम्हांला. राजकारण करणारे तुम्ही सगळे लोक लुच्चे आहांत! टिळकांना चिरोल केसमध्यें अपयश आलं तेव्हां त्यांना थैली अर्पण करण्यासाठीं गोरगरिबांनीं पै पैसा देऊन अडीच लाख रुपये जमवले, अन् टिळकांच्या मागं पहावं तों त्यांच्या मुलांच्या वांट्याला चांगलं धबाड आलं. तुमचे आतांचे गांधी झाले तरी त्यांतलेच कीं! सारा लुच्चांचा बाजार! तुम्ही तरुण आहांत. तुम्हांला माहीत नाहीं अजून. पण या पुण्यांत साठ उन्हाळे पावसाळे काढले आहेत मी! माझें ऐका तुम्ही. आज राष्ट्रीय शिक्षणाचा उदो उदो करीत पुण्याचीं पुढारी धेंडं तुम्हांला उत्तेजन देताहेत. पण वेळ आली कीं हेच पगडी फिरवतील की नाहीं पहा तुम्ही! अहो, यांना तरी गांधींची चळवळ मनापासून हवी आहे म्हणतां काय? गांधीच्यापुढें कांहीं चालत नाहीं म्हणून हे त्यांच्या सुरांत सूर मिळवताहेत. यांचे तेरड्याचे रंग तीन दिवस टिकतील फार तर. माझे हे शब्द लिहून ठेवा तुम्ही."

राजाभाऊनं त्याचे शब्द कांहीं लिहून ठेवले नाहीत, पण नमस्कार करून त्याचा निरोप घेतल्यावर त्याचं मन त्या शब्दांचा विचार करीत अस्वस्थ झाल्यावांचून राहिलं नाहीं.

अशा प्रसंगांनीं तो फार विषण्ण होत असे: आणि आपल्या भोंवतीच्या कार्यकर्त्यांकडे व पुढाऱ्यांकडे तो जेव्हां अतिशय चिकित्सक नजरेनं आणि सूक्ष्मतेनं पाही तेव्हां त्यांच्यापैकी कांहीं केवळ लोकमताच्या प्रवाहाविरुद्ध जातां येत नाहीं म्हणूनच असहकारितेच्या चळवळींत सामील झाले असावेत अशी पुसट शंका येऊन त्याच्या मनाची विषण्णता वाढत असे. कापडाचे कांहीं व्यापारी कित्येकदां हळूंच म्हणत, "आम्ही बोलून चालून एका वर्षाच्या करारावर या चळवळींत पडलो आहोंत. चळवळ फसली तर आज गुदामांत टाकलेले विलायती कापडाचे गठ्ठे आम्ही पुन्हां बाहेर काढून विकूं. आमचं पोट आहेच कीं नाहीं?" असहकारितेंत पडलेल्या वकिलांपैकी कांहीं पुष्कळदां म्हणत, "एका वर्षांत स्वराज्य मिळालं नाहीं तर आम्ही पुन्हां वकिली सुरू करणार. आमच्या बायकामुलांनीं उपाशी मरावं असं तर नाहीं तुमचं म्हणणं?

बोलून चालून आम्ही एका वर्षापुरता गांधीशीं करार केला आहे!" ही असलीं बोलणीं ऐकलीं कीं राजाभाऊच्या मनांत येई, हे व्यापारी पुन्हां व्यापार करणार, हे वकील पुन्हां वकिली करणार, पण जे सर्वस्वावर कायमचं पाणी सोडून या युद्धांत सामील झाले आहेत ते? चळवळ फसली तर ते काय करणार? त्याचं काय होणार? सर्वनाश?.....

असल्या विचारांनीं त्याचं मन मनस्वी उदास व सचिंत होत असे.

*　　　　*　　　　*

मात्र अंतःकरणाची उदासीनता घालविणाऱ्या गोष्टीही आजूबाजूस कांही थोड्या घडत नव्हत्या. कळकळीचे कार्यकर्ते निर्माण होत होते. हाल-अपेष्टा सोसून गांधींची आज्ञा मान्य करण्याची उत्सुकता हजारो लोकांच्या अंतःकरणांत दिसत होती. सरकारी दडपशाहीची भीति लोकांच्या मनांत उरली नव्हती. विलायती कपड्यांचा आणि छानछोकीचा षोक लुप्त झाला होता. प्रतिष्ठेच्या कल्पना पार बदलल्या होत्या. खादीचा प्रसार झपाट्यानं होत होता.

एकदां रात्रीच्या वेळीं एक वृद्ध गृहस्थ त्याच्या खोलीवर आले व म्हणाले,

"माझं कांहीं काम नाहीं. उगीच भेटायला आलों."

त्यांच्यापुढे खुर्ची सरकवीत राजाभाऊ म्हणाला,

"पण बसा ना."

त्या वृद्ध गृहस्थांनीं त्याच्याकडे निरखून पाहिलं व हंसत म्हटलं,

"केवळ तुम्हांला पहायसाठीं अन् शाबासकी द्यायसाठीं आलों होतों. तुमचे वडील पंजाबराव माझे मोठे स्नेही होते. त्यांचा मुलगा असा कर्तृत्ववान् निघाला हे पाहून मला फार आनंद होतो. स्वारी आज हयात असायला हवी होती. तुम्हाला पाहून आज त्याला केवढी धन्यता वाटली असती! छान चालवलं आहांत काम तुम्ही. खादीनं स्वराज्य मिळाल्याशिवाय रहणार नाहीं बघा! नुकती कुठें खादीची चळवळ सुरू झाली आहे तर

मँचेस्टरच्या अन् लँकेशायरच्या गिरण्या लागल्या आहेत बंद पडायला, अन् त्या गिरणीवाल्यांचा ब्रिटिश सरकारजवळ तगादा सुरू झाला आहे, कीं हिंदुस्तानांतली ही भानगड लवकर मिटवा ! चालूं द्या नेटानं तुमचं काम, राजाभाऊ."

असं म्हणून त्या वृद्ध गृहस्थांनीं राजाभाऊची जेव्हां पाट थोपटली तेव्हां तो सद्गदित झाला.

ते वृद्ध गृहस्थ जायला निघाले तेव्हां इतका वेळ तिथेंच बसलेली उमा त्यांच्या दृष्टीस पडली व त्यांनी राजाभाऊला विचारलं,

"या कोण ?"

"या......"

असं म्हणून राजाभाऊ अडखळला. तेव्हां ते वृद्ध गृहस्थ म्हणाले,

"मला वाटलं पंजाबरावांची ही सून"

"छे छे, या आमच्या वाड्यांत रहातात. खादी विणण्याचा वर्ग चालवला आहे यांनी......"

राजाभाऊ आणखी कांहीं सांगणार होता, पण जणूं अधिक कांहीं समजून घेण्याचं मोठंसं महत्त्व नाही अशा आविर्भावानं ते वृद्ध गृहस्थ म्हणाले,

"असं असं, आलं लक्षांत."

आणि ते निघून गेले.

* * *

खादी आणि बहिष्कार या दोन्ही व्रतांचं पालन लोक प्रशंसनीय तत्परतेनं करीत होते हे जरी खरं, तरी ठिकठिकाणीं हिंडतांना लोकांच्या अंतःकरणांत शिरून त्यांच्यांशीं बोलण्याची संधि राजाभाऊला जेव्हां जेव्हां मिळे तेव्हां तेव्हां त्याला असं दिसून येई, कीं पूर्वी एकदां तहकूब झालेली कायदेभंगाची आणि करबंदीची चळवळ कॉंग्रेस केव्हां सुरू करते इकडे लोकांचं खरं लक्ष होतं. शस्त्रावांचून कां होईना, पण सरकारशीं दोन हात करायला लोक उत्सुक होते.

काँग्रेसचं सामर्थ्य दिवसेंदिवस वाढत होतं यांत संशय नव्हता. सरकार दडपशाहीची तयारी करीत होतं यांतही संशय नव्हता. एक कोटी स्वराज्य-फंड जमा करावा आणि देशांत वीस लाख चरखे चालतील अशी व्यवस्था करावी असे ठराव बेझवाडा इथें भरलेल्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीनें पास केले. या दोन्ही ठरावांना सबंध राष्ट्रानं जें उत्तर दिलं तें अपूर्व उत्साहाचं होतं. चरख्यांची संख्या लाखालाखांनीं वाढत होती. स्वराज्य फंड तर संकल्पित एक कोटीपेक्षां पंधरा लाखांनीं जास्तीच जमला. पण असं असूनही सार्वत्रिक कायदेभंग सुरू करण्याइतकी शिस्त राष्ट्रांत अजून निर्माण झाली नाहीं असं गांधींना वाटत होतं. उलट सरकार मात्र दडपशाहीचीं कृत्यं बेमुर्वतपणानं करीतच होतं. मार्च महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत नानकाना येथील गुरुद्वारामध्ये शीख लोकांची यात्रा भरली असतां तिच्यावर झडप घालून गोळीबार करण्यांत आला होता. या प्रकरणामुळं देशांत मोठी खळबळ उडून गेली होती. मैमनसिंग येथें देशबंधु दास जावयास निघाले तेव्हां त्यांना मनाई करण्यात आली होती. बाबू राजेंद्रप्रसाद व मौलाना मझलुल् हक यांनीं आसाममध्ये जातां कामा नये असा हुकूम निघाला होता. याकूब हुसेन यांनीं कलकत्त्यांत व लाला लजपतराय यांनीं पेशावरांत पाऊल टाकूं नये असं त्यांच्यावर बंधन घालण्यांत आलं होतं. अशाच प्रकारच्या नोटीसा ठिकठिकाणच्या इतर पुढाऱ्यांवर बजावण्यांत आल्या होत्या. राजद्रोही सभांचा कायदा लाहोर शहरीं लागू करण्यांत आला होता. अलीबंधूंवर सरकारी खटला लवकरच सुरू होणार होता.

याच सुमारास लॉर्ड रीडिंग व्हाइसरॉय होऊन हिंदुस्तानांत आले. पंडित मालवीय यांनीं त्यांची व गांधींची मुलाखत जुळवून आणली. अलीबंधूंचीं भाषणं अहिंसेच्या तत्त्वाशीं किती विरुद्ध आहेत हें रीडिंगसाहेबांनीं गांधींना दाखवून दिलं. गांधींना तें पटलं. आपल्या भाषणाबद्दल दिलगिरी प्रदर्शित करायचा त्यांनीं अलीबंधूंना सल्ला दिला. अलीबंधूंनीं दिलगिरी प्रदर्शित केली. सरकारनं त्यांच्यावर खटला भरायचा विचार सोडून दिला.

देशांतल्या अनेक लोकांना हा सर्व प्रकार अत्यंत अनुचित वाटला. राजाभाऊला गांधींच्या वागण्याचा विस्मय वाटून संताप आल्याची ही दुसरी वेळ.

मात्र एकंदर देशाचं राजकारण अशा प्रकारच्या चमत्कारिक आंदोलनांनीं मागंपुढें होत असतांना खुद्द पुण्यास १९२१ सालच्या मार्च एप्रिल महिन्यांत राजकारणाची लाट एकदम उसळविण्यासारख्या गोष्टी अचानकपणें घडून आल्या, आणि सत्याग्रहाबद्दल कॉंग्रेसच्या सहीशिक्क्याचा निर्णय अजून व्हायचा होता तोंच पुण्यास सत्याग्रहास प्रत्यक्ष सुरवातही झाली. मावळ तालुक्यांतल्या मुळशी पेठ्यांत टाटा कंपनीनं मोठं धरण बांधायचं ठरविलं, व सरकार आणि शेतकरी यांच्याबरोबर रीतसर करारमदार न करतां धरणाचा पाया खोदण्यास एकदम प्रारंभ केला. या धरणांत ५१ गांवं बुडणार होतीं आणि अकरा हजार लोक आपल्या जमिनीला आणि घरादाराला मुकणार होते! सत्याग्रह करून धरणाचं काम बंद पाडल्याखेरीज मुळशीच्या मावळ्यांवर आलेलं संकट दूर होणार नाहीं असं पुढाऱ्यांना वाटलं. त्यांनीं सारा महाराष्ट्र खडबडून जागा केला, पैसा, धान्य, स्वयंसेवक यांची भरती केली, या सत्याग्रहास कॉंग्रेसची मान्यता मिळविली आणि ता. १६ एप्रिल रोजीं रामनवमीस सत्याग्रहाची मोहीम सुरू केली.

राजाभाऊ पहिल्यापासून या चळवळींत होता. त्याला सहा महिन्यांची शिक्षा झाली.

*                  *                  *

शिक्षा भोगून परत आल्यावर राजाभाऊच्या कानांवर पहिली बातमी आली ती ही, कीं मुळशीच्या जमिनीसाठीं झालेली सत्याग्रहाची चळवळ जवळ जवळ वाया गेली होती. सावकार टाटा कंपनीला फितूर झाले होते; पुण्याच्या कांहीं पुढाऱ्यांनीं समेटाचा पाठपुरावा केला होता; याचा फायदा घेऊन कंपनीनंही जमिनीचा मोबदला देण्याच्या कामीं थैलीचं तोंड जरा सैल सोडलं होतं; आणि अशा प्रकारें मावळ्यांच्या जमिनी जवळ जवळ गेल्यासारख्या होत्या.

आशेला जागा येवढीच होती, कीं अजूनही धरणाचा बेत सोडून द्यायला टाटा कंपनीला भाग पाडणं अशक्य नव्हतं; आणि त्यासाठीं पुण्यांत जीं थोडीं कॉंग्रेसचीं धडाडीचीं कार्यकर्तीं माणसं होतीं त्यांचे सत्याग्रहाची दुसरी मोहीम

सुरू करण्याचे बेत चालू होतें. त्यांच्यांत सामील होण्यास राजाभाऊ अर्थातच तत्पर होता.

पण एक दिवस उमा त्याला म्हणाली,

"मी ऐकतें तें खरं का ?"

राजानं विचारलं,

"काय ऐकतेस ?"

"तुम्ही मुळशीला पुन्हां जाणार असं."

"हो."

"जें एकदां निष्फळ ठरलं तें पुन्हां करून पहाण्यांत काय अर्थ आहे ? तुम्हीच म्हणतां, कीं सावकार लोक कंपनीनं देऊं केलेल्या पैशाच्या मोहाला बळी पडले आहेत, अन् मावळ्यांच्या जमिनी जवळ जवळ गेल्यासारख्या आहेत. मग आतां पुन्हां सत्याग्रह केला तरी त्याचा काय उपयोग होणार ? पुन्हां तुरुंगात जाऊन तुम्ही काय मिळवणार ?"

"मनाचं समाधान ! उमा, लहानपणापासून आतांपर्यंत माझ्या हातून जें जें घडलं त्याचा कधीं कधीं एकांतांत जेव्हां मी विचार करतों तेव्हां माझ्या मनांत येतं, कीं अमुक मनुष्य अमक्या वेळेस अमक्या तऱ्हेनं कां वागतो ते इतरांना तर कळण्यासारखं नसतंच, पण त्याचं त्यालासुद्धां नीटसं कळत नाहीं. वंशपरंपरा अन् परिस्थिति याच्या नानाविध संस्कारांनी माणसाचा विवक्षित स्वभाव बनत जातो अन् त्या स्वभावानुसार त्या त्या वेळीं ती ती गोष्ट त्याच्या हातून घडत असते. वेळोवेळी अंतःकरणात उसळणाऱ्या भावनानुसार त्याचा प्रवास होत असतो. प्रत्येक मनुष्य अशा प्रकारचा प्रवासी आहे. अमक्याच मार्गानं तूं प्रवास कां केलास, किंवा करतोस असं एकानं दुसऱ्याला विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, तो प्रवास केल्यावांचून त्याला राहवत नाहीं यापलीकडे त्या प्रश्नाचं दुसरं कांहीं उत्तरच नाहीं. सत्याग्रहाचा प्रयोग मी एकदां करून पाहिला त्यामुळं त्या उपायावरची माझी श्रद्धा वाढली असं मुळींच नाहीं. उलट त्या श्रद्धेला थोडासा धक्काच बसलेला आहे. पण मुळशी

पेठ्यांतल्या गरीब शेतकऱ्यांना वांचविण्याचा दुसरा मार्ग मला दिसत नाहीं, अन् त्यामुळं हा जो एकच मार्ग मला दिसतो त्या मार्गानं गेल्यावांचून मला राहवत नाहीं. कळलं का तुला मी काय म्हणतो तें ?"

"कळलं ना! तुम्हांला कल्पनाही नसेल इतका मी तुमच्या प्रत्येक कृती-बद्दल मनाशीं विचार करीत असते. तेव्हां तुम्हांला मुळशीस पुन्हां गेल्यावांचून राहवणार नाही हें मला कळणं कांहीं अवघड नाहीं."

"मग मी जाऊं नये अशा अर्थानं मला कां विचारलंस मी मुळशीस पुन्हां जाणार कां म्हणून ?"

"त्याचं कारण फार निराळं आहे. अन् तें सांगण्याच्या बाबतींत मी आतां संकोच ठेवावा असंही मला वाटत नाहीं. सत्याग्रह करावा कीं न करावा हा तात्त्विक प्रश्न आहे, अन् त्या प्रश्नाच्या बाबतींत हवा तो विचार करायला तुम्ही स्वतंत्र आहांत. पण मुळशीस पुन्हां सत्याग्रह झाला तर त्यांत तुम्ही पडावं कीं नाहीं हा प्रश्न मात्र तुमचा एकट्याचा नाही. त्यांत माझा थोडासा तरी अधिकार आहे."

हें बोलतांना तिनं अगदी स्थिर दृष्टीनं राजाभाऊकडे पाहिलं.

तिच्या त्या दृष्टींत छछोर प्रेमाचा खेळ नव्हता किंवा लाघवी मोह घालण्याची खटपटही नव्हती. पण साध्या सहानुभूतीच्या ऋणानुबंधापेक्षां कसल्या तरी अधिक निकट आणि दृढ बंधनांची उत्सुकता त्या नजरेत हळूच व्यक्त झाली होती हे खास.

मनाशीं त्या दृष्टीचा अर्थ लावीत राजाभाऊ उमाकडे पहात राहिला.

ती त्याला पुढें म्हणाली,

"मागं एकदां त्रासून तुम्हीं मला काय विचारलं होतं आठवतं कां ? तुम्ही विचारलं होतं, 'माझ्यावर तुझा काय अधिकार आहे ?' अन् तुमच्या त्या प्रश्नाचं उत्तर मला देतां आलं नव्हतं. आजही तें मला देतां येणार नाहीं. पण माझा तुमच्यावर कांहीं तरी अधिकार आहे असं मला वाटतं—पूर्वी वाटत

असे त्यापेक्षां अधिक वाटतं त्याला इलाज नाहीं. अन् म्हणून मी तुमची प्रार्थना करतें, कीं तुम्ही पुन्हां सत्याग्रहाला जातां कामा नये. तुरुंगांत तुम्हांला ताप येत होता. औषधपाणी नव्हतं. जाडंभरडं अन्न खावं लागत होतं. तुम्ही सुटून परत आलांत त्या दिवशीं प्रथम तुम्हांला पाहिलं तेव्हां माझ्या छातींत धस्स झालं. देशसेवेचं महत्त्व मला कळत नाहीं असं तुम्हीहि म्हणणार नाहीं. आजपर्यंत मी तशी वागलें नाहीं. पण तुमची प्रकृति अगदीं क्षीण झालेली आहे. अशा स्थितीत तुम्हांला भलतं धाडस करूं देणार नाहीं मी......"

अशाच प्रकारें मग ती किती वेळ तरी बोलत राहिली. त्याच दिवशीं नव्हे, तर रोज. आणि तिच्या म्हणण्याला मान्यता देणं राजाभाऊला अखेर भाग पडलं. त्यानं मुळशीस पुन्हां जाण्याचा आपला बेत सोडून दिला आणि राष्ट्रीय विद्यापीठाच्या कामाव्यतिरिक्त बाकीचीं कामं कांहीं दिवस बंद ठेवलीं.

पण तो कालच असा होता कीं ज्याच्या रक्तांत देशसेवेची इच्छा खरो-खरच उसळत आहे अशा व्यक्तीला युद्धभूमीपासून दूर दीर्घकाल रहातांच येऊं नये.

देशांत क्षोभकारक घटना एकामागून एक घडत होत्या.

ता. १७ नोव्हेंबर रोजीं युवराजांचं हिंदुस्तानांत आगमन व्हायचं होतं. त्या आगमनाच्या वेळीं सर्व देशभर कडकडीत हरताळ पाळला जावा अशी कॉंग्रेसची आज्ञा जाहीर झाली होती. मद्यपानबंदीचा प्रश्न कॉंग्रेसनं अधिक स्पष्ट पुरस्कार करून हातीं घेतला होता. दारूच्या गुत्त्यांपुढें 'पिकेटिंग' करायला लोकांनीं प्रारंभ केला होता. धारवाड, मातिया वगैरे ठिकाणीं पिकेटिंगच्या बाबतींत धरपकड झाली होती, व सरकारी अधिकाऱ्यांचा छळ लोकांना सोसावा लागत होता. करबंदीची मोठी चळवळ बार्डोलीस सुरू करण्याची गांधींची तयारी चालली होती. मद्रास इलाख्यांतील गुंतूर जिल्ह्यांत शंभर खेड्यांच्या एका गटानंदेखील करबंदीच्या चळवळीची तयारी जय्यत केली होती.

देशांतल्या या गडगडाटांचे प्रतिध्वनि पुणें शहरांतही उठल्यावांचून

राहिले नाहींत. आणि ती गर्जना ऐकतांच मुळशीच्या सत्याग्रहापासून दूर राहिलेल्या राजाभाऊनंच केवळ नव्हे तर जिनं त्याला मुळशीपासून दूर ठेवलं त्या उमानंही पाऊल पुढें टाकलं.

युवराजांच्या आगमनप्रसंगीं पुणें शहरांत अगदीं नमुनेदार हरताळ पडावा अशा मोहिमेचं धुरीणत्व राजाभाऊनं आपल्याकडे घेतलं; आणि उमा पिकेटिंगच्या चळवळींत सामील झाली.

ता. १६ नोव्हेंबर रोजीं उमा आपल्या नेमून दिलेल्या जागच्या दारू-दुकानावर पिकेटिंग करावयास रोजच्याप्रमाणें संध्याकाळीं सहा वाजतां हजर झाली. हें दुकान विलायती दारूचं होतं. तिथें फुटकळ दारू पिण्यासाठीं कुणी येत नसे. बाटल्या नेण्यासाठीं लोक येत. पिकेटिंग सुरू झाल्यापासून लोक स्वत: क्वचितच येत. ते आपल्या गडीमाणसांना पाठवीत. दुकानापुढें एक चांगली प्रतिष्ठित बाई 'बाबांनो, दारू विकत घेऊं नका' अशी प्रार्थना करीत हात जोडून उभी आहे असं पाहून गडीमाणसंदेखील तिथें यायला आतां शरमूं लागली होतीं. त्यामुळें उमाचा तिथला बहुतेक वेळ स्वस्थपणें टकळीवर सूत काढण्यांतच जात असे.

आजही रोजच्याप्रमाणें तिथें गेल्यावर ती सूत काढीत बसली.

दिवे लागणीच्या सुमारास एक टांगा दुकानासमोर येऊन उभा राहिला, व त्यांतून दोन गृहस्थ खालीं उतरले. नुसता टांगा उभा राहिला म्हणून उमाला वर बघण्याचं काहींच कारण नव्हतं. ती आपली टकळी फिरवीत राहिली होती. परंतु टांग्यांतून उतरलेले दोघे गृहस्थ जेव्हां तिच्यापुढून दुकानांत शिरणार असं नजरेच्या कोपऱ्यांतून तिला दिसलं तेव्हां तिनं चटकन् टकळी दूर ठेवली, पाऊल पुढें टाकलं आणि त्या गृहस्थांकडे पाहून—पण तसं पहातांच ती विलक्षण चमकली !—

कारण, त्या दोघांपैकीं एकजण दुसरा कुणी नसून तिचा पति महेश्वर होता !

उमा क्षणमात्र अतिशय दचकली खरी, पण लगेच तिनं आपलं धैर्यबल एकत्र केलं. जुगाराच्या अड्ड्यावर पकडल्या गेलेल्या महेश्वराची त्यानंतर आतां-

पर्यंत कांहींच बातमी तिला कळली नव्हती; व ती आणि राजाभाऊ आतांपर्यंत अशाच समजुतींत होतीं, कीं त्याला शिक्षा होऊन तो तुरुंगात असावा. पण त्याला शिक्षा तरी झाली नसावी, किंवा झाली असली तरी ती संपून आतां तो सुटला असावा हें त्याला पहातांक्षणींच उमाला उघड दिसून आलं, व ती चपापली. पण तें क्षणभरच. दुसऱ्याच क्षणीं तिच्या मनांत आलं, असं चपापून गोंधळून चालायचं नाहीं. तिच्यांत व महेश्वरांत पतिपत्नींचं सामान्य नातं नव्हतं, बोलून चालून तिचा तो पूर्वजन्मींचा वैरी होता हें तर झालंच; पण शिवाय या क्षणीं तो एक दारुडा म्हणून दुकानांत शिरत होता, व एक देश-सेविका म्हणून ती त्या स्थळीं उभी होती. आपली सारी निर्भयता एकवटून उमानं हात जोडले व आपल्या पतीकडे आणि त्याच्या दोस्ताकडे पाहून म्हटलं,

"महाराज, कृपा करा, दुकानांत शिरूं नका. दारूं पिणं हराम आहे."

महेश्वरानं तिच्याकडे रोखून पाहिलं.

त्याची पत्नी उमाच नव्हे कां ही? ...हिच्या दृष्टींत नात्याची ओळख यत्किंचित्सुद्धां नसावी? पण हीच ती यांत कसला संशय? खास उमाच ही. जिच्या देखत राजाभाऊनं त्याच्या कानशिलांत मारली होती ती उमाच ही... दारू पिणं हराम आहे म्हणून सांगते आहे!...

हराम!

तिच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दांपैकीं तोच एक शब्द त्याच्या कानांत विशेषेंकरून शिरला.

तो एकदम विकट हास्य करून म्हणाला,

"हराम! हरामखोरीच्या गोष्टी तूं मला सांगतेस काय?"

आपल्या मित्राकडे बघून तो पुढें म्हणाला,

"ही कोण तुला माहीत आहे कां? माझी बायको. माझ्या घरांतून पळून जाऊन एका गोऱ्या गोमट्या गुलजाराबरोबर राहिली आहे. ही म्हणे देशसेविका! हाः हाः हाः!"

जणूं त्याच्या तोंडचा एक शब्दही आपण ऐकला नाहीं अशा निर्विकार मुद्रेनं उमा पुन्हां प्रार्थना करूं लागली,

" महाराज, कृपा करा—"

महेश्वर संतापून ओरडला,

" चल, दूर हो. "

तरी उमा हलली नाहीं. आणि ती पुन्हां म्हणाली,

" दारू पिणं हराम आहे. "

महेश्वर ओरडला,

" वाट सोड. हो दूर. "

" मला दूर होतां येत नाहीं. कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणं मी आपली विनवणी करणार, कीं दारू पिणं—"

हातांतली काठी उगारून महेश्वर म्हणाला,

" आतां दूर झाली नाहीस तर मारीन."

तरी निश्चल उभं राहून आणि हात जोडून उमानं पुन्हां म्हटलं,

" महाराज, कृपा करा, दारू— "

त्याच क्षणीं तिच्या मस्तकांत जबरदस्त प्रहार झाला आणि ती कोलमडून खालीं जमिनीवर पडली.

* * *

त्याच वेळीं राजाभाऊचं जाहीर सभेंतलं भाषण आटपलं होतं. तो घरीं निघाला तेव्हां प्रत्येकजण त्याला म्हणूं लागला,

" आज तुम्ही बोलतांना भान ठेवलं नाहींत. आम्हांला भीति वाटते. "

राजाभाऊनं विचारलं, " कसली ? "

" आजच्या भाषणाबद्दल सरकार तुमच्यावर खटला भरील असा फार संभव वाटतो. उद्या हरताळाच्या निमित्तानं सरकार तर पकडापकड करायला

टपलेलंच आहे. अन् त्यांत आणखी उद्यां तुम्ही परदेशी कापडाची जाहीर होळी करायचं ठरवलं आहे."

"हो. उद्यां युवराज हिंदुस्तानांत येत आहेत. हिंदुस्तानांत किती असंतोष पसरला आहे हें त्याना जितक्या प्रकारांनीं अन् जितक्या तीव्रतेनं आपल्याला दाखवितां येईल तितक्या तऱ्हेनं आपण दाखवलंच पाहिजे. पकडलं जाण्याबद्दल म्हणाल, तर तुमची आमची सगळ्यांचीच त्या गोष्टीला मध्यां तयारी आहे, नाहीं कां ?"

तो आपल्या खोलीवर परत आला आणि पांच सहा मिनिटेंही स्वस्थ पडला नसेल तोंच एक अनोळखी इसम घाबऱ्या घाबऱ्या त्याच्याकडे येऊन सांगूं लागला,

"उमाबाईंना पिकेटिंगच्या ठिकाणीं कुणी तरी मारलं आहे."

"काय सांगतां ? खरंच ? चला पाहूं."

असं म्हणून राजाभाऊ एकदम उठला.

पण तो गृहस्थ म्हणाला,

"तुम्ही जायचं कारण नाहीं. आम्ही त्यांना टांग्यांत घालून इकडे घेऊन आलों आहोंत."

उमाला प्रत्यक्ष पहातांच राजाभाऊच्या अंत:करणाचा थरकांप झाला. तिला कोणी मारलं होतं तें ज्या मंडळींनीं तिला आणलं त्यांना माहीत नव्हतं. पण ज्या कोणी तिला मारलं होतं त्यानं निर्दय प्रहार केला होता यांत शंका नव्हती. तिची जखम लोकांनीं बांधली होती पण तिला पुन:पुन्हां भोंवळ येत होती, व व्यथेच्या स्वराव्यतिरिक्त दुसरा कसलाच शब्द तिच्या तोंडून निघत नव्हता.

बरीच रात्र झाली तरी राजाभाऊ उमाच्या अंथरुणाजवळ बसून राहिला. अजून एकदांहि तिनं नीट डोळे उघडून त्याला ओळखल्याप्रमाणे त्याच्याकडे पाहिलं नव्हतं. मधूनच ती दृष्टि किलकिली करी, तिला पाणी पाहिजे असं

आपल्या मतानं ठरवून राजाभाऊ तिच्या तोंडांत पाणी घाली, आणि तो पाण्याचा घोट गिळल्यावर ती पुन्हां डोळे मिटून बराच वेळ पडत असे.

अखेर एकदां तिनं आपले डोळे बरेच उघडले व स्थिर नजरेनं राजाभाऊकडे पाहिलं. आपला पति आपल्याला अकस्मात् कसा दिसला व त्याच्याकडून आपल्याला मार कसा बसला हें सांगावंसं तिला फार फार वाटलं. 'आतां तुमच्या रक्षणाची मला फार फार गरज आहे' असे शब्द उच्चारण्यासाठीं तिच्या जिवाची आंतल्या आंत धडपड झाली. पण त्या शब्दांचा उच्चार तिच्या जिभेवाटे होऊं शकला नाहीं. मग तिनं फक्त राजाभाऊचं मनगट आपल्या डाव्या हातानं घट्ट धरलं, आणि 'आई ग' असा व्यथित स्वर काढून डोळे मिटले.

पुन्हां कांहीं वेळानं जेव्हां डोळे उघडून तिनं त्याच्याकडे पाहिलं, तेव्हां महेश्वर भेटल्याची हकीगत सांगण्यासाठीं तिच्या ओठांची हालचाल झाली. तिचा शब्द उमटला नाहीं. पण तिच्या दृष्टीतला दीनपणा पाहून राजाभाऊनं तिला विचारलं,

"काय म्हणतेस?"

'कांहीं नाहीं' अशा अर्थी मान हलवून उमानं फक्त आपला हात त्याच्या हातीं दिला.

राजाभाऊनं विचारलं,

"उमा, मी तुझ्याजवळ आहे. मला ओळखलंस ना?"

"हो."

येवढंच बोलून ती गप्प झाली आणि आवंढा गिळल्याप्रमाणें तिच्या कंठाची हालचाल होऊन तिचे डोळे आंसवांनीं भरून आले.

राजाभाऊच्या मनांत आलं, कोण हिची ही अनुकंपनीय स्थिति! आणि ज्या वेळीं तिची अशी स्थिति व्हावी व तिच्याजवळ अहोरात्र बसून तिचे क्लेश दूर करण्यासाठीं आपल्या जिवाची ओढ असावी त्याच वेळीं चोविस

तासांच्या अवधींत आपण पकडले जाणार व खटल्यांत होईल ती शिक्षा भोगायसाठीं हिच्यापासून दूर होणार हें स्पष्ट दिसत असावं हें कोण विचित्र दुर्दैव !......

अनाथ, असहाय उमाविषयींच्या अनुकंपेनं त्याचं हृदय पूर्वी कधीं नव्हे असं भरून आलं. हृदयाला हृदय भिडवून रक्षणाचं अन् प्रेमाचं मूक आश्वासन तिला देण्याची अविवेकी अधीरता त्याला अनावर झाली. तिच्यांत व आपल्यांत कोणत्याहि तऱ्हेचं यत्किंचित्सुद्धां अंतर असूं नये अशा तीव्र इच्छेचे रोमांच त्याच्या शरीरावर उभे राहिले. बुद्धीनं व अंतःकरणानं अत्यंत सुंदर असलेल्या उमाच्या करुणास्पद अवस्थेंत तिचं साधं शरीरहि त्याला त्या क्षणीं सौंदर्यसंपन्न, आकर्षक आणि मोहक वाटलं. तिचे अश्रू पुसण्यासाठीं त्यानं झटकन् वांकून आपले ओंठ तिच्या नेत्रांवर टेकले......

त्या मोहाच्या क्षणांतही त्यानं तिच्या शरीराचं व स्वत.च्या अंतःकरणाचं पावित्र्य कायम ठेवलं !

त्यानं उमाच्या नेत्रांचं चुंबन घेतलं त्यावेळीं सहजिकपणेंच त्याचा कंठ तिच्या मुखावर टेकला गेला.

उमाला त्याच्या देहाचा तो स्पर्श जितका अनपेक्षित, आणि जितका सुखकारक, तितकाच दाहक आणि भयकारक वाटला. तिच्या देहाला तो स्पर्श हवा होता. त्या स्पर्शाच्या अतृप्त इच्छेची व्याकुलता तिनं रात्रंदिवस सहन केली होती. अनिर्बंध एकत्वाचा उन्माद अनुभवास आणून देणाऱ्या ज्या स्पर्शाच्या वासना तिनं आजपर्यंत फक्त निद्रावस्थेंतच स्वैर सोडल्या होत्या, त्या स्पर्शाचा बिंदुमात्र तुषार जागृतावस्थेंत तिच्या तहानेल्या अधरावर प्रत्यक्ष पडला होता. तिला अनिर्वचनीय सुखसंवेदना झाली. जें घडत आहे तें योग्य नव्हे अशा विवेकाचा चटकाहि तिच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी बसला. आपलं हृदय राजाभाऊला आपण अर्पण केलं आहे त्याचप्रमाणें आपलं शरीरही त्याच्या स्वाधीन करावं ही इच्छा दीर्घकाल तिनं आपल्या मनांतल्या मनांत मारून टाकली होती. राजाभाऊच्या पदकमलांवर आपण आपलं प्रणयपुष्प ठेवलं तर त्यांत कोणत्या सदाचाराचा, धर्माचा अगर नीतीचा विघात होतो

याबद्दल तिनं पुष्कळदां विचार करून पाहिला होता, आणि त्याचं उत्तर तिच्या मनाला कधीं सांपडलं नव्हतं. मात्र दर वेळेस ती आपल्या मनाशीं म्हणाली होती, की राजाभाऊनं माझ्या प्रेमाचा स्वीकार केल्यास मला स्वतःला जरी मग इतर कुठल्याही सुखदुःखाची पर्वा वाटूं नये इतकं सुख झालं तरी ती गोष्ट राजाभाऊला सर्वस्वी सुखाची अन् कल्याणाची होणार नाहीं येवढाच कदाचित् या गोष्टीतल्या अधर्माचा आणि पापाचा अर्थ असेल; आणि तो अर्थ बरोबर आहे. अशा विवेकानं तिनं आजपर्यंत आपल्या वासनांचं संयमन केलं होतं. इतकंच नव्हे, तर तिच्या मनाला नेहमीं अशी भीति वाटली होती, कीं जर एखाद्या क्षणीं आपण मोहवश झालों आणि दुर्दैवानं राजाभाऊचाही जर संयम सुटला, तर त्याच्या जीवितसुखासाठीं आपल्याला त्याच्यापासून त्यानंतर कायमचं दूर व्हावं लागेल. हीच भीति आतां या क्षणीं तिच्या मनांत उत्पन्न झाली. त्या भीतीनं तिला कर्कश इशारा दिला, कीं जें घडत आहे त्यांत दुःखाचं बीज आहे! तिच्या विवेकानंही ओरडून तिला सांगितलं, कीं आजपर्यंत जागृतपणानं जी शुद्धता आणि पुण्याई तूं सांठवलीस ती सारी लयाला जात आहे, सावध रहा ! पण भयाचा आणि विवेकाचा आवाज त्या क्षणीं तिला ऐकूं येणं कठीण होतं. राजाभाऊचे ओठ तिच्या नेत्रांवर होते; आणि तिचे ओंठ त्याच्या कंठभागाला लागलेले होते. तिच्या पंचेंद्रियांच्या सर्व शक्तींची एकाग्रता त्या स्पर्शसुखावर झाली होती. तिनं एकदम निश्चय केला, कीं व्हायचं असेल तें होवो, याक्षणीं राजाभाऊला मी दृढ आलिंगनांत घट्ट हृदयाशीं धरणार, अन् त्याला सांगणार, कीं तुम्ही माझ्या मनाचे, अंतःकरणाचे आणि देहाचेहि स्वामी आहात !...

पण ते शब्द उच्चारण्याची शक्ति तिच्या जिव्हेंत त्या वेळीं नव्हती, आणि तिच्या बाहूंतहि आलिंगनाचं सामर्थ्य नव्हतं. तिचा संकल्प मनांतल्या मनांतच राहिला. मनाच्या दुर्बलत्वाला बळी पडून जें—सदाचाराचं कीं अनाचाराचं कुणास ठाऊक ?—कृत्य ती करणार होती तें त्या क्षणींच्या तिच्या शारीरिक दुर्बलत्वामुळें टळलं !...

*   *   *

दुसऱ्या दिवशीं रे मार्केटच्या पटांगणांत परदेशी कापडाची जंगी सार्व-जनिक होळी पेटवून भाषण करीत असतांना राजाभाऊ पकडला गेला.

त्याच्यावर खटला झाला.

त्याला शिक्षा झाली.

उमाचा पति महेश्वर मोकळा आहे हें त्याला कळलंच नाहीं. तुरुंगाकडे जातांना त्यानं आपल्या कारकुनाला फक्त येवढंच सांगितलं, " पंत, उमाच्या शुश्रुषेंत उणीव राहूं देऊं नका. तिला म्हणावं, मी तुरुंगांतून परत येईपर्यंत धीरानं दिवस काढ. "

———

[ १९ ]

राजाभाऊ तुरुंगांतून सुटला त्या दिवशीं बंदिशाळेबाहेर पाऊल टाकतांच त्यानं सभोंवार दृष्टि टाकली तों आभाळ ढगांनीं खचून भरलेलं होतं. सूर्यबिंब कुठेंही दिसत नव्हतं. जिकडे तिकडे अंधाराची छाया पसरली होती. दिवसाची कोणती घटका चालू आहे, इतकंच नव्हे तर दिवस आहे कीं रात्र आहे, आणि कालचक्र चालू आहे कीं थांबलं आहे हेंही कळण्यासारखं नव्हतं.

आणि जी अवस्था हवेची तीच देशाच्या राजकारणाचीहि झाली होती.

त्याच्या स्वतःच्या शिक्षेनंतर देशांत ज्या घडामोडी झाल्या होत्या त्या बंदिशाळेच्या कोठडींतही त्याच्या कानीं ओझरत्या आल्या होत्या. अहमदाबादची कॉंग्रेस झाली होती. गांधी कॉंग्रेसचे सर्वाधिकारी नेमले गेले होते. बार्डोली आणि गुंतूर या ठिकाणीं सामुदायिक करबंदीच्या चळवळीची

तिला काय वाटलं असेल, पुन्हां भेट झाल्यानंतर ती कशी वागेल, आणि त्यानं कसं वागलं पाहिजे इत्यादि प्रश्न त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळत राहिले होते. उमाच्या नेत्रांचं चुंबन घेतांना त्याचं मन विचलित झालं होतं यांत संशयच नव्हता. आतां पुन्हां उमा भेटल्यावर पूर्वीच्या वृत्तीनं तिच्याशीं वागणं त्याला अशक्य होतं. केवळ तिच्या मनाची आणि अंतःकरणाची थोरवी ओळखून कौतुक आणि साहाय्य करणाराची भूमिका आतां त्याच्याकडून वठविली जाणं कठीण होतं. तिच्या शरिरावर त्याची वासना जडली होती, आणि ती बंदिवासामुळं प्राप्त झालेल्या तीन वर्षांच्या सक्तीच्या विरहानं नष्ट होण्याऐवजीं वाढतच गेली होती. बंदिवास भोगणाऱ्या व्यक्तीच्या वाट्याला जो कल्पनातीत एकलकोंडेपणा येतो त्याचे त्याच्या चित्तवृत्तीवर मोठे विचित्र परिणाम होतात. सामान्य मानसशास्त्राच्या नियमानुसार त्या परिणामांची गणना कुणी करूं म्हणेल तर तें व्यर्थ होय. राजाभाऊनं असह्य एकांतांचीं तीन वर्षं काढलीं होतीं, आणि त्या तीन वर्षांच्या अवधींत उमाविषयींच्या त्याच्या वृत्तीला कांहीं एक विलक्षणच वळण मिळालं होतं. ज्या उमाशीं शुद्ध सहानुभूतीच्या नात्यानं तो कित्येक वर्षं वागला होता, आणि जिच्याशीं शारीरिक रीतीनं सम्मीलित होण्याचा मोह आपल्याला कधींही होणार नाहीं अशा खात्रीचा अभिमान त्यानं सतत मनाशीं ठेवला होता, ती उमा त्या रात्रींच्या त्या क्षणीं आपल्याला एकाएकी चुंबनीय वाटली याचा नंतरच्या दिवसांत त्याला विस्मय अगर पश्चात्ताप कधीं झाला नव्हता. उलट त्या चुंबनप्रसंगाची आठवण, मनश्चक्षूंसमोर तिची पुनःपुन्हां उजळणी करून, त्यानं जतन केली होती. बंदिशाळेंतल्या मृतवत् अवस्थेंत ती आठवण हीच काय ती त्याच्या जिवाची धुगधुगी होती. ती आठवण करून उमाचं प्रत्यक्ष चुंबन घेतांना त्यानं तोंडावाटे काढल्या नव्हत्या अशा किती तरी गोष्टी कितीदां तरी तो उमाशीं बोलला होता, त्याच्या शब्दांना जीं प्रत्युत्तरं तिनं द्यावींत अशी त्याची इच्छा होती तीं तिच्या तोंडून त्यानं कल्पनेनं कितीदां तरी ऐकलीं होतीं; प्रत्यक्ष चुंबनाच्या वेळीं जो संयम त्यानं ठेवला होता तो नंतरच्या आठवणींत त्यानं पार झुगारून दिला होता. तुरुंगाच्या कोठडींत रात्रीं पडल्या पडल्या कधीं उंच गवाक्षांतून दिसणाऱ्या आभाळाच्या टीचभर जागेंत चमचमणाऱ्या चांदण्याकडे तो पहात राहिला होता, कधीं बाहेर जिकडे तिकडे

घनदाट अंधःकार पसरला आहे ही जाणीव त्याला असह्य झाली होती, कधीं पहारेकऱ्याच्या पावलाचे लयबद्ध प्रतिध्वनि त्याला कंटाळवाणे झाले होते, कधीं तुरुंगाच्या पहाऱ्यावर वाजविण्यांत येणारे साऱ्या तासांचे ठोके त्यानं ओळीनं ऐकले होते, कधीं बाहेरच्या मोकळ्या सृष्टींत विहार करायला आलेला ऋतुराज आपले सारे मृदुसुगंध घेऊन आपल्या कोठडीपर्यंत आला आहे असं त्याला वाटलं होतं, कधीं ऐन बरसातींतल्या गडगडाटांनीं, मुसळधारांनीं अन् झंझा-वातांनीं बंदिशाळेच्या भक्कम भिंतींना धक्के दिलेले त्यानं ऐकले होते ! पण बाह्य-सृष्टीचं स्थितिचक्र कसंहि फिरलं तरी त्याच्या उमाबद्दलच्या आठवणींत बदल झाला नव्हता.

आणि त्यानं अखेर ठरवलं होतं, कीं तुरुंगातून सुटून पुण्यास परत जातांच उमाजवळ आपली इच्छा स्पष्टपणानं बोलून दाखवायची. ही गोष्ट करण्यांत आपल्या हातून पाप घडेल कीं पुण्य घडेल याबद्दल विचार करायचं त्यानं केव्हांच सोडून दिलं होतं; आणि चमत्कार असा, कीं आपल्या अनपेक्षित बोलण्याचा उमाच्या मनावर काय परिणाम होईल अन् ती काय प्रत्युत्तर करील याबद्दलच्या प्रतिकूल कल्पनांनाही त्यानं केव्हांच मनांतून बाहेर घालवलं होतं. किंबहुना तिची आपली पुन्हां भेट व्हावी व तिला आपण सर्वस्वी आपलीशी करावी हा ध्यास गेलीं तीन वर्षे सतत त्याच्या मनांत वाढत गेला होता.

पुण्याच्या स्टेशनवर उतरल्यावर त्याच्या मनांत आलं, आपण आपल्या वाड्यांत प्रवेश करूं तो मोठा झालेला आनंद कदाचित् आंगणांतच खेळत असेल. आपल्याला पहातांच तो आपल्याकडे धांवत येईल. त्याला आपण हृदयाशीं घट्ट धरूं व त्याला विचारूं, ‘ आनंद, आई कुठें आहे रे ? ’ मग तो घाईघाईनं जिन्यावरून जाऊं लागेल व आपल्याला म्हणेल, ‘ आई वर आहे, चला. ’ किंवा कदाचित् वरच्या गच्चीवर काम करत असलेली उमा आप-ल्याला आधींच दृष्टी पडेल व तिच्याकडे पाहून हंसून आपण लगबगीनं वर जाऊं.......

पण तो घरीं पोंचला तेव्हां आंगणांत खेळत असलेला आनंदही त्याला दिसला नाहीं, किंवा गच्चीवर काम करीत असलेली उमाही त्याच्या दृष्टीस पडली नाहीं !

त्यानं वर जाऊन पाहिलं तों ज्या जागेंत उमा रहात असे त्या जागेंत दुसरींच कुणी अनोळखी माणसं त्याला दिसली.

या प्रकाराचा कांहीं अर्थच त्याला कळेना.

त्याचा कारकून त्याला भेटला तेव्हां त्यानं अधीरतेनं विचारलं,

" पंत, उमा कुठें आहे ? "

" खोलींत चला. सांगतों तुम्हांला. "

या उत्तरानं राजाभाऊ विलक्षण चकित झाला, आणि नंतर खोलींत गेल्यावर त्याच्या कारकुनानं जी हकीगत त्याला सांगितली, ती ऐकून तर त्याला आश्चर्याचा अन् निराशेचा इतका मोठा धक्का बसला, कीं आपल्या भावना चेहऱ्यावर न दाखविणं त्याला कठीण झालं.

कारकुनानं सांगितलेली हकीगत अशी होती, कीं राजाभाऊच्या शिक्षेला पंधरावीस दिवस झाल्यानंतर एके दिवशीं महेश्वर अकस्मात् आला होता, व पूर्वीप्रमाणेंच त्यानं आपल्याकडे परत चलण्याबद्दल उमाला धाक घातला होता. कारकुनानं त्याला परत जाण्याबद्दल व पुन्हां कधीं न येण्याबद्दल निक्षून बजावलं होतं, व उमालाही धीर दिला होता, कीं राजाभाऊ नसले तरी तुमच्या रक्षणासाठीं काय वाटेल तें करीन, तुम्ही महेश्वराच्या बोलण्यानं घाबरून जायचं कारण नाहीं. पण उमाच आपण होऊन पतिगृही जाण्यास तयार झाली होती व त्याप्रमाणें ती गेलीहि होती. जाताना तिनं एक पत्र लिहून कारकुनाजवळ ठेवलं होतं व ' राजाभाऊ तुरुंगांत असेपर्यंत मी गेल्याची बातमी त्यांना कळवूं नका, ते परत येतील तेव्हां त्यांना हें पत्र द्या ' असं आपल्या गळ्याची शपथ घालून बजावलं होतं.

तें पत्र कारकुनाच्या हातून राजाभाऊनं घेतलं व म्हटलं,

" ठीक आहे. मला आतां एकटं राहूं द्या. तुम्ही जा. "

कारकून गेल्यावर तें जवळ जवळ तीन वर्षे बंद राहिलेलं पत्र राजाभाऊनं उघडलं आणि वाचलं:—

**" तुम्ही तुरुंगांतून सुटून परत याल तेव्हां मी तुरुंगांत गेलेली असेन ! म्हणजे माझ्या पतीकडे ! तुमची माझी भेट होणार नाहीं.**

कदाचित् पुढें कधींच होणार नाहीं. आपण दोघांनीं हातांत हात घालून या जीवितमार्गावर कांहीं काल प्रवास केला त्याच्या मधुर आठवणी तेवढया आपल्या दोघांच्याही मनांत शिल्लक रहातील. तुम्ही प्रथम माझ्या दृष्टीस पडलांत तेव्हांपासूनच माझं प्रेम तुमच्यावर जडलं होतं. मी अशा विचित्र दुर्दैवांत पडलेली स्त्री आहे, कीं कुणा पुरुषावर प्रेम करणं हें माझ्यापुरतं तर पाप आहेच, पण त्या पुरुषाच्या सुखाचा नाश करणारी ती एक भयंकर ज्वाला आहे. पण माझं प्रेम मनांतल्या मनांत गुप्त ठेवण्याचा मीं निश्चय केला होता व तो मी पाळला. माझं शरीर मीं माझ्या ताब्यांत ठेवलं होतं. पण परवां रात्रीं ज्या क्षणी तुम्ही माझं चुंबन घेतलंत त्या क्षणानं माझी अवस्था पार बदलली आहे. आतां तुम्ही पुन्हां भेटलांत कीं माझं प्रेम मनांतल्या मनांत राहणं अन् शरीर ताब्यांत राहणं शक्य नाहीं. माझ्याकडून तोल सुटला अन् तुम्हांला मीं हवीशी वाटत नसलें तर तुम्ही साहजिकपणेंच माझा तिरस्कार कराल. हवीशी वाटत असलें आणि माझा स्वीकार तुम्ही केलात तरी सुखाच्या शंभरपटीनं दुःखच तुमच्या वांट्याला अधिक येईल. तेव्हां आता उत्तम मार्ग म्हणजे तुम्ही व मी पुन्हा न भेटणं. माझे पति मला न्यायसाठीं पुन्हां आले आहेत. तुमच्यापासून दूर व्हायचं म्हणजे कुठें जावं या विचारांत मी असतांनाच ते आले हा मजवर त्यांचा जन्मांत पहिलाच केवढा मोठा उपकार झाला ! ज्या स्त्रियांच्या लग्नाच्या गांठी म्हणजे दुःखभोगाच्या गांठी होऊनहि त्या सुटण्याचा मात्र एकहि मार्ग समाजानं मोकळा ठेवलेला नाही, त्या माझ्यासारख्या स्त्रिया म्हणजे जिवंत समाधींत गाडलेले अभागी जीव होत. आम्ही जगाकडे पहातां कामा नये, भोंवतालच्या जगाच्या व्यवहाराकडे आसक्तीनं दृष्टि टाकतां कामा नये, पुरुषाच्या प्रेमाची तृष्णा ठेवतां कामा नये ! आम्हीं आमच्या थडग्यांतच मेलं पाहिजे ! योगायोगानं कांहीं काल माझ्या थडग्यांतून बाहेर पाऊल टाकण्याची संधि मला मिळाली आणि तुमचा प्रेमळ सहवास घडला. पण माझ्या मनांतल्या प्रेमाची आतां मला विलक्षण भीति वाटते. माझ्या संसर्गानं तुमच्या आयुष्याचं सुंदर चित्र बिघडविण्यापेक्षां माझ्या थडग्यांत मी परत जाणं हेंच माझं कर्तव्य आहे असं मला वाटतं. मी कुठें असेन

तें काय सांगूं ? कबरस्तान हाच माझा पत्ता ! माझा शोध करण्याच्या नादीं लागूं नका. माझी आठवण ठेवा म्हणजे झालं. येतें मी. ईश्वर खरोखरच कुठें असेल तर तो तुम्हांला सुखांत ठेवो.

तुमची
**उमा.**"

राजाभाऊनं पत्राच्या अखेरच्या त्या सहीकडे निरखून पाहिलं. ते दोन लाडके मधुर शब्द त्याची केवढी वंचना करीत होते ! त्याच्या हृदयावर केवढा तरी आघात करीत होते !

'तुमची उमा !'

ज्या क्षणीं त्याच्या कल्याणासाठीं आपल्या मनांतल्या प्रीतिभावाचा होम करून ती त्याला कायमची सोडून गेली त्या क्षणीं 'तुमची' असा शब्द लिहिण्यांत कोणता अर्थ उरला होता ?

'तुमची उमा'!

हे शब्द खरे करण्यासाठीं तीन वर्षांचा दीर्घकाल त्यानं तिच्या चिंतनांत घालविला होता, आणि बंदिवासांतून मुक्त होतांच तो तिच्याकडे धांव घेऊन आला होता, तो केवळ ती त्याला कायमची सोडून गेली हें दुःखकारक सत्य समजण्यासाठींच ?

आतां 'तुमची उमा' या शब्दांत शल्याखेरीज दुसरं काय उरलं होतं ?......

माणसाला निराशेचा आणि दुःखाचा अकल्पित तडाखा बसला, कीं त्याचं मन पुढच्या विचारांकडे आधीं धांव घेत नाहीं. भूतकालांत तशा प्रकारचे जे आघात त्याला सहन करावे लागले असतील ते त्याला आधीं आठवतात—

किशोरावस्थेंत असतांना राजाभाऊनं खांसाहेब आणि त्यांची मुलगी जुलिया यांना अत्यंत प्रिय मानून त्यांचा आपला जन्माचा सहवास घडेल, व आपण गायनविद्येची अविश्रांत सेवा करूं, कीर्ति मिळवूं असं स्वप्न मनापुढें उभं केलं होतं; त्या स्वप्नाचा एकाएकी भंग झाला होता, आणि खांसाहेब व जुलिया यांची आणि त्याची कायमची ताटातूट झाली होती ! नंतर तारुण्यमदाच्या

प्रारंभीं, देहसौंदर्यानं असामान्य असलेल्या चंचलेच्या ठिकाणचं बुद्धिहीनत्वाचं आणि भावनाशून्यतेचं वैगुण्य दूर करून तिची प्रीति उपभोगण्याचं सुखस्वप्न त्यानं मनाशीं रचलं होतं; तेही अकस्मात् भग्न झालं होतं आणि चंचला त्याच्या जीवनांतून एकदम नाहींशी झाली होती! आणि आतां पुन्हां उमाविषयींचं जें स्वप्न तीन वर्षांच्या बंदिवासांत त्यानं मनापुढें सतत ठेवलं होतं त्याचाहि चुराडा होऊन उमाही कायमची निघून गेली होती! या मानवी जीविताचा किनारा स्त्रीपुरुषांच्या भग्न स्वप्नांच्या वालुकाकणांनींच व्यापलेला आहे काय? जीविताच्या या विचित्र प्रवासांत आकांक्षांचं अल्पकालिक सुख व त्या मागोमाग येणारं त्यांचं वैफल्य, आणि प्रियजनांचा अल्पकालिक सहवास व त्यांची कायमची ताटातूट हेच महत्त्वाचे मुक्काम आहेत काय?...



# [२०]

राजाभाऊ तुरुंगांतून सुटून आला त्या वेळीं त्याला उमा भेटली असती व तिच्याविषयीं त्यानं मनांत धरलेल्या इच्छा पूर्ण करतां आल्या असत्या तर त्याचे परिणाम काय काय झाले असते हें सांगणं कठीण आहे.

पण तिची त्याची भेट झाली नाहीं. या गोष्टीचा त्याच्यावर जो परिणाम झाला तो कांहींसा चमत्कारिक होता येवढं खास. राजाभाऊनं त्याबद्दल विचार केला असता तर त्यालासुद्धां त्याचा चमत्कार वाटला असता; पण तसा विचार करायची राजाभाऊची मुळीच इच्छा नव्हती. किंबहुना, त्याला तशी इच्छा उरली नाहीं, व जें बरं वाटेल तें अन् जितका वेळ बरं वाटेल तितका वेळ तो लहरीप्रमाणं करूं लागला यालाच चमत्कारिक परिणाम म्हणायचं!

ज्या खोलींत व ज्या घरांत उमाचा व त्याचा सहवास घडला होता ती खोली व तें घर त्याला तापदायक वाटूं लागलं. तो खोलींत बसून राहिला,

कीं उमा त्याच्या खोलींत वापरूं लागे, त्याचं टेबल पुसून स्वच्छ करी, त्याचीं पुस्तकं आवरून ठेवी, बाहेर जातांना त्याला त्याची काठी झटकन् सांपडणार नाहीं म्हणून ती दाराजवळच्या कोंपऱ्यांत ठेवी, किंवा त्याच्यासमोर खुर्चीवर बसे, गांधींच्या 'यंग इंडिया'तले लेख मोठ्यानं वाची व त्यांतल्या शंका विचारी, आपल्या खादी विणण्याच्या वर्गांत कोणकोण स्त्रिया येतात व त्या काय काय बोलतात तें सांगू लागे, आणि क्वचित् छोट्या आनंदानं आपल्या शाळेंत घडलेल्या ज्या हकीगती तिला सांगितलेल्या असत त्या ती सांगूं लागे......पण मग त्याच्या एकदम लक्षांत येई कीं हा सगळा निवळ भास आहे. आपल्या खोलींत उमा नाहीं, आपण एकटे आहोंत. आणि मग तें सत्य त्याला असह्य होई.

पुण्यांत रहाणंसुद्धां त्याला हळूं हळूं नकोसं वाटूं लागलं. तो स्वतः कारागृहांत गेल्यामुळं राष्ट्रीय विद्यापीठांतल्या त्याच्या कामावर दुसऱ्या माणसाची नेमणूक झाली होती. विद्यापीठाचे चालक नव्या माणसाला काढून त्याला परत कामावर घ्यायला तयार होते. नव्हे, त्यानं परत कामावर यावं असा त्यांचा आग्रह होता; पण राजाभाऊनं ते कबूल केलं नाहीं. जो दुसरा मनुष्य त्याच्या जागीं नेमला गेला होता त्यानंहि चळवळींत सामील होऊन स्वार्थत्याग केला होता, हालअपेष्टा भोगल्या होत्या आणि विशेष म्हणजे या नव्या मिळालेल्या नोकरीखेरीज त्याला चरितार्थाचं दुसरं साधन नव्हतं. त्याचं तें साधन हिरावून घेऊन कामावर पुन्हां रुजूं होणं राजाभाऊच्या मनाला योग्य वाटलं नाहीं. पोटापुरतं मिळविण्यासाठीं विद्यापीठांत नोकरी केली पाहिजे अशी त्याची स्वतःची स्थिति नव्हती.

राजकीय चळवळीबद्दल कांहींसे उदासपणाचे विचार त्याच्या मनांत जमूं लागलें होतें. गांधींनीं सत्याग्रहाचं पहिलं युद्ध जाहीर केलं तेव्हांपासून आज पांच वर्षं त्यांचं अनुयायित्व त्यानं पाळलं होतं. त्यासाठीं आपली कॉलेजांतली नोकरी त्यानं सोडली होती. पदरचा पैसा खर्च केला होता. गरीबी पत्करली होती. दोन वेळां तुरुंगवासहि भोगला होता. या पांच वर्षांत आपण जी थोडीफार देशसेवा केली ती कांहीं अंशीं तरी सार्थकीं लागली का असा विचार त्याच्या मनांत वारंवार येई, व तो मनांत आला कीं त्याच्या चित्ताचं स्वास्थ्य

भरगच्च भाताचीं खाचरं, गव्हाच्या बादशाही पिकांनीं शोभणाऱ्या संयुक्त प्रांताकडच्या सुंदर सुपीक जमिनी, पंजाबांतल्या विविध रंगानीं खुललेल्या फळांच्या बाजारपेठा, परिपुष्ट गाईम्हशींच्या कळपांनीं गजबजलेले काठेवाडकडचे भूप्रदेश, आणि गलिच्छपणा व विलास यांचा विचित्र संगम दाखविणारीं गुजराथ प्रांतांतलीं गांवं, अशा विविध गोष्टी त्याच्या दृष्टीस पडल्या. 'माझा हिंदुस्तान' असे शब्द त्यानं पूर्वी कितीदां तरी उच्चारले होते; पण हिंदुस्तान खरोखरी केवढा विस्तीर्ण आणि किती विविध आहे याची त्याला कल्पना नव्हती. ती कल्पना त्याला आतां आली. 'हिंदुस्तानचं स्वातंत्र्य' हे शब्दही पूर्वी त्याच्या तोंडून कितीदां तरी बाहेर पडले होते; पण त्याला आतांच कळून आलं, कीं 'हिंदुस्तानचं स्वातंत्र्य' हा साधासुधा शब्दप्रयोग नव्हता. मलबारांतले मोपले, मद्रासच्या बंदरापासून कलकत्त्याच्या बंदरापर्यंतचे कोळी, भर पावसांत गुडघाभर पाण्यांत तासन् तास उभं राहून भाताची मशागत करणोर लाखों बंगाली शेतकरी, मुसलमानी आक्रमणाच्या तडाख्यांत सांपडलेले लखनौपासून अमृतसरपर्यंतच्या प्रांतांतले शरीरानं धिप्पाड पण मनानं आणि पैशानं दुर्बळ झालेले असंख्य हिंदु कामकरी व शेतकरी, जमीनदारांच्या आणि सावकारांच्या कर्जाच्या जाळ्यांत अडकून तडफडणारे व पोटभर भाकरीचं समाधान नाहीं म्हणून गुत्त्यांत किंवा देवळांत चित्त गुंतविण्यास उद्युक्त झालेले कराचीपासून तों सुरतपर्यंतचे लक्षावधी अडाणी दरिद्री—या सगळ्यांचा मिळून हिंदुस्थान देश बनला होता. अशा देशाचं गेलेलं स्वातंत्र्य परत मिळविणं सोपं नव्हतं...

पण असले विचार राजाभाऊ आपल्या मनांत फार वेळ ठरूं देत नसे. बोलून चालून राजकारण सोडून त्यानं सुटी घेतली होती. राजकीय स्वरूपाचे विचार मनांत येऊं लागले, कीं तो चटकन् दुसऱ्या कशांत तरी आपलं मन गुंतवी. मुशाफरींत असल्या गोष्टींची वाण क्वचितच पडते.

मद्रास शहरीं एकदां समुद्रकिनाऱ्यावर फिरतां फिरतां त्याची एका युरोपियन स्त्रीशीं गांठ पडली. एका हॉटेलची वाट तिनं विचारली तेव्हां आपणांला माहीत नाहीं, आपण या शहरचे नाहीं असं त्यानं उत्तर दिलं. तेव्हां तिनं सांगितलं, कीं तीही त्या शहरची नव्हती. अनोळखी शहरांत

दोन सारखीच परकी असलेलीं माणसं भेटलीं, कीं त्यांचं अधिक संभाषण व्हायचा संभव असतो. या न्यायाला अनुसरून ती स्त्री राजाभाऊशीं आणखी बराच वेळ बोलत राहिली. आपलं इंग्रजी चुकीचं असल्याचं त्याच्या लक्षांत येत आहे हें मनांत येतांच ती म्हणाली,

"मी जन्मानं इंग्लिश नाहीं हें तुम्हांला सांगितलं पाहिजे. जर्मनी हा माझा देश. माझा बाप जर्मन होता अन् आई रशियन होती. कांहीं विवक्षित राजकीय मतांच्या लोकांना जर्मनींत रहाणं दिवसेंदिवस अधिकाधिक अशक्य होणार आहे. पुष्कळ लोक जर्मनी सोडून जात आहेत. कित्येक अमेरिकेंत गेले, कित्येक फ्रान्समध्यें गेले, मीं म्हटलं हिंदुस्तानांत जावं. कां कुणास ठाऊक, पण हिंदुस्तानांत येण्याचं सुखस्वप्न मी पंधरा वर्षांची होतें तेव्हांपासून माझ्या मनांत होतं..."

याप्रमाणें ती राजाभाऊशीं किती वेळ तरी बोलत राहिली. रेखाकलेंत ती निष्णात होती व हिंदु मंदिरांच्या शिल्पाचा अभ्यास करण्यासाठीं ती हिंदुस्तानभर हिंडून चित्रं काढणार होती. तिचं नांव मॅगडा शूबेर्ट.

राजाभाऊहि तिच्याशीं पुष्कळ बोलला. ज्या हॉटेलांत ती उतरली होती त्याचा रस्ता शोधून काढण्यांत त्यानं तिला मदत केली. नंतर तिच्या-बरोबर तो हिंडूं फिरूं लागला. तिच्यापासून जर्मन भाषा शिकण्याचा तो प्रयत्न करी, व त्याच्यापासून ती संस्कृत शिके. विसर्गाचा उच्चार तिला कांहीं केल्या करतां येत नसे व मग तो तिची थट्टा करी. अशा थट्टेनं रागावण्या-ऐवजीं ती मनःपूर्वक हंसे, व उलट आहेर करायसाठीं म्हणे,

"तुम्हाला तरी आमच्या भाषेंतल्या शब्दाचे खरे उच्चार कुठें साधताहेत? ओ आणि ई किंवा ई आणि ऊ यांचे संधी उच्चारतां उच्चारतां तुम्ही किती वेडीवांकडीं तोंडं करतां ते पहातेंच आहे ना मी."

असा विनोद करून ती मनःपूर्वक हंसे, तेव्हां तिच्या दांतांची वांकडी तिकडी अव्यवस्थित रांग प्रगट होई; व कां कुणास ठाऊक, त्या तिच्या अना-कर्षक दंतपंक्तीकडे पाहिलं, कीं राजाभाऊचं मन तिच्याविषयीं जास्तच विचार करूं लागे. ती बुद्धीनं सुसंस्कृत होती. मोठ्या विश्वविद्यालयाची पदवी तिनं

मिळविली होती. ती रेखाकलेंत निपुण होती. तिच्या स्वभावांत निष्कपटता, प्रेमळपणा आणि विनोद भरपूर होता. ती अंगापिंडानं मजबूत होती. तिच्या तारुण्याचा भर अजून ओसरला नव्हता. निरामय प्रकृतीची आणि अभुक्त कौमार्याची कांति तिच्या अंगोपांगावर विलास करीत होती—आणि इतकं असूनही ती व तो लिंगभेद पार विसरून कधीं कधीं पूर्ण एकांतांतसुद्धां घटका न् घटका अविकृत चित्तानं बोलत रहात असत...

राजाभाऊला पुष्कळदां वाटे, सर्वच स्त्रीपुरुष अशा शुद्ध चित्तानं एक-मेकांचा निकट सहवास करूं शकतील तर जगाला फार सुंदर स्वरूप येईल. पण लगेच त्याचं मन साशंक होई. स्त्रीपुरुषांच्या सहवासांतून चित्ताची खळबळ नाहींशी झाली, तर त्या सहवासांत काव्य किंवा माधुर्य तें काय रहाणार? या काव्याच्या पोटीं मोह उत्पन्न होत असेल. मोहांतून पाप आणि पापांतून दुःख उद्भवत असेल. दुःखावांचून संसारांतली तीव्रताही उरण्यासारखी नसली तर काय उपयोग?...

तितक्यांत मॅगडा त्याला कांहीं तरी विचारी आणि मग तो दचकून आपली दृष्टि वळवी.

एकदां तिनं त्याला विचारलं,

"मला तुमच्यासारख्या हातसुताच्या अन् हातविणीच्या खादीचा झगा करून घ्यायचा आहे. ती विकत घेण्यांत तुम्ही मला मदत कराल?"

"हो, आनंदानं करीन."

"तुम्ही किती दिवस खादी वापरतां आहांत? पहिल्यापासून?"

"पहिल्यापासून म्हणजे?"

"म्हणजे खादी हिंदुस्तानांत आल्यापासून."

"खादी दुसऱ्या कुठून हिंदुस्तानांत आली नाहीं. तिची पैदास या देशांत कित्येक शतकं होत आहे. पण ती नष्ट झाली होती. तिचा पुनरुद्धार गांधींनीं केला. आतां खादी म्हणजे स्वातंत्र्याच्या युद्धाचं निशाण झालं आहे."

"गांधींच्या म्हणण्याबरहुकूम तुमची खादीवर निष्ठा आहे का?"

" मला सांगतां येणार नाहीं. माझी राजकीय निष्ठा आणि श्रद्धा सध्यां कांहींशी अनिश्चित झाली आहे."

" पण गांधी म्हणजे ख्रिस्ताचा अवतार आहे हें तरी तुम्हांला मान्य आहे कीं नाहीं? हिंदुस्तानाबाहेरचे आम्ही ख्रिश्चन लोक असं समजतों, कीं तुम्हां हिंदी लोकांना गांधीसारखा राजकीय पुढारी मिळाला हें तुमचं विलक्षण मोठं भाग्य आहे."

" कुणास ठाऊक भाग्य कीं दुर्भाग्य?"

" असं कां म्हणतां तुम्ही?"

" तें सांगणं कठीण आहे. मी जें बोलतों तें तुम्हांला समजलं तर पहा. गांधींच्या चारित्र्यानं तुम्ही परकी युरोपियन लोक दिपून जातां आहांत. अन् केवळ तेवढ्यानंच तुम्ही म्हणतां, कीं धन्य तो देश कीं ज्या देशांत अहिंसेच्या अन् सत्याच्या तत्त्वांसाठीं गांधी झगडत आहेत. गांधींच्या पुढारीपणामुळं आम्ही आमच्या राजकीय शत्रूला किती जिंकूं शकलों त्याचा हिशोब करायचं तुम्हांला कारण नसतं अन् तो तुम्ही कधीं करीत नाहीं. कारण, ज्या परदास्याच्या बेड्या आमच्या हातापायांत आहेत त्यांची आम्हांला कुठें कुठें कळ लागलेली आहे हें तुम्हांला काय कळणार? पण ती कळ आम्ही रात्रंदिवस सोसतों आहोंत अन् सुस्कारे सोडतों आहोंत. गांधी मोठें कीं लहान हें नुसतं त्यांच्या चारित्र्यावरून ठरवणं आम्हांला शक्य नाहीं. त्यानीं आपल्या पुढारीपणानं राजकीय सत्तेचा नुसता लौकिकच नव्हे, तर तिच्या मनगटांतलं प्रत्यक्ष सामर्थ्य किती कमी केलं हें पाहूनच आम्ही गांधींची योग्यता ठरवणार. तुम्ही परदेशचे ख्रिश्चन लोक गांधींचं कौतुक करतां यांत आम्हांला आनंद वाटत नाहीं असं नाहीं; पण तुमच्या मनोवृत्तीनं त्याचं कौतुक करणं आम्हांला शक्य नाहीं. मला काय म्हणायचं आहे तें चांगलंस मांडतां आलं नाहीं मला. थोडंसं तरी समजलं का तुम्हांला?"

" थोडंसं का, पुष्कळ समजलं." तिनं अतिशय कौतुकाची नजर त्याच्यावर रोखून व किंचित् हास्य करून म्हटलं. " तुम्ही फारच सुंदर बोलतां. माझी खात्री आहे, कीं मोठमोठ्या सभेंत तुम्ही सहज वक्तृत्व गाजवीत असाल. तुम्ही बोलत असतांना तुमच्या चर्येवर छायाप्रकाश ज्या

तऱ्हेनं खेळतो आणि तुमच्या रुंद भालप्रदेशावरची एक शीर ज्या तऱ्हेनं मधूनच स्पष्ट दिसूं लागते ती पाहून मला माझ्या एका मित्राची फार आठवण होते."

"कोण मित्र?"

"त्यानं विश्वविद्यालयांत गायनाचा अभ्यास पुरा केला होता आणि मोठं नैपुण्य मिळविलं होतं. माझं त्याच्यावर फार प्रेम होतं. त्याचंहि माझ्यावर फार होतं. लग्न केल्यावर आम्ही दोघंहि आपापल्या आवडीच्या विषयाचा अभ्यास चालू ठेवणार होतों. पण तो अपघातांत मृत्यु पावला अन् मी आतां अशी भटकतें आहे. काय चमत्मकारिक आहे हें मानवी जीवित!"

यानंतर सात आठ दिवसांनीं राजाभाऊनं मद्रास शहर सोडलं. पण मॅगूडा शूबेर्टची आठवण त्याला पुढें पुष्कळ दिवस येत होती.

पूर्व किनाऱ्यानं हिंडत हिंडत तो कलकत्त्यास गेला. त्याला ओळखणारं माणूस क्वचितच भेटे. याचा त्याला जरी क्वचित् एखादे वेळीं विषाद वाटे, तरी ती गोष्ट त्याला बहुतांशीं सुखाचीच होई. कारण, आपण अमुकच आहोंत व अमुकच करतों असं सांगण्याचं त्याला बंधन नसे. सोय पाहून तो आपली जात सांगे. गंमत वाटली तर वाटेल तें काम करायला तो तयार होई. एकदां एका हकीमाची व त्याची जानपछान झाली व त्याच हकीमाला कोंपऱ्यावर उभं राहून आपल्या औषधाचं इंग्रजींत गुणवर्णन करणारा माणूस हवा होता तेव्हां तें कामसुद्धां त्यानं पंधरावीस दिवस केलं. त्या हकीमानं खूष होऊन त्याला पैसेहि चांगले दिले. आंध्र प्रांतांत हिंडतांना एका खेडे गांवचा एक रंगारी खादीला बेमालुम पक्का रंग देतो असं कळल्यावरून त्याच्याकडे जाऊन एक महिनाभर रहायलाही त्यानं कमी केलं नाहीं. तो रंगारी भजनी पंथांतला होता व त्याच्या भजनांना राजाभाऊनं जेव्हां भक्तिरसाला अनुकूल अशा नव्या सुंदर सुंदर चाली लावून दिल्या आणि त्या त्याला शिकविल्या तेव्हां तो खूष झाला; आणि त्यानं राजाभाऊला आपल्या रंगकामांतलं सारं रहस्य सांगून टाकलं.

तो कलकत्त्यास आला तेव्हां हें ज्ञान त्याच्या उपयोगी पडलं. खादीच्या

एका केंद्रांत पक्क्या रंगाची कला जाणणाऱ्या माणसाची गरज होती. त्या लोकांनीं राजाभाऊला ठेवून घेतलं,

पण कलकत्त्याच्या मुक्कामांत खादीवाल्या लोकांपेक्षां निराळ्याच लोकांशीं त्याची अधिक दाट ओळख झाली. हे लोक तरुण होते, आणि गांधींच्या फार विरुद्ध होते. गांधींनीं माजविलेल्या खादीच्या बडेजावाची ते उघड उघड चेष्टा करीत. वाद निघाला कीं गांधींच्या सत्य आणि अहिंसा तत्त्वांचे ते वाभाडे काढीत. गांधींनीं देशांतल्या मिरासदारांचं अन् धनिकांचं तेवढं हित साधलं, हिंदुस्तानांत खरी क्रांति कोणती घडवून आणायला पाहिजे तें त्यांना कळत नाहीं, त्यांची चळवळ सदा निष्फळ होणार, सफल झाली तरी फार फार तर हिंदुस्थानांतून ब्रिटिश भांडवलशाही नष्ट होऊन तिच्या ऐवजीं हिंदी भांडवलशाही सुरू होईल इत्यादि गोष्टी हे तरुण लोक उघड उघड निर्भयपणानं, आवेशानं, बऱ्याचशा संतापानं बोलून दाखवीत. ह्या तरुण मंडळींत एक दोन व्यक्ती तर फार पाणीदार आणि बुद्धिमान् अशा राजाला वाटल्या. तो त्यांच्याकडे दिवसेदिवस अधिकाधिक आकर्षित होऊं लागला. त्यांचे मार्ग जरी त्याला ताबडतोब पटले नाहींत, तरी त्यांचं असमाधान आणि गांधींच्यापेक्षां आपणच अधिक शहाणे आहोंत असं म्हणण्यांतला आत्मविश्वास त्याला अतिशय कौतुकाचा वाटत असे.

तो कदाचित् त्या लोकांत मिळूनही गेला असता; पण एके दिवशीं एक प्रसंग अकस्मात् घडला आणि त्यानं त्या मंडळीला अन् कलकत्ता शहराला कायमचा रामराम ठोकला.

त्या तरुण मंडळीचा पुढारी फणींद्रबाबू त्याच्या बिऱ्हाडीं मध्यरात्रीं आला व त्याला म्हणाला,

“ मला तुमच्या मदतीची गरज आहे. ”

राजाभाऊनं विचारलं, “ कसली मदत ? ”

“ आम्ही सगळेजण उद्यां पकडले जाऊं असा संभव दिसतो. आमच्या घराची अन् आमच्या मंडळाच्या कचेरीची झडती तर खास होणार. माझ्याजवळ कांहीं पुस्तकं आहेत तीं पोलिसांच्या हातीं लागतां कामा नयेत. तीं

तुमच्या स्वाधीन करावीं म्हणून मीं आणलीं आहेत. तुम्हांला तीं स्वतःजवळ सुरक्षित ठेवतां आलीं तर उत्तमच. नाहीं तर तुम्हांला जो मार्ग सगळ्यांत बिनधोक वाटेल त्या मार्गानं तीं तुम्ही नाहींशीं करा. तीं नाहींशीं करण्याचा प्रयत्न मी किंवा माझ्या मित्रांनीं करणं यावेळीं सुरक्षितपणाचं नाहीं म्हणून तुम्हाला तसदी देतों आहें मी. तुम्ही माझी विनंति अमान्य करणार नाहीं अशी मला खात्री आहे."

त्याला काय उत्तर द्यावं तें राजाभाऊला समजेना.

बरोबर आणलेलीं पुस्तकं ठेवून फणींद्रबाबू निघून गेला.

तीं पुस्तकं कसलीं आहेत तें एकदां पहावं तरी असं प्रथम राजाभाऊला वाटलं. पण पुन्हां त्याच्या मनांत आलं, ज्या अर्थी फणींद्रबाबूनं तीं लपवा-यसाठीं अगर नाहींशीं करायसाठीं आपल्याकडे आणून दिलीं आहेत त्या अर्थी तीं भयंकर स्वरूपाचीं असणारच; कशाला उघडून पहायचीं तीं? अन् समजा आपण तीं उघडून पहात असतां पोलिसांनीं आपल्या खोलीचं दार ठोठावलं तर? फणींद्रबाबूवर पोलिसांची पाळत असणं, आणि तो आपल्या खोलींत नुकताच येऊन गेला हें पोलिसांनीं पाहिलेलं असणं सहज संभवनीय आहे...

त्यानं तें पुस्तकाचं छोटं गांठोडं न सोडतां आपल्या कॉटच्या खालीं सरकवून टाकलं आणि तो विचार करूं लागला, "हीं पुस्तकं आतां नाहींशीं कशीं करायचीं?"

पहिली कल्पना त्याला सुचली ती अशी, कीं तीं जाळून टाकावींत. पण त्या प्रयोगाचा तो जेव्हां सविस्तर विचार करूं लागला तेव्हां तो फार धोक्याचा आहे असं त्याला वाटूं लागलं. कारण, दहा बारा पुस्तकं जाळायचीं म्हणजे विस्तव केवढा तयार करायला पाहिजे? बरं त्या पुस्तकांची एका क्षणांत जळून राख थोडीच होणार होती? आपल्या खोलींत येवढा जाळ कसला पेटला आहे म्हणुन चाळींतल्या शेजारच्या बिऱ्हाडकरूंनीं विचारलं म्हणजे? खिडक्या लावल्या तर त्यानं फार तर जाळ दिसणार नाहीं; पण पुस्तकं जळूं लागलीं अन् त्यांचा धूर खिडकीवाटे बाहेर पडूं लागला म्हणजे तो चाळींतल्या लोकांना दिसल्यावांचून थोडाच रहाणार? तो पाहून आगीच्या बंबालासुद्धां लोक

बोलावणं धाडतील......अन् आपल्या सुदैवानं यांपैकीं कांहींच जरी घडलं नाहीं, तरी तीं पुस्तकं जाळण्यांत आपण गुंतलों असतांना पोलीस अचानक आपल्या खोलीवर आले म्हणजे ? तेव्हां या कल्पनेंत कांहीं अर्थ नाहीं...

त्याच्या मनांत दुसरी कल्पना आली ती अशी, कीं समुद्रावर जावं अन् तीं पुस्तकं द्यावीं पाण्यांत फेंकून......

पण त्याही उपायाचा एकएक भाग जेव्हां तो तपासून पाहूं लागला, तेव्हां तोही त्याला धोक्याचाच वाटूं लागला. तीं पुस्तकं समुद्रांत फेंकतांना आपल्याला कुणीं पाहिलं तर ? किंवा समुद्रापर्यंत जातांना वाटेंतच आपल्याला पोलिसांनीं हटकलं तर ? फणींद्राची धरपकड खरोखरच उद्यां व्हायची असली, तर त्याच्या निकट सहवासाच्या दोस्तांवरच नव्हे, तर ज्यांच्या ज्याच्याशीं त्याचा थोडा फार संबंध आलेला पोलिसांना दिसला त्यांच्या त्यांच्यावर पोलीस पाळत ठेवणार !......

मध्येंच त्याच्या मनांत कल्पना आली, कीं लोकल गाडींत बसून कुठें तरी जावं आणखी वाटेंत नदीचा पूल लागला कीं द्यावीं तीं पुस्तकं खिडकींतून भिरकावून. तसं करतांना आपल्याला पाहून आगगाडींतल्या माणसांनीं विचारलं तर सांगतां येईल, कीं ' माझ्या आजोबांच्या वेळच्या जुन्या पोथ्या होत्या. त्यांनीं परवां मरतांना सांगितलं होतं, कीं या सगळ्या नदींत टाकून दे ! '... किंवा सांगतां येईल, ' तुम्हांला काय करायचं आहे ? माझी मावशी परवां मेली तिचीं हाडं टाकलीं मी !...'

पण गाडींतून तीं पुस्तकं फेंकून दिल्यानंतर जरी फारशी धास्ती नव्हती, तरी ती गोष्ट हातून उरकेपर्यंत सर्व प्रकारचे धोके होतेच !... आणि त्यांतला सगळ्यांत मोठा धोका म्हणजे पोलिस आपल्या पाळतीवर कसे असतील व आपल्याला केव्हां कुठें हटकतील त्याचा नियम नाहीं !...

त्या रात्रीं राजाभाऊला क्षणभरदेखील झोंप आली नाहीं.

पुस्तकं लिहून निर्माण करण्यापेक्षांहि तीं गुप्त रीतीनं जगांतून नष्ट करणं अधिक कठीण असतं.

फणींद्रबाबूनं त्याच्याजवळ दिलेलीं बुकं खोलींतल्या खोलींतहीं नाहिशीं करणं शक्य नव्हतं, किंवा नाहींशीं करण्यासाठीं तीं खोलीबाहेर नेणंही शक्य नव्हतं.

अशा विचित्र अडचणींत एकच उपाय उरला होता. आणि तोच राजाभाऊनं अंमलांत आणला.

त्यानं ,तें पुस्तकांच गाठोडं तसंच खोलींत टाकलं आणि कलकत्ता शहराला रामराम ठोकला.

आपण एकदम कुठें नाहींसे झालों म्हणून खादीकेंद्राचे लोक बुचकळ्यांत पडतील हें त्याला माहित होतं. पण त्यांच्या विस्मयाची पर्वा करण्याची या वेळीं सोय नव्हती.

लाहोर शहरीं तो गेला तों केवळ अमृतसरच्या वाटेवर तें शहर होतं म्हणून. त्या शहरानं अकल्पित रीतीनं त्याला ठेवून घेतलं, आणि मग पुढें कित्येक दिवसांनीं एकदां जालियनवाला बाग पहायसाठीं त्यानं अमृतसरची सफर केली तीच धांवत पळत दोन चार दिवसांत केली. लाहोरमध्यें राष्ट्रीय धोरणाचं एक नवीन इंग्रजी दैनिक सुरू झालं होतं. त्या पत्राच्या संपादकांची आणि राजाभाऊची योगायोगानं ओळख झाली, आणि आपल्या पत्राच्या कचेरींत काम करण्याविषयीं त्यांनीं विचारतांच राजाभाऊनं तें कबूल केलं. तो तें काम करूं लागल्यानंतर थोड्याच दिवसांत लाहोरला एक मोठी संगीत-परिषद् भरली. त्या परिषदेचे अध्यक्ष 'सर'चा किताब धारण करणारे एक बडे सरकारी अधिकारी होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाची नेहमींप्रमाणें वृत्तपत्रकारांकडून तारीफ झाली, पण ज्या वर्तमानपत्रांत राजाभाऊ काम करीत असे त्यांत त्यांच्या भाषणाची सपाटून हजेरी घेण्यांत आली. सर साहेबांच्या भाषणांतील बहुतेक विधानं किती असमंजसपणाचीं होतीं तें त्या लेखांत सप्रमाण सिद्ध करण्यांत आलं होतं, आणि शेवटीं असं म्हटलं होतं कीं,

" सारांश, प्रातिनिधिक स्वरूपाच्या अशा संमेलनाचे अध्यक्ष व्हायला सरसाहेब यत्किंचितही लायख नव्हते हें स्पष्ट दिसत आहे; व अशा अध्यक्षाची

निवड करण्यांत संमेलन भरवणाऱ्यांनीं मोठी चूक केली असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. आम्ही असाही प्रश्न उपस्थित करूं इच्छितों, कीं आपल्या राष्ट्रीय संगीताच्या प्रगतीचा व प्रचाराचा विचार करण्यासाठींच जर आपण असलीं संमेलनें भरवीत असलों, तर तज्ञ माणसाला त्यांचं अध्यक्षस्थान देण्याऐवजीं त्या पदासाठीं राजे महाराजे किंवा पोकळ सरकारी किताबाचीं किरीटकुंडलें धारण करणारे बडे लोक बोलावून आणण्याची घातुक पद्धति आपण ताबडतोब बंद करावयास नको काय ?"

या लेखानं जिकडे तिकडे खळबळ उडाली. तो कुणी लिहिला असावा याची चर्चा जिकडे तिकडे सुरू झाली.

एके दिवशीं संपादकांनीं राजाभाऊला बोलावून सांगितलं,

"आज संध्याकाळीं पांच वाजतां लाला हरिप्रसाद यांच्या बंगल्यावर तुम्ही जाल का ?"

राजाभाऊनं विचारलं, "लाला हरिप्रसाद म्हणजे कोण ?"

"इथले एक मोठे सधन गृहस्थ आहेत. गाण्याचे अन् चित्रकलेचे फार षोकी आहेत. तुमची भेट घ्यायची त्यांची फार इच्छा आहे."

"ती का ?"

"सरसाहेबांच्या संगीत परिषदेंतल्या भाषणावर आपल्या पत्रांत जो टीकालेख प्रसिद्ध झाला तो त्यांना अतिशय आवडला. त्या लेखाचा लेखक मला भेटलाच पाहिजे असं ते दोन चारदां माझ्याजवळ म्हणाले. शेवटीं तो लेख तुम्ही लिहिला आहे हें मी त्यांना सांगून टाकलं. अन् आज संध्याकाळीं तुम्ही त्यांच्या बंगल्यावर जाऊन त्यांना भेटावं असंही कबूल केलं."

लाला हरिप्रसाद म्हणजे लाहोरांतली एक बडी व्यक्ति होती. ते लक्षाधिपति होते. मवाळपंथी राजकारण व विधवाविवाह, स्त्रीशिक्षण इत्यादि सामाजिक सुधारणांत त्यांनीं आज तीस चाळीस वर्षं लक्ष घातलं होतं. युरप-अमेरिकेस ते दोन तीनदां जाऊन आले होते. त्यांचीं मुलं कुणी इंग्लंड-

मध्यें, कुणी अमेरिकेंत, कुणी शांतिनिकेतनांत अशीं शिकत होतीं. त्यांना नृत्यगायनादि कलांची फार आवड होती, आणि त्यांतला चांगला समजही होता किंबहुना त्यांच्या घराण्यांतल्या सर्वच मंडळींना नृत्यगायनाचा नाद होता.

या सगळया गोष्टी संपादकांनीं राजाभाऊला सांगून ठेवल्या होत्या. पण त्या जरी त्यांनीं सांगितल्या नसत्या तरी चाललं असतं. कारण, राजाभाऊ भेटतांच व त्याच्याशीं दहा पंधरा मिनिटं संभाषण होतांच लाला हरिप्रसाद त्याच्यावर इतके खूष झाले कीं त्यांनीं आपण होऊन आपली सगळी माहिती त्याला थोडक्यांत सांगितली, व त्याची माहिती विचारून घेतली. राजाभाऊनं स्वतः गाण्याचा अभ्यास परिश्रमपूर्वक केला आहे हें पाहून तर ते त्याच्यावर विशेष प्रसन्न झाले, व लाहोर शहरीं नृत्यगायनाचं विश्वविद्यालय स्थापन करण्याचं सुखस्वप्न आपण कित्येक दिवस उराशीं कसं धरलं आहे ते त्यांनीं त्याला सविस्तरपणें सांगून टाकलं.

राजाभाऊ त्यांच्याकडे रोज जाऊं लागला.

एक दिवस लाला हरिप्रसाद त्याला म्हणाले,

" तुम्ही परदेशांत जायला तयार व्हाल का ? "

" केवळ देश पहावयासाठीं अन् गंमत करायसाठीं जायची मला फारशी इच्छा नाहीं. " राजाभाऊनं उत्तर दिलं. " आपल्या देशाची कीर्ति वाढविण्यासारखं कांहीं काम मला करतां आलं तर मात्र जाईन."

" तशा कामासाठींच म्हणतों मी. माझ्या मनांत काय आहे तें मी तुम्हाला सांगतों. "

असं म्हणून लाला हरिप्रसादनीं त्याला आपली कल्पना थोडक्यांत सांगितली.

त्यांचे एक बंधू लाला नारायणप्रसाद मुंबईस मोठे कॉन्टॅक्टर होते. खूप संपत्ति मिळविली होती त्यांनीं आपल्या धंद्यांत. आणि आतां आणखी पैसा मिळविण्याचा हव्यास धरून कंत्राटदाराचा कंटाळवाणा धंदा करीत रहाण्यापेक्षां कांही तरी विशेष गोष्ट करण्यांत आपल्या पैशाचा विनियोग करावा अशी त्यांची इच्छा होती. त्यांना दोन मुली होत्या. थोरलीचं नांव

जयमाला आणि धाकटींचं नीलांबरी. दोघींही कॉलेजांत जाऊन शिकल्या होत्या; पण कॉलेजांतल्या अभ्यासापेक्षां नृत्यगायनाच्या अभ्यासाकडे दोघीं-नींही अधिक लक्ष पुरविलं होतं. युरप-अमेरिकेंत जावं, आणि आपल्या मुलींच्या नृत्यगायनाचे कार्यक्रम करावेत अशी कल्पना त्यांनीं काढली होती. या कामीं त्यांना उत्तम मॅनेजर हवा होता. लाला हरिप्रसादनीं राजाभाऊचं नांव त्यांना सुचविलं होतं. राजाभाऊ जायला तयार होता काय?

नाहीं म्हणायचं राजाभाऊला कांहींच कारण नव्हतं.

त्याचा रुकार ऐकून लाला हरिप्रसादना फार आनंद झाला. राजाभाऊनं ताबडतोड मुंबईस जावं अन् लाला नारायणप्रसादना भेटावं असं त्यांनीं सुचविलं. त्याप्रमाणें लाहोरहून मुंबईस व मुंबईहून लाहोरास तारा गेल्या आल्या, आणि चार सहा दिवसानंतर राजाभाऊ लाहोरहून मुंबईकडे जाणाऱ्या गाडींत बसला.

मुंबईच्या स्टेशनवर त्याला न्यायला लाला नारायणप्रसाद यांची मोटर आली होती, तिच्यांत बसून राजाभाऊ त्यांच्या बंगल्यावर गेला.

त्या दिवसापासून राजाभाऊच्या आयुष्याला एकदम निराळं वळण मिळालं. त्यानं दारिद्र्य असं कधीं अनुभवलं नव्हतं. पण विलासी ऐषआरा-माच्या आयुष्याचाही त्याला कधीं अनुभव नव्हता. जिथें मुलीसुद्धां घरांतल्या घरांत इंग्रजी भाषेंत बोलतात, किंवा जेवणाखाणाचा अन् चहाचा सारा थाट अस्सल युरोपियन पद्धतीचा असतो अशा हिंदु कुटुंबाची कल्पनासुद्धां त्यानं पूर्वीं कधीं केली नव्हती. पण अशा कुटुंबांत आणि ऐषआरामाच्या राहणींत तो अकस्मात् प्रत्यक्षच येऊन पडला. त्या कुटुंबांतलीं राजकीय मतं त्याच्या स्वतःच्या मतांहून अत्यंत भिन्न होतीं. किंबहुना त्या मंडळींनीं देशाच्या राजकारणाचा मनःपूर्वक विचार कधीं केला असेल कीं नाहीं याची शंकाच होती. त्या कुटुंबांतली सारीं माणसं कपड्यालत्त्यांची अन् नटवेपणाची हौस बाळगणारीं होतीं. राजाभाऊनं स्वतः ती हौस फारशी कधींच केली नव्हती. सध्यां तर जाड्याभरड्या खादीखेरीज तो अंगावर दुसरं वस्त्र घालीत नव्हता. त्या कुटुंबांत आणि राजाभाऊंत एकच समानधर्म होता, आणि तो मात्र फार

मोठ्या प्रमाणांत होता. तो धर्म म्हणजे संगीताची विलक्षण आवड आणि त्यांतली गति. संगीताच्या या वेडामुळंच राजाभाऊची चंचलेशीं गांठ पडली होती. मध्यंतरीं कित्येक वर्षं त्यानं आपली संगीताची आसक्ति पार टाकून दिली होती. पण माणसाच्या स्वभावांतल्या मूलभूत प्रवृत्ति अशा दुर्दम्य असतात, कीं त्या कांहीं काल सुप्त झाल्या तरी पुन्हां योग्य परिस्थिति येतांच जागृत होऊन मनुष्याला विवक्षित तऱ्हेनं वागायला लावतात. राजाभाऊनं लाला नारायणप्रसाद यांच्या महत्त्वाकांक्षी योजनेंत सामील व्हायचं, इतकंच नव्हे तर त्यांच्या कुटुंबांतल्या एका माणसाप्रमाणेंच त्यांच्या घरीं रहायचं कां कबूल केलं या प्रश्नाला दुसरं उत्तर नाहीं.



# [२१]

लाला नारायणप्रसाद यांच्या घरीं सकाळच्या चहाला पुष्कळ वेळां एखाद्या कौन्सिलच्या बैठकीचं स्वरूप येई. स्वतः लालाजी, त्यांची पत्नि–जिला तिच्या दोघी मुली व म्हणून लालाजीसुद्धां सगळींच माणसं 'माताजी' म्हणत–जयमाला, नीलांबरी, राजाभाऊ आणि क्वचित् प्रसंगीं कुणी पाहुणे अशी मंडळी हजर असत; व युरप-अमेरिकेंत काढायच्या दौऱ्या संबंधीं काय काय तयारी झाली व आणखी कोणती तयारी करायला पाहिजे यासंबंधीं जोराची चर्चा चाले. कधीं कधीं या चर्चेला तीव्र वादाचंसुद्धां स्वरूप येई. अशा वादाच्या वेळीं राजाभाऊ विरुद्ध बाकीचीं सगळीं माणसं असेच दोन पक्ष बहुधा असत. निदान प्रथम कांहीं दिवस असत. अलीकडे अलीकडे राजाभाऊच्या संख्यादुर्बल पक्षांत नीलांबरी सामील झाली होती. कसलाही वाद निघाला तरी विश्वासू अनुयायाप्रमाणं ती त्याच्या बाजूनं बोलूं लागे. किंवा

खरं म्हणजे स्वत: कांहीं बोलण्याऐवजीं त्याच्याकडे ती पहात राही. तिला त्याचा स्वर इतका मधुर आणि त्याच्या चर्येवरचा आवेश इतका आदरणीय वाटे, की बाकीचीं माणसं त्याच्याविरुद्ध बोलूं शकतात तरी कशीं असा विस्मय वाटून थोडासा रागसुद्धां तिला येई ! मग ती मध्येंच चिडलेल्या स्वरानं कांहीं बोले. तिची थोरली बहीण तिला म्हणे,

"नीला, आम्ही राजाभाऊशीं वाद करतों आहोंत त्यांत तुला चिडायला काय झालं ?"

नीला अधिकच उसळून बहिणीला म्हणे,

"काय झालं म्हणजे ? जी गोष्ट उघड आहे ती तुला पटत नाहीं हें अजब वाटतं मला."

मग लालाजी जयमालेला म्हणत,

"माला, जाऊं दे. तिचा आवाज उंच व्हायला लागला आहे. वाद करणाऱ्या माणसानं आपला आवाज चढविला कीं समजावं त्याचे मुद्दे संपले अन् मनांतल्या मनांत त्याला पराजयाची भीति वाटायला लागली आहे."

हें ऐकून मंडळी हंसूं लागत. नीला हंसण्याऐवजीं व्यथित दृष्टीनं राजाभाऊकडे बघे. तो लालाजींना चटकन् म्हणे,

"पण माझा आवाज अजून उंच नाहीं झाला. नुसत्या नीलाबाईंच्या उंच आवाजावरून आमचा पक्ष नामोहरम झाल्याची द्वाही फिरवणं हें धर्मयुद्ध खचित नव्हे."

या उत्तरानं सारी मंडळी अधिकच मन:पूर्वक हंसत. इतरांचं लक्ष चुकवून नीला राजाभाऊकडे एक कटाक्ष टाकी. त्या कटाक्षानं तिला सुचवायचं असे, 'तुम्ही फार चतुर आहांत.' आपल्या कटाक्षांतला हा अभिप्राय त्याच्या लक्षांत आला कीं नाहीं तें तिला नीटसं कळत नसे. बहुतेक आला नाहीं असं वाटून तिचं मन कष्टी होई. पण ते कष्ट फार वेळ मनांत न ठेवतां पुढच्या वादाच्या वेळीं ती त्याच्या मताशीं अधिकच तत्परतेनं समरस होई.

एकदां एका स्नेह्यांनीं लाला नारायणप्रसादना सूचना केली, कीं तुम्ही आपल्या मुलींना घेऊन अमेरिकेस जाताहांत तेव्हां उदयशंकरच्या नाचाच्या

धर्तीवर त्यांचे नाच बसवा. ती सूचना लाला नारायणप्रसादनीं दुसऱ्या दिवशीं चहाच्या बैठकींत काढली व त्याबद्दल राजाभाऊचं मत विचारलं, तेव्हां तो फक्त हंसला व गप्प बसला.

जयमालेनं त्याला म्हटलं,

" नुसते हंसलांत काय? बोला ना! "

राजाभाऊनं तिला विचारलं,

" तुम्ही उदयशंकरचे नाच प्रत्यक्ष पाहिले आहेत का?"

" नाहीं. त्याची अशी गंमत झाली कीं त्याचे नाच इथें मुंबईस झाले तेव्हां आम्ही गेलों होतों काकांच्याकडे लाहोरला, अन् तिथें जवळ दिल्लीस झाले तेव्हां इकडे आम्ही मुंबईस परत आलों होतों."

" अस्सं, म्हणजे न पहातांच तुम्ही उदयशंकरची स्तुति करतां तर?"

" मी कधीं स्तुति केली? पहा बाई! पिताजींच्या कुणी स्नेह्यांनीं केली."

तिच्या बापाकडे वळून राजाभाऊनं विचारलं,

" आपल्या स्नेह्यांनीं तरी उदयशंकरचे नाच प्रत्यक्ष पाहिले आहेत का?"

" वा! तर? उदयशंकरचे म्हणे इथें पांच कार्यक्रम झाले तर आमचे हे स्नेही पांची कार्यक्रमांना हजर होते. ते म्हणतात, आपण जन्मांत असं नृत्य-कौशल्य पाहिलं नाहीं. त्यांनीं 'जामे जमशेद'मध्यें उदयशंकरची दहा कॉलम स्तुति लिहिली होती त्या वेळीं."

" म्हणजे आपले हे स्नेही पारशी आहेत म्हणतां?" असं एकदम विचारून राजाभाऊ मग उपरोधाच्या स्वरांत म्हणाला, " आतां समजलं. आतां आलं ध्यानांत त्यांना उदयशंकरचे नाच कसे आवडले ते. त्यांना ते आवडावेत अन् आपल्या मुलींचाही उदयशंकर करावा अशी त्यांनीं सूचना करावी हें ठीकच आहे. ते पारशी आहेत यांत सगळं कांहीं आलं!"

राजाभाऊनं आपल्या मुद्रेवर हें बोलतांना जो अभिनय दाखविला तो

इतका मजेदार होता, कीं तो पहातांच सगळ्यांना हंसूं फुटूं लागलं. नीला तर एकदम लहान मुलासारखी खो खो करून हंसत सुटली.

जयमालेलाही हंसू आलं, पण तें थोडक्यांत आटपून तिनं राजाभाऊला विचारलं,

" पिताजींचे हे स्नेही पारशी आहेत यावरून सगळं कांहीं समजलं असं तुम्ही म्हणता याचा अर्थ काय ? "

" याचा अर्थ असा, कीं अनभिज्ञ माणसानं केलेल्या सूचनेचा विचार जास्त कशाला करायचा ? तुम्हांला सगळ्यांना सांगतों, त्याचं असं आहे कीं ज्याला नृत्यांतल्या सौंदर्याची खरी दृष्टि आहे आणि संगीताचा सुरेलपणा ज्याच्या कानांना कळतो त्याला उदयशंकरचं कौतुक करावंसं मनांतसुद्धां यायचं नाहीं. पण आजिंठ्याच्या लेण्यांतल्या अष्टावक्र हातापायांच्या मूर्ती म्हणजेच हिंदी नृत्यकलेचं सारसर्वस्व अशी ज्यांची भ्रामक समजूत आहे त्यांना उदय-शंकरचे नाच अजब वाटावेत हें सहाजिक आहे. युरप-अमेरिकेंतल्या लोकांना बिचाऱ्यांना काय कल्पना, कीं अजंठा छापाच्या चित्रांहून भिन्न असं हिंदी नृत्यकलेचं स्वरूप पुष्कळ आहे, अन् तें गोंडस, बाळसेदार, सुरेल आहे ? रानटी ढोलांच्या तालावर आणि जेवायला बसल्यासारख्या मांड्या घालून बसलेल्या चार वाद्यकारांच्या रडक्या भेसुर साथीनं उदयशंकरनं रंगभूमीवर थयथयाट करावा, त्याला ' तांडवनृत्य ' असं नांव द्यावं, अन् युरोपियन अथवा अमेरिकन लोकांनीं कौतुकानं टाळ्या वाजवाव्यात हें सगळं योग्यच आहे. आणि ज्या अर्थी युरप-अमेरिकेंत नांव मिळवून उदयशंकर आला त्या अर्थी त्याचा उदोउदो आपण केला नाहीं तर आपली मूर्खांत गणना होईल अशी भीति हीच ज्यांची रसिकपणाची शिदोरी त्यांनीं इथेंहि त्याच्या कार्यक्रमांना गर्दी करावी हेंही सरळच आहे. मला नका सांगूं उदयशंकरची प्रतिष्ठा. लालाजी, आपल्या मुलींच्या नाचांना उदयशंकरी घाट द्यावा असं आपल्याला पुन्हां कुणीं सुचविलं तर त्यांना आपण स्पष्ट सांगत चला, कीं उदयशंकरचे नाच किती गांवठी होते हें लोकांना पटवायसाठीं माझ्या मुली अमेरिकेस जात आहेत. "

अशा प्रकारें त्या मंडळींचे अनेक वाद चालत, आणि राजाभाऊ दर-

वेळीं असं काहीं तरी स्पष्ट सडेतोड बोले. नीला त्याच्याकडे टक लावून पहात राही.

मग तो कधीं एकीकडे भेटला कीं ती त्याला म्हणे,

" तुम्ही किती सुंदर बोलतां ! "

तो कामात असला तर उगीच क्षणमात्र वर पाहून म्हणे,

" नीलाबाई, स्तुतीनं माणसं बिघडतात, माहीत आहे ना तुम्हाला ? "

" माहीत आहे. म्हणूनच स्तुति करतें. तुम्हांला बिघडवायचंच मी ठरवलं आहे. "

असं म्हणून ती आपल्या मानेची गंमतीदार हालचाल करी, आपल्या मोठ्या पाणीदार डोळ्यांची नाचाच्या वेळीं शोभणारी तिरपी नजर त्याच्याकडे टाकी, आणि त्याच्यापुढून पळून जाई.

एके दिवशीं जयमाला तिला म्हणाली,

" नीला, काल राजाभाऊ काय म्हणत होते तुला माहीत आहे कां ?

" कुणाजवळ म्हणत होते ? "

" माझ्याजवळ. "

" मग तें मला कसं समजणार ? अन् तें मला सांगतेस तरी कशाला ? तुझ्याशीं एकटीशीं बोलत बसायची त्यांना फार आवड आहे, माहीत आहे मला. "

" नाउ नाउ, नीला, आरन्ट यू ए परफेक्ट फूल ? "

" फूल ? काय झालं त्यांत ? खरं तें बोललें. "

" बरं तुला भांडायचं आहे का राजाभाऊ काय म्हणत होते तें ऐकायचं आहे ? त्यांनीं एका नव्या तऱ्हेच्या नाचाबद्दल फार सुंदर कल्पना काढली आहे. "

" मग ऐकेन. आतां मी स्नानाला निघालें आहे, दिसत नाहीं का तुला ? आइ ॲम इन सच ए हरी ! "

असं म्हणून ती खरोखरच स्नानगृहाकडे पळाली.

पण स्नानगृहाला आंतून कडी लावून घेतल्यावर ती लगेच स्नान पात्रांत उतरली नाहीं.

राजाभाऊनं जयमालेला तेवढ्या आपल्या मनांतल्या नव्या नव्या कल्पना सांगाव्या याचा तिला विलक्षण मत्सर वाटला होता आणि संताप आला होता. राजाभाऊ खरोखरच तिच्यापुढें उभा असता तर तिनं आपल्या मनांतला राग कितपत व्यक्त केला असता कुणास ठाऊक ? पण जणूं त्याच्यासमोरच आपण उभ्या आहोंत अशी कल्पना करून जेव्हां ती रागारागानं बोलूं लागली तेव्हां ती पुष्कळ वेळ तसं बोलत राहिली, अन् शेवटीं त्याच्या निर्घृण हृदयाला पाझर फुटत नाहीं असं पाहून दोन्ही हातांनीं आपलं तोंड झाकून ती रडूं लागली येवढं खरं !

* * *

कॉंग्रेसच्या राजकारणाचा डाव जरी कुजल्यासारखा झाला होता तरी देशांत सर्वत्र शांतता नांदत होती असं मुळींच नव्हे. बेळगांव, कानपूर, गोहत्ती मद्रास आणि कलकत्ता अशीं कॉंग्रेसचीं वार्षिक अधिवेशनं होऊन गेलीं होतीं. स्वातंत्र्याच्या ध्येयाचा कॉंग्रेसकडून प्रत्येक अधिवेशनांत पुनरुच्चार होत होता. एका धर्मवेड्या मुसलमानांच्या भ्याड खुनी हल्ल्याला बळी पडून स्वामी श्रद्धानंद स्वर्गवासी झाले होते. कॉंग्रेसनं सरकारी कायदेमंडळांत कितपत भाग घ्यावा याबद्दलचे पुढाऱ्यांतले वाद आणि रस्सीखेच चालूच होती. असेंब्लीच्या सभागृहांत बॉंब टाकला गेला होता. मीरतचा प्रसिद्ध कम्युनिस्टांचा खटला चालू होता. गांधी गुरफला जातील किंवा नाहीं याबद्दलचीं उलटसुलट मतं ऐकूं येत होतीं. बार्डोलीला विठ्ठलभाई पटेलांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहाची आणि करबंदीची लहानशी चकमक होऊन ती यशस्वी झाली होती. वीर भगतसिंगाला सरकारनं सजा ठोठावली होती. जतींद्रनाथ दास ६४ दिवसांच्या अन्नसत्याग्रहानंतर लखनौच्या तुरुंगांत मरण पावला होता. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं भरणारी लाहोरची कॉंग्रेस जवळ येत होती......

परंतु या घडामोडींकडे आपल्या नित्याच्या सामान्य व्यवसायांत गुरफटलेल्या सामान्य नागरिकांचं असावं इतकंच राजाभाऊचं लक्ष होतं. तो फक्त या

बातम्यांचे वर्तमानपत्रांतले मोठमोठे मथळे पाही आणि ती वर्तमानपत्रं दूर टाकून देई. युद्धांत तो शिरणार नव्हता, मग युद्धाचा रंग कसा बदलत चालला आहे, कोणत्या रणांगणाकडे सैन्याची जमवाजमव होत आहे, देशाचे लहान मोठे सेनापती उघडउघड कायकाय बोलत आहेत आणि मनांतल्या मनांत कोणते डाव योजीत आहेत, इत्यादि गोष्टींचा विचार त्यानं कशाला करायचा? केवळ विचारासाठीं विचार करणं हा त्याचा स्वभावधर्मच नव्हता. मनाला जें पटेल तें केल्याशिवाय राहू नये आणि जी गोष्ट करायची नसेल तिचा विचार करूं नये असंच त्याचं आजपर्यंतचं आयुष्य गेलं होतं; आणि अर्थात् पुढेंही तें तसंच जाणार होतं.

हातीं घेतलेल्या कामांत तो सर्वस्वी मग्न झाला होता. लाला नारायण-प्रसादनीं योजलेला दौरा पूर्णपणें यशस्वी करून दाखविण्याची महत्त्वाकांक्षा त्यानं धरली होती. तो यशस्वी करून दाखविण्यांतहि एक प्रकारचं देशकार्य आहे असं त्याला पहिल्यापासून वाटत होतं; आणि परदेशांतल्या ज्या ज्या शहरीं आपण जाऊं तिथल्या तिथल्या लोकांच्या मनांत, हिंदुस्तान हा कलावंतांचा देश आहे येवढंच नव्हे तर आधुनिक अर्थानंही सर्व प्रकारें जिवंत असा देश आहे, अशी भावना निर्माण करतां येईल तर पहावं अशा दृष्टीनं तो त्या दौऱ्याचा अधिकाधिक विचार करूं लागला होता.

एके दिवशीं माला व नीला यांची रोज चालणारी नाचांची तालीम संपल्या-वर तो म्हणाला,

"तुमचे हे सगळे नाच उत्तमच आहेत त्यांत प्रश्नच नाहीं. पण माझं त्यामुळं समाधान होत नाहीं. राधाकृष्ण, शंकरपार्वती यांखेरीज आम्हा हिंदी लोकांच्या नृत्यकलेला दुसरे विषयच नसावेत?"

यावर कुणीसं म्हटलं,

"पण उदयशंकरनं असल्या नाचावरच लाखों रुपये मिळविले."

हें बोलणाऱ्या गृहस्थांना राजाभाऊचीं उदयशंकरबद्दलची मतं माहीत नव्हतीं. पण लालाजी आणि माला व नीला यांना तीं माहीत होतीं, व उदय-शंकरला ध्येय समजून कुणी दाखला दिला कीं राजाभाऊ किती आवेशानं आणि

कडू बोलतो हें त्यांना माहीत झालं होतं. त्यामुळें त्यांना भीति वाटली, कीं राजाभाऊ आतां त्या गृहस्थांची चांगलीच खरडपट्टी काढणार.

पण तसं झालं नाहीं.

राजाभाऊ फक्त किंचित् हंसून म्हणाला,

" उदयशंकरनं जें केलं तेंच इतरांनीं करावं असं कांहीं कुठं सांगितलं नाहीं ना ? उदयशंकरचे नाच पाहून युरप-अमेरिकेंतले लोक म्हणूं लागले, 'वा वा, किती विक्षिप्त अन् विचित्र आहे हिंदी लोकांची नृत्यकला ! हिंदुस्थान म्हणजे एक मोठा विक्षिप्त देश आहे खरा !' हे उद्गार ऐकण्यांत उदयशंकरला धन्यता वाटली असेल, आम्हांला वाटायची नाहीं. हिंदुस्थान म्हणजे जिथें विषारी नाग आहेत, हिंस्र पशू आहेत, साधूबैरागी, राजयोगी, हटयोगी, गारोडी, मांत्रिक आहेत, देवळांच्या विस्तीर्ण आवारांत अष्टौप्रहर पडून रहाणारे लुळे-पांगळे भिकारी आहेत असा जगाच्या पाठीवरचा सर्वांत विचित्र विक्षिप्त देश, अशी बाहेरच्या राष्ट्रांची आधींच समजूत आहे. भोपळे, तारा, खुंट्या अशा सरंजामाचीं विचित्र वाद्यं दाखवून आणि आमच्या देवतांच्या वेड्यावांकड्या थयथयाटाचं प्रदर्शन करून त्या समजुतींत आम्ही भर घालावी म्हणता ? तसं केल्यानं अलोट पैसा मिळण्यासारखा असला तरी तो नको आम्हांला. 'हिंदी लोकांच्या नृत्यगायनादि कला मोठ्या प्रगल्भ स्वरूपाच्या आहेत, हिंदी लोक आमच्यासारखेंच सुसंस्कृत आणि प्रौढ आहेत, मूर्ख धर्मभोळेपणाला त्यांनींही मूठमाती दिलेली आहे, त्यांनाही समता, बंधुता, स्वातंत्र्य इत्यादि तत्त्वं पटलेलीं आहेत, त्यांच्या समाजांतही राजकीय गोष्टींची अजस्र घडामोड चालू आहे, हिंदी लोक आमच्या बरोबरीचे आहेत.' असं आमचे कार्यक्रम पाहून तिकडल्या लोकांनीं म्हटलं तर त्याचं आम्हांला खरं भूषण. आम्हांला नुसते पैसे मिळवायचे नाहींत. आमच्या मायदेशाविषयीं तिकडच्या लोकमतांत जागृति केल्याचं समाधान आम्हांला मिळवायाचं आहे."

अलीकडे अलीकडे ' लाला नारायप्रसाद यांची योजना,' किंवा ' माला व नीला यांचे कार्यक्रम ' अशी भाषा वापरण्याचीं ' आमची योजना,' ' आमचे कार्यक्रम ' अशी भाषा राजाभाऊ वापरूं लागला होता; व पूर्ण तादात्म्य दर्शविणारं त्याचं तें बोलणं ऐकून लालाजींस व त्यांच्या दोघी मुलींस मोठा संतोष

जाई. दौऱ्याच्या योजनेसंबंधीच्या कांहीं ना कांहीं कामांत तो रात्रंदिवस इतका गढलेला असे, कीं इतकं काम न करण्याबद्दल व आपली प्रकृत्ति संभाळण्याबद्दल ती मंडळी त्याला एखादे वेळीं प्रेमानं इशारा देत. पण तसं कुणी बोललं कीं तो फक्त हंसून म्हणे, 'वास्तविक यापेक्षांहि जास्त काम करायला पाहिजे मला.' त्या दौऱ्याची योजना उत्तम रीतीनं पार पाडायची म्हणजे खरोखरीच किती नाना प्रकारच्या गोष्टींचं अवधान ठेवणं आवश्यक होतं ? वेगवेगळया तऱ्हेच्या नाचांत माला व नीला यांना जोड द्यायसाठीं इतर दहा वीस नर्तक-नर्तिका निवडून नोकरीला ठेवणं जरूर होतं. सारंगी, सरोद इत्यादि देशी वाद्यं आणि व्हायोलिन, मॅंडोलिन, पियानोसारखीं विदेशी वाद्यं वाजविणाऱ्यांचा ताफा सज्ज करायला हवा होता. त्या त्या नाचाला अनुरूप वाटतील असे कपडेलत्ते व देखावे तयार करायला हवे होते. ठिकठिकाणच्या थिएटरवाल्यांशीं आगाऊ करारमदार करणं आवश्यक होतं. वर्तमानपत्राची सहानुभूति आतांपासून मिळविणं जरूरीचं होतं. प्रवासाचा मार्ग, ठिकठिकाणच्या हॉटेलांतल्या सोयी, गाड्यांच्या वेळा इत्यादि गोष्टी योग्य त्या काटकसरीनं आंखून वेळींच निश्चित करायला हव्या होत्या. अशा एक ना दोन, शेंकडों गोष्टींकडे दक्षतेनं लक्ष पुरवायला हवं होतं. या सर्व कामासाठीं करावा लागणारा पत्रव्यवहारच इतका मोठा होता, कीं इतर व्यवधानांपुढें तो दिवसा पार पाडतां आला नाहीं कीं मग पुष्कळदां रात्रीं एक एक, दोन दोन वाजेपर्यंत राजाभाऊ त्याच्याशीं शांतपणें झगडत बसत असे.

एकदां तो असा पत्रं लिहीत बसला असतांना त्याच्या खोलीच्या दारावर टक् टक् आवाज झाला असं त्याला वाटलं, म्हणून त्यानं हात थांबवून विचारलं,

"कोण आहे ?"

दाराबाहेरून उत्तर आलं नाहीं.

पण दार हळूं लोटलं गेलं आणि नीला आंत आली.

किंचित् थबकून तिनं विचारलं,

"ॲम आय ईंट्रुडिंग ? (मी तुमच्या कामांत व्यत्यय तर आणीत नाहीं ?)"

" नॉट इन् द लिस्ट ! ऑन दी कौन्ट्ररी यू आर मोस्ट वेलकम्! (छे छे, उलट तुम्ही आलांत हें पाहून मला फार आनंद होतो. )"

ती मोठ्यानं हंसली व टेबलाजवळ येऊन त्याच्यासमोर उभी राहिली· तिनं आपले दोन्ही हात टेबलाच्या कांठावर टेकले आणि 'केवढा हा पसारा मांडून बसला आहांत !' अशा अर्थाची नजर त्याच्याकडे टाकून मग ती टेबलावरच्या कागदांकडे पाहूं लागली.

तिचे बांधेसूद गोरेपान हात खांद्यापर्यंत उघडे होते. सुकुमारता आणि नृत्यकौशल्यानं अंगी सहज येणारा डौल त्या तिच्या दोन भुजलतांत अगदीं नखाग्रापर्यंत भरला होता. किंबहुना नाचतां नाचतां एखाद्या ठरीव पवित्र्यांत हात टेकावेत अशा प्रकारें तिनं टेकले होते. तिच्या अंगांतल्या वस्त्रानं तिच्या कंठाखालचीही बरीचशी जागा उघडीच ठेवली होती. आणि तें वस्त्र जरी तंग नव्हतं तरी तिच्या वक्षभागाच्या वर्तुलाकृती रेषा त्या वस्त्रावर टिचून अस्पष्ट उठल्या होत्या......

या दृश्यावरून नजर काढून राजाभाऊ तिला, खुर्चीवर बसायला सांगणार होता इतक्यात तीच म्हणाली,

" किती वेळ काम करतां आहांत ? किती वाजले माहीत आहे का ? "

" किती ? "

" तुमच्या खोलींतलं घड्याळ कुठें आहे ? "

" तें काय, त्या समोरच्या टेबलावर आहे कीं. "

नीलानं वळून पाहिलं तों टेबलावरचं घड्याळ उलटं फिरवून ठेवलेलं तिला दिसलं.

तिनं आश्चर्यानं विचारलं,

" हें काय, घड्याळ ठेवायची ही काय रीत ? "

" खूप काम करायचं असलं, कीं माणसानं घड्याळाची आठवण अशीच बुजवली पाहिजे. "

" छे छे, तुम्ही असे श्रम करणं बरं नाहीं. एक एक, दोन दोन वाजे-पर्यंत जागायचं म्हणजे काय ? "

"पण दिवसा काम उरकत नाहीं सगळं त्याला मी काय करूं? पत्रं तर महत्त्वाचीं असतात."

"मग पिताजींकडून मदतीला नोकर मागून घ्या—नाहीं तर खरंच असं करा—"

"काय करूं?"

"मला घ्या हाताखालीं कारकून म्हणून."

"छे छे, असला नाचरा कारकून माझ्या काय कामाचा? पत्रं कांहीं पायांनीं लिहायचीं नसतात, हातांनीं लिहायचीं असतात."

"म्हणजे? तुम्हीं तोंडानं सांगितलं तर मला पत्रं टाइप करतां यायचीं नाहींत असं तुम्हांला वाटतं कीं काय?"

"वाटत नाहीं, खात्री आहे माझी."

"हो कां, मग हें आव्हान मला स्वीकारलंच पाहिजे. सांगा पाहूं एक पत्र मला. हं, सांगा."

असं म्हणून खुर्चीत बसून तिनं टेबलावरच्या टाइपरायटरचं तोंड वळवून घेतलं आणि त्यांत एक नोटपेपर घालायला सुरवात केली.

पण ती साधी गोष्टही कशी करावी तें तिला माहीत नव्हतं. कागद यंत्राच्या बाहेर आला तो वाकडा तिकडा आला आणि फाटलासुद्धां!

राजाभाऊ हंसूं लागला......

नीला म्हणाली, "हंसूं नका. खरंच येतं मला टाइप करतां. बरेच दिवस झाले त्यामुळं कागद कसा सरकवायचा तें विसरलें. तो सरकवून द्या अन् मग पहा तरी."

"असं का?" असं म्हणून राजाभाऊनं कागद बसवून दिला आणि पत्र सांगण्यास सुरवात केली:—

टू दि मॅनेजर, टिवोली थिएटर ब्रॉड्वे, न्यूयॉर्क, डिअर सर, वुइ हॅव टु ॲक्नॉलेज......

नीलानं एकदम ओरडून म्हटलं,

"हं हं, थांबा, किती घाईनं सांगतां? माझा अजून 'मॅनेजर' शब्द पुरा

व्हायचा आहे. अन् अगबाई हें काय? 'एम्' या अक्षराऐवजीं प्रश्नचिन्ह पडलं आहे, अन् 'ए' च्या ऐवजीं 'एस'! माझीं बोटं चुकलीं वाटतं? हें तुमचं मशीन कांहीं नव्या तऱ्हेचं आहे कां?"

"हो हो, अगदीं नव्या तऱ्हेचं आहे! अन् हें वापरण्याबद्दल कंपनीनं कायदे केले आहेत, तेसुद्धां अगदीं नव्या तऱ्हेचे आहेत!"

"ते कोणते कोणते?"

"कायदा नंबर एक, स्त्रियांना उगीच यंत्राशीं खेळूं द्यायचं नाहीं."

नीला तोंडाला हातरुमाल लावून मनःपूर्वक हंसली व म्हणाली,

"असं कां? मग थांबा हं, पिताजींनाही मी कांहीं नवे कायदे करायला सांगतें. कायदा नंबर एक, मॅनेजरसाहेबांनीं रात्रीं दहा साडेदहाच्यापुढें जागायचं नाहीं. जागायचं झाल्यास, त्यांनीं नीलाची परवानगी घेतली पाहिजे."

हें म्हटल्यावर तिचं तिलाच स्वतःचं हंसू अनावर झालं; पण हंसणं मध्येंच थांबवून तिनं एकदम गंभीर चर्येनं विचारलं,

"खरं सांगा, मीं जर एखादी गोष्ट तुम्हांला सांगितली तर ती तुम्ही ऐकणार नाहीं?"

"वाजवी असेल तर ऐकेन. कुणाचीही ऐकेन. लालजींची ऐकेन, जयमालाबाईंची ऐकेन—"

"पण त्यांच्यापेक्षां माझ्या सांगण्याचं विशेष कांहीं वाटायचं नाहीं तुम्हांला?"

"म्हणजे काय नीलाबाई?

"म्हणजे......म्हणजे......

पुढचे शब्द तिच्या तोंडावाटे निघेनात.

ती गोंधळली, गुदमरली, गोरीमोरी झाली, आणि स्वतःशीच कांहीं विचित्र उद्गार काढून ती खोलींतून झटकन निघून गेली!

राजाभाऊनं क्षणभर दाराकडे पाहिलं आणि मग टाइपरायटर सरळ वळवून घेऊन त्यांत दुसरा नोटपेपर सरकवून तो टाईप करूं लागलाः—

"टू

दि मॅनेजर

टिवोली थिएटर......"

*          *          *

एके दिवशीं सकाळीं भिंतीवरच्या कॅलेंडरकडे पहातांच राजाभाऊ स्वतःशीच उद्गारला.

"अरे बापरे, डिसेंबरची पहिली तारीख!"

किती झरकन् गेले होते पांच सहा महिने! आणि आतां किती थोड्या अवधींत किती तरी गोष्टी करायच्या होत्या!......

गेल्या दोन तीन महिन्यांत वेळोवेळीं ज्या बातम्या, लहान लहान संपादकीय स्फुटं, जयमाला व नीलांबरी यांचे फोटो वारंवार प्रसिद्ध झाले होते त्यावरून 'जयमाला डान्सर्स' नांवाची मंडळी स्थापन झाली असून ती लवकरच युरप-अमेरिकेच्या दौऱ्यावर जाणार आहे ही गोष्ट लोकांना माहित झाली होती. लहानमोठ्या मासिकांत, क्लबांत, नाटकगृहांत, गाण्याच्या बैठकींत, घरोघरीं लोक त्या विषयाची चर्चा करीत होते.

'जयमाला डान्सर्स' ही मंडळी परदेशच्या दौऱ्यावर जाण्यासाठीं १९३० च्या मे महिन्यांत हिंदुस्तानचा किनारा सोडणार होती. पण त्याच्या आधीं ती स्वस्थ बसून रहाणार नव्हती. राजाभाऊनं ठरविलेल्या कार्यक्रमाप्रमाणे या मंडळीचा पहिला जाहीर प्रयोग मुंबईस ता. १५ डिसेंबर १९२९ रोजीं व्हायचा होता. त्यानंतर काँग्रेसच्या अधिवेशनाची संधि साधून नाताळांत लाहोर शहरीं मंडळी कार्यक्रम करणार होती. नंतर दिल्ली, कलकत्ता, मद्रास इत्यादि प्रमुख शहरीं दोन तीन महिन्यांचा दौरा काढून मंडळी परत मुंबईस येणार होती, आणि दीड दोन महिने सर्व प्रकारची तयारी पूर्ण करण्यांत घालवून अखेर परदेशास जायला निघणार होती.

आज डिसेंबरची पहिली तारीख होती ! म्हणजे मंडळींच्या पहिल्या जाहीर कार्यक्रमाला आतां अवघा पंधराच दिवसांचा अवकाश उरला होता.

राजाभाऊच्या जिवाची अगदीं धांदल उडाली; व त्याच्या धांदलीचा संसर्ग माला व नीला यांजपासून तो देखावे तयार करणाऱ्या चिताऱ्यापर्यंत सर्वांना लागावा अशा तऱ्हेनं तो त्या दिवसापासून वागूं लागला. मुंबईच्या पहिल्या जाहीर कार्यक्रमाचं केवढं महत्त्व आहे हें तो ज्याला त्याला समजावून सांगू लागला. सर्वांच्या ठिकाणीं उद्योगाची हौस आणि सहकार्याची तत्परता सतत जागृत रहावी म्हणून तो झटूं लागला. सगळ्यांना तो पुन:पुन्हां म्हणे, ‘ आपण पन्नास साठ मंडळी म्हणजे एक कुटुंब आहोंत हें लक्षांत ठेवा. आणखी पांच महिन्यांनीं आपण हिंदुस्तानचा किनारा सोडला, कीं मग दीड दोन वर्षं आपण सगळी एकत्र रहाणार आहोंत. तेव्हां आपण सर्वांनीं आतांपासूनच जणूं आपण एका कुटुंबांतली माणसं आहोंत अशा भावनेनं वागायला लागलं पाहिजे. जयमाला व नीला यांना तर तो पुष्कळदां लहानशीं व्याख्यानं देई. त्यांच्या सतत उद्योगावर आणि आत्मविश्वासावर दौऱ्याचं खरं यश कसं अवलंबून आहे तें तो परोपरी सांगे. केवळ देवदेवतांच्या विषयांचे ठरीव नाच न बसवतां आधुनिक हिंदुस्तानाच्या भावना व महत्त्वाकांक्षा ज्यांत प्रतीत होतील असे विषय त्यानं स्वतः चतुराईनं निवडून नृत्यशिक्षकाकडून त्या कल्पनांना पोषक असे नवेनवे नाच बसवून घ्यायची त्यानं खटपट केली होती. या नव्या तऱ्हेच्या नृत्यांबद्दल उगीच वायफळ टीका करायला कुणाला संधि मिळूं नये म्हणून तालमीच्या वेळेस सक्त एकांत राखला जावा अशी व्यवस्था त्यानं केली होती; पण तो स्वत: मात्र कठोर टीकाकारांचं काम वारंवार करी. या टीकेनं कुणाचा उल्हास कमी होऊं नये अशी खबरदारी तो अर्थातच घेत असे. जयमाला व नीलांबरी यांनीं आपली उल्हासित वृत्ति कधींहि सोडतां कामा नये असं तो त्यांस पुन:पुन्हां सांगे. टीका ऐकून त्यांच्या चर्येवर नाराजी दिसली तर कांहीं विनोद करून अथवा कुणाची तरी गोष्ट सांगून तो त्यांना हंसायला लावी.

जयमालेपेक्षां नीलांबरी अधिक हळुवार मनाची आणि कठोर टीकेनं

चटकन् खिन्न व हताश होणारी आहे असं त्याला आढळून येई, व मग तिला प्रसन्न करण्याचे नाना तऱ्हेचे उपाय करावे लागत.

ती म्हणे, "माझ्या हातून किती चुका होतात हें तुमच्याकडून कळलं म्हणजे मला पुष्कळदां वाटतं, या मोठया साहसांत कशाला मी पडते आहे? एकटी माला नृत्य करील तर फार बरें होईल. खरंच, मला वगळलंत तर नाहीं चालायचं का? मालासारखे गुण माझ्या अंगांत नाहींत."

राजाभाऊ आपली तर्जनी वर उचलून नाकासमोर धरी व म्हणे,

"स्! हं, नीलाबाई, असलं कांहीं एक बोलायचं नाहीं अं. पुष्कळदां अंगचे गुण ज्याचे त्याला कळत नाहींत. तुमच्या अंगीं किती कौशल्य अन् बुद्धिचातुर्य आहे तें तुम्हांला माहीत नसेल इतकं मला माहीत आहे."

हें ऐकतांच तिच्या तोंडावर विलक्षण प्रकाश खेळूं लागे व ती हंसत विचारी,

"खरं?"

"हो. मी तुमचे दोष दाखवितो ते तुम्ही नाउमेद व्हावं म्हणून कां बरं?"

हें विचारतांना त्याच्या चर्येवर आर्जवाचं अस्पष्ट पण किती मधुर स्मित नीलाला दिसूं लागे! त्यानं तिला स्पर्श केला नसतांही जणूं तो आपल्याला प्रेमभरानं खांद्यावर थोपटतो आहे असा तिला भास होई.

ती म्हणे, "नाहीं, तसं नाहीं. पण मला वाटतं, मी वृत्तीनं थोडीशीं भेकड आहे."

"छे छे, तुम्ही स्वतःला असं वाटूं देतां हीच तुमची चूक आहे."

या त्याच्या वाक्याचं तिला मोठं कौतुक वाटे, व मग ती मनःपूर्वक हंसे.

ती हंसली कीं तो तिच्यापासून दूर होई व दुसऱ्या कामाला लागे. जणूं आपल्या जबाबदारींतलं एक काम संपलं, आतां दुसरं असं त्याला वाटूं लागे. आतां पुन्हां नीलांबरी आपल्या टीकेला बिचकणार नाहीं असा तो मनाशीं हिशोब करी.

पण त्याचा हिशेब चुकत असे. पुन्हां एखाद्या दिवशीं टीका करतांच नीलांबरी खिन्न होई, आणि तिच्या मनाची प्रसन्नता पुन्हां प्रस्थापित करण्या-साठीं त्याला तिच्याशीं बोलत बसावं लागे. तो मनाशीं आश्चर्य करी, ही मुलगी असं काय वेड्यासारखं करते ?

त्याला काय माहीत, कीं त्यानं आपल्याजवळ बसावं आणि गोड गोड बोलावं म्हणून नीला पुनः पुन्हां मुद्दामच तें वेड पांघरीत असे ?



# [ २९ ]

'जयमाला डान्सर्स 'चा मुंबईचा पहिला जाहीर कार्यक्रम अत्यंत यशस्वी रीतीनं पार पडला. जिकडून तिकडून त्यांच्या नृत्यावर स्तुतीचा वर्षाव झाला. लाला नारायणप्रसाद यांना मोठी धन्यता वाटली, आणि आपण जी योजना मनाशीं केली ती यशस्वी होणार याबद्दल त्यांना शंका उरली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं चहाच्या बैठकींत ते एकदम उठून उभे राहिले आणि एखाद्या सभेंत भाषण करावं तसं करून त्यांनीं राजाभाऊचे आभार मानले. भाषण संपवून त्यांनीं राजाभाऊला विचारलं.

" आम्ही सर्वजण तुमचे फार आभारी आहोंत. आमची कृतज्ञता आम्ही कशी व्यक्त करावी ? तुम्हांला कांहीं तरी भेट द्यायची माझी इच्छा आहे. काय देऊं ? "

राजाभाऊ खालीं पहात गप्प बसला.

पण त्याला काय भेट द्यावी याची चर्चा ती मंडळी करूं लागली. जय-माला, नीलांबरी यांनीं आपापल्यापरी सूचना केल्या. माताजींनीं सुचविलं, कीं 'एक मूल्यवान् खड्यांची आंगठी राजाभाऊला द्यावी.

राजाभाऊनं वर मान करून म्हटलं,

" माताजी, आपणांला माहितच आहे कीं, मी एक साधा माणूस आहे. मला अलंकारांचा अगर कपड्यालत्त्यांचा षोक मुळींच नाहीं. अन् मला एखादी वस्तू आपण देणगी म्हणून द्यावी असा आपल्या माझ्यांत परकेपणा आहे का बरं? तुमचं माझ्यावर प्रेम आहे तें सदा असूं द्या म्हणजे झालं—"

माताजी म्हणाल्या—

पण त्या काय म्हणाल्या तें इतरांनीं ऐकलं. नीलानं नाहीं!

ती राजाभाऊच्या सुंदर चर्येकडे टक लावून पहात राहिली.

मी एक साधा माणूस आहे!

खरंच तो किती साधा होता! त्याच्या भोंवतालचीं सारीं माणसं भारी किंमतीचे ऐटबाज कपडे घालून मिरवीत असत, पण नीलाला तो प्रथम दिसला तेव्हां त्याच्या अंगावर जी जाडीभरडी खादी होती तीच अजूनही होती. परदेशांतही आपण खादीच वापरणार असं त्यानं बोलून दाखविलं होतं. 'खादीवर तुमची श्रद्धा आहे का?' असं नीलानं त्याला एक दिवस विचारलं तेव्हां त्यानं चक्क नाहीं म्हणून सांगितलं होतं. त्यावेळीं हा तरुण पुरुष मोठा विचित्र असला पाहिजे असं ती मनाशीं म्हणाली होती. आणि खादीच्या पोशाखांतही इतर सर्वांपेक्षां तो किती तरी अधिक ऐटबाज दिसतो, असंही तिला वाटलं होतं......

ती त्याच्याकडे सारखी पहात राहिली.

इतरांचं जें भाषण चाललं होतं तें तिला ऐकूंच आलं नाहीं.

राजाभाऊच्या तोंडचे अखेरचे शब्द तिच्या कानांत घुमत होते. 'तुमचं माझ्यावर प्रेम आहे तें सदा असूं द्या म्हणजे झालं.'

त्या दिवशीं रात्रीं शय्येवर पडल्यापडल्या रेशमी आभ्रयाची मऊमऊ उशी वक्षस्थलाशीं बिलगून धरून तिनं कितीदां तरी नाटकांतलं एखादं वाक्य पाठ करण्यासाठीं उच्चारावं त्याप्रमाणं म्हटलं,

" तुमचं माझ्यावर प्रेम आहे तें सदा असूं द्या म्हणजे झालं. "

राजाभाऊ तुम्ही मला असं केव्हांच म्हणणार नाहीं का ?...

*　　　　*　　　　*

' जयमाला डान्सर्स ' चा लाहोरचा मुक्काम काँग्रेसच्या अधिवेशनाच्या सुमारास ठेवण्यांत राजाभाऊनं किती उत्तम धोरण दाखविलं होतं तें तिथल्या मुक्कामाच्या पहिल्याच रात्रीं उघड झालं. कार्यक्रमाच्या दिवशीं संध्याकाळींच तिकिटविक्री अजिबात बंद ठेवावी लागली. मंडळीच्या मुंबईच्या पहिल्या प्रयोगाचीं सचित्र वर्णनं जिकडल्या तिकडल्या इंग्रजी व देशी वर्तमानपत्रांत येऊन गेलीं होतीं, व प्रसिद्ध स्त्रीपुरुषांनीं प्रयोगाबद्दल काढलेले प्रशंसोद्गार जिकडे तिकडे छापले गेले होते. काँग्रेसच्या निमित्तानं लाहोर शहरीं जमलेल्या हिंदुस्तानाच्या सर्व प्रांतांतील लोकांना ' जयमाला डान्सर्स 'बद्दल अनुकूल जिज्ञासा वाटत होती. एक दिवसाआड होणाऱ्या प्रत्येक प्रयोगाला प्रेक्षकांची अतिशय गर्दी झाली. काँग्रेसच्या पुढाऱ्यांपैकीं बरीच मंडळी राजाभाऊच्या परिचयाची होती. त्यांना राजाभाऊनं आग्रहानं आणून प्रयोग दाखविला. इतकंच नव्हे, तर काँग्रेस संपल्यानंतर काँग्रेसचे अध्यक्ष जवाहरलाल नेहरू यांनासुद्धां योग्य माणसं मध्यस्थीला घालून आणण्यास त्यानं कमी केलं नाहीं. या सर्व मंडळींनीं ' जयमाला डान्सर्स 'ची मुक्तकंठानं स्तुति केली; आणि जवाहरलाल नेहरू यांनीं तर संतोषानं असा अभिप्राय व्यक्त केला, कीं ' हिंदी नृत्यकलेचं प्राचीन स्वरूपच केवळ दाखविण्यापेक्षां त्या कलेला आजमितीचं आधुनिक जिवंत असं कांहीं तरी स्वरूप आहे हें जगाला दाखविण्याचा जो उपक्रम ' जयमाला डान्सर्स ' नीं केला आहे तो अत्यंत मनोहर व अभिनंदनीय आहे. '

हा अभिप्राय वाचून राजाभाऊला अतिशय आनंद झाला. माला व नीला यांना तो पुन:पुन्हां म्हणूं लागला,

" जगानं तुमची कशी स्तुति केली म्हणजे मला खरा संतोष होईल त्याचा हा नमुना आहे. हिंदुस्तानची विस्मृत झालेली नृत्यकला आपण जगापुढें मांडतों आहोंत असं कुणी म्हटलं तर त्यांत मला विशेष समाधान वाटत नाहीं. आमची नृत्यकला कधीच नामशेष झाली नाहीं; ती आजही जिवंत आहे अन् तिचंही आधुनिक प्रगट असं कांहीं तरी स्वरूप आहे असं तुमचे नाच पाहून लोकांनीं म्हटलं तरच मला खरी धन्यता वाटेल. तुम्ही दोघींनीं हिंदुस्तानच्या राष्ट्रपतीकडून शाबासकी मिळविली. आतां पुढचा प्रवास सोपा आहे."

रात्रीं निजण्यासाठीं तो आपल्या खोलींत गेला तेव्हां एका टेबलावर वर्तमानपत्राचा ढीग पडला होता. गेल्या आठ दिवसांत लाहोरच्या स्थानिक वृत्तपत्रांत जयमाला ' डान्सर्स ' ची जाहिरात व्यवस्थितपणें आणि नियमितपणें छापून येत आहे कीं नाहीं हें तपासण्यापुरती त्यानं त्याकडे दृष्टि टाकली होती. पण आज यावेळीं तो विशेष आनंदांत आणि स्वस्थचित्त होता. कॉंग्रेसच्या अधिवेशनांत कोणते कोणते ठराव झाले तें पहाण्याचं मनांत येऊन तो अंथरुणावर पडल्या पडल्या गेल्या आठ दिवसांतलीं वर्तमानपत्रं वाचून पाहूं लागला—

डॉ. सप्रूंच्या मध्यस्थीनं व्हाइसरॉय लॉर्ड आर्विन आणि गांधी, नेहरू व मालवीय यांची मुलाखत होणार होती !

या मुलाखतींत कांहीं तरी समेटाचं धोरण निष्पन्न होऊन लवकरच होणाऱ्या लंडन येथील गोलमेज परिषदेला गांधी वगैरे हिंदी राष्ट्रीय पुढारी जातील अशी आशा वाटत होती.

पण ता. २३ डिसेंबर रोजीं दौऱ्यावर परत येणाऱ्या व्हाइसरॉयच्या गाडीखालीं नव्या दिल्लीच्या स्टेशनजवळ बॉंबचा स्फोट झाला ! त्याच रात्रीं व्हाइरॉयच्या बंगल्यावर त्यांची व राष्ट्रीय पुढाऱ्यांची जी मुलाखत झाली तिच्यांत आशेचा भोपळा फुटला !

जवाहरलाल नेहरू यांचं अध्यक्षीय भाषण मुद्देसूद आणि सडेतोड झालं. त्यांनीं स्पष्ट विधान केलं, कीं 'मी स्वतः समाजसत्तावादी व लोकसत्तावादी आहे. राजे व संस्थानिक यांच्यावर माझी काडीचीही श्रद्धा नाहीं'; आणि भाषणाच्या

अखेरीस ते म्हणाले, 'आपण काय व केव्हां मिळवूं शकूं हें आपणापैकीं कोणासहि सांगतां येणार नाहीं. यशावर आपण अधिकार गाजवूं शकत नाहीं. पण 'साहसे श्रीःप्रतिवसति।' जे धैर्य दाखवितात व कार्य करतात त्यांनाच यश मिळतं. जे परिणामाविषयीं घाबरतात त्या भेकडांकडे यश क्वचितच वळतं. आपण फार मोठा पैजेचा डाव टाकला आहे. जर महान् गोष्टी मिळविण्याचें आपले प्रयत्न असतील, तर त्या गोष्टी महान् संकटांतूनच प्राप्त करून घ्याव्या लागतील!'

कॉंग्रेसचा मुख्य ठराव तिच्या ध्येयाबद्दल होता. 'पूर्ण स्वातंत्र्य' हेंच हिंदुस्थानाचं ध्येय आहे असं निःसंदिग्ध शब्दांत जाहीर करण्यांत आलं होतं.

कायदेभंगाच्या व करबंदीच्या चळवळीला सात वर्षांपूर्वी घातलेलं कुलुप कॉंग्रेस आतां लवकरच उघडणार असं दिसत होतं. कारण, मुख्य ठरावाच्या अखेर स्पष्ट शब्द होतें कीं, 'ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला योग्य वाटेल त्या वेळीं सविनय कायदेभंगाच्या व करबंदीच्या चळवळीस सुरवात करण्याचा अधिकार त्या कमिटीला ही सभा देत आहे.'

वर्तमानपत्रं वाचून झाल्यावर राजाभाऊनं तीं बाजूला ठेवलीं पण त्यानं दिवा मालवला नाहीं. वर छताकडे पहात स्वतःच्या अंतःकरणांतलें विचार तो आंवरीत राहिला.

पूर्ण स्वातंत्र्याची घोषणा कॉंग्रेसनं केली होती!......

राखेखालीं सात वर्षं धुमसत राहिलेला राजकीय चळवळीचा अग्नि पुन्हां प्रज्वलित होत होता! सरकारी दडपशाहीचे झंझावातही जिकडून तिकडून घोंघावूं लागणार होते. धरपकड, खटले, शिक्षा, लाठीहल्ले, गोळीबार या प्रकारांना ऊत येणार होता. त्यांना उद्देशूनच बहुतेक जवाहरलाल नेहरूंनीं उद्गार काढले होते, '......त्या गोष्टी महान् संकटांतूनच प्राप्त करून घ्याव्या लागतील!'......

आणि महान् संकटांना तोंड द्यायची लोकांची तयारी होती यांत संशय नव्हता!

१९२२ सालीं बार्डोलीच्या रणभूमीवर उतरण्यास सत्याऐंशी हजार सैनिक तयार झाले होते. आतां कदाचित् सत्याऐंशी लक्ष सैनिक काँग्रेसच्या आज्ञेची वाट पहात असतील.

आणि देशांत रणधुमाळीची अशी तयारी चालली असतांना तो स्वतः हिंदी नृत्याचा प्रचार करण्यांत गुंतला होता !......

हें त्याला शोभत होतं काय ?......

हेंच त्याचं कर्तव्य होतं काय ?......

त्यानं हातीं घेतलेल्या कामांतही देशसेवेचा भाग नव्हता असं नाहीं. पण सैनिकाला शोभणारी देशसेवा ती खचित नव्हती ! लवकरच त्याचे हजारो देशबांधव 'पूर्ण स्वातंत्र्य हें आमचे ध्येय आहे' अशी घोषणा करीत प्रसंग पडल्यास बंदुकीच्या गोळीपुढें आपली छाती उघडी करणार होते !......आणि तो !......तो परदेशांत जाऊन 'ही आमची नृत्यकला !' अशी घोषणा करीत रंगमंदिरापुढें उभा राहणार होता !

हेंच त्याचं कर्तव्य काय ?

त्याचं खरं कर्तव्य कोणतं ?

त्या रात्रीं राजाभाऊला नीट झोंप येणं शक्य नव्हतं. त्याच्या स्वभावांतल्या दोन मूलभूत वृत्ती एकमेकांशीं झगडत होत्या, आणि त्याच्या मनोभूमीवर चाललेला तो झगडा एखाद्या तिऱ्हाइत प्रेक्षकांप्रमाणें तो पहात होता.

\+ + +

दुसऱ्या दिवशीं लाहोरहून दिल्लीस मुक्काम हलविण्याच्या गडबडींत त्याचा बहुतेक वेळ गेला. संध्याकाळच्या सुमारास कुणालाही न सांगतां तो सार्वजनिक बागेकडे गेला. तिथें एकांत जागा शोधून हिरव्या गवतावर घटकाभर खुशाल डोळे झाकून उताणं पडावं असा त्याचा बेत होता. बागेंत शिरल्यावर जिथें लोकांची रहदारी होती त्या वाटिका त्यानं ओलांडल्या, आणि अखेर पूर्वेकडच्या कोपऱ्यावर कुंपणाआड एक मोठा वृक्ष दिसला त्याखालीं बसावं अशा हेतूनं तो तिकडे जाऊं लागला.

पण तो जवळ गेला तों त्या झाडाखालीं एक युरोपियन स्त्री पुस्तक वाचीत बसलेली त्याला दिसली.

तो दुसरीकडे वळणार होता तितक्यांत ती स्त्री कोण आहे हे त्याच्या लक्षांत आलं; आणि तो जवळ जाऊन म्हणाला,

" गुड ईव्हिनिंग मिस शूबेर्ट ! "

मॅग्डानं वर पाहिलं व ताबडतोब त्याला ओळखून हंसत व त्याच्या हातीं देण्यासाठीं आपला हात वर करीत म्हटलं,

" आ ! यू ! व्हॉट ए बिग प्लेझंट सर्प्राइज ! कम् कम् लेटस हॅव ए जॉली गुड चॅट. "

हें म्हणतां म्हणतां ती अंमळ सरकली आणि त्यानं आपल्याजवळ बसावं अशा अभिप्रायानं शेजारची जागा उजव्या हातानं थोपटली. तिनं राजाभाऊची हकीगत विचारून घेतली, त्याच्या नवीन उद्योगाबद्दल संतोष व्यक्त केला, व आपलीही हकीगत सांगितली.

तीं दोघं पुरता सूर्यास्त होईपर्यंत बोलत बसलीं.

मध्यंतरीच्या कालांत तिनं पुष्कळ प्रवास केला होता. नानातऱ्हेचीं देवळं पाहिलीं होतीं. ठिकठिकाणच्या शिल्पांची चित्रं तयार केलीं होतीं. हिंदी लोकांत ती शक्य तितकी मिसळली होती, लोकांचे आचारविचार तिनं पाहिले होते. लोकांना आज काय पाहिजे आहे त्याचं सूक्ष्म निरीक्षण केलं होतं. सामान्य लोक दारिद्र्याला कंटाळून असंतुष्ट झालेले तिला दिसले होते. मध्यम वर्गाच्या लोकांतही असंतोष वाढत असलेला तिला आढळला होता. श्रीमंत लोकांत ती फारशी मिसळली नव्हती; पण ते लोक सोडले, तर सामान्यतः सारा हिंदुस्तान देश मनांतल्या मनांत प्रक्षुब्ध झाला असून कसल्या तरी मोठ्या समरप्रसंगाची तयारी करीत आहेत याबद्दल तिची खात्री झाली होती. कॉंग्रेसला हजर राहण्यासाठीं ती मुद्दाम लाहोरला आली होती; व कॉंग्रेसचं अधिवेशन पाहून तिच्या मनावर फार मोठा परिणाम झाला होता.

या सर्व गोष्टी उत्साहानं भराभरा सांगून तिनं राजाभाऊला विचारलं,

" तुमची राजकीय चळवळ यशस्वी होईल असं तुम्हांला वाटतं कां ?"

राजाभाऊ म्हणाला,

"नेहरूंचं भाषण तुम्हीं ऐकलंत ना ? ते आपल्या भाषणाच्या शेवटीं काय म्हणाले ते तुम्हांला आठवतं कां ? यशावर कुणी सत्ता चालवूं शकत नाहीं. पण जे साहस करतात त्यांना यश बहुधा मिळतंच."

मॅग्डा मान हालवीत म्हणाली,

" यस, दे वेअर सम् ऑफ द फायनेस्ट वर्डस आय एव्हर हर्ड ! आमच्या देशानं पंधरा सोळा वर्षांपूर्वी महायुद्ध पुकारलं तेव्हां कायसरनं हाच संदेश साऱ्या राष्ट्राला सांगितला होता. आणि तो ऐकताच राष्ट्रांतल्या एकूण एक पुरुषानं सैनिकाचा वीरवेष अंगावर चढविला होता."

" एकूण एक ? "

अर्धवट स्वतःशींच राजाभाऊनं उद्गार काढला.

मॅग्डाला वाटलं, त्यानं संशयानं प्रश्न केला. ती म्हणाली,

" होय, एकूण एक. "

त्या दिवशीं रात्रीं व नंतर दुसऱ्या दिवशीं दिल्लीच्या गाडींत बसल्यावरही तो पुनःपुन्हां मनाशीं स्वतःचा प्रश्न आणि मॅग्डाचं उत्तर घोकीत होता. ' एकूण एक ? '...... ' होय, एकूण एक. '

\+ + +

दिल्ली व कलकत्ता येथील ' जयमाला डान्सर्स'चे प्रयोग इतर ठिकाणांप्रमाणेंच संपूर्ण यशस्वी झाले. वृत्तपत्रांचे संपादक, राजकीय पुढारी, नामांकित कवी, गायनवादनांतले दर्दी लोक, सगळ्यांची मुक्तकंठ प्रशंसा आणि पैसाही मिळवून मंडळी परत मुंबईस आली.

आतां दोन महिने परदेशच्या दौऱ्याच्या तयारीची पूर्णता करण्यांत घालवून मंडळी हिंदुस्तान सोडणार होती.

पण मुंबईच्या पुष्कळ मंडळींचा आग्रह सुरू झाला, की, परदेशांत जायला निघण्यापूर्वी ' जयमाला डान्सर्स ' नीं मुंबईस दोन प्रयोग तरी

करावेत. असे प्रयोग केल्यास उत्पन्न सपाटून होईल हें उघड दिसत होतं. पण राजाभाऊच्या मतानं पैसा ही कांही विचारांत घेण्याची एकच बाब नव्हती. अमेरिकेच्या लोकांना जें आपण दाखविणार त्याची अगदीं परमावधीची उत्कृष्ट तयारी करणं ही अधिक महत्वाची गोष्ट होती. दौऱ्याला निघण्यापूर्वी मंडळींतल्या प्रत्येक माणसाला थोडी विश्रांति देणंही आवश्यक होतं. शिवाय, दोन जाहीर प्रयोग करून नंतर निघायचं म्हणजे एकंदर कामाचा पसाराही वाढणार होता. पण इष्टमित्रांचा आणि चहात्यांचा अतिशयच आग्रह पडला आणि शेवटीं राजाभाऊला आपला हट्ट सोडावा लागला. मार्च महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत 'जयमाला डान्सर्स'चे दोन प्रयोग मुंबईंत व्हावेत असं नक्की ठरलं.

राजाभाऊच्या धांदलीला आतां सीमा उरली नव्हती. नानाप्रकारचीं कामं उरकतां उरकतां त्याला आतां क्षणाचीही फुरसत उरेना. दिवसभरच्या कामानं तो इतका शिणून जाई, कीं कधीं कधीं एकटं कुठं तरी स्वस्थ बसावं अशा इच्छेनं कुणालाही न सांगतां संध्याकाळच्या वेळीं तो मोटारींत बसे आणि कुठें तरी नाहींसा होई.

एके दिवशीं तो असा नाहींसा झालेला असतांना लाला नारायणप्रसादांच्या बंगल्यावर एक स्त्री आली व विचारूं लागली,

"जयमाला डान्सर्स मंडळीचे मॅनेजर इथेंच असतात ना?"

नोकरानं सांगितलं, "हो."

"त्यांचं नांव राजाभाऊच ना?"

"हो."

"ते मला भेटतील का?"

"नाहीं."

"आतां नाहीं तर केव्हां भेटतील?"

"केव्हांच नाहीं."

"म्हणजे काय?"

"म्हणजे तुम्हांला ते केव्हांही भेटणार नाहींत."

" का ? "

" कारण, त्यांचा तसा सक्त हुकूम आहे. कुणी नोकरी मागायला आलं तर भेट होणार नाहीं—"

" असं असं. पण तुमचा गैरसमज होतो आहे. मला नोकरी नको आहे."

" मग काय हवं आहे ? "

" मला त्यांची भेट हवी आहे. माझी त्यांची पूर्वीची फार ओळख आहे, अन् म्हणून त्यांना मला भेटायचं आहे."

" मग तुम्ही उद्यां सकाळीं या. आत्तां ते घरांत नाहींत."

" कुठें गेले आहेत ? "

" सांगून गेले नाहींत."

" पण थोड्या वेळानं परत येतीलच कीं नाहीं ? तुमची हरकत नसेल तर मी त्यांची वाट पहात बसतें."

" बसा "

असं म्हणून नोकर तिला पुढच्या दिवाणखान्यांत बसविणार होता. पण तितक्यांत जयमाला व नीलांबरी आपल्या मैत्रिणींना घेऊन आलेल्या त्याला दिसल्या, व त्या बहुतेक दिवाणखान्यांत बसतील असं वाटून त्यानं त्या स्त्रीला राजाभाऊच्या कचेरीच्या खोलींत बसवलं.

तो नोकर कांहींसा विसराळू होता. दिवेलागणी झाल्यावर त्या स्त्रीला राजाभाऊच्या खोलींत आपण बसविलं आहे, तिथला दिवा लावून यायला पाहिजे हें स्मरण त्याला राहिलं नाहीं. त्या स्त्रीनंही उठून दिव्याचं बटन ओढलं नाहीं. ती अंधारांत तशीच बसून राहिली. तिला तसं बसणं कसं आवडलं कुणास ठाऊक ?

राजाभाऊ परत आला तेव्हां ज्या नोकरानं तिला बसायला सांगितलं होतं तो कुठें कामाला गेला होता. दुसऱ्या नोकरांना त्या स्त्रीबद्दल सांगून ठेवायचं तो विसरला होता.

राजाभाऊ सरळ आपल्या खोलींत गेला. पण त्यानंही दिवा लावला नाहीं. अंधारांतच त्यानं आपल्या कोटाच्या खिशांतले कागद काढून टेबलावर टाकले, आणि तो खुंटीवर कपडे ठेवूं लागला.

जयमालेच्या जलद लयींतल्या एका नाचाला योग्य अशी एक 'परज' रागांतली चाल त्याला कालपासून सुचली होती ती तो मोठ्यानं गुणगुणत होता:—

"मैको रोको नाहिं पन घटपें जाने दो।
काहे करत हो ठठोरि मोसें।
ऐसी नाहि हूं मै भोली।
जानत हूं तुमरी घतिया......।"

शेवटच्या 'या' वरची त्याची तान संपते न संपते तोंच खोलींतल्या खोलींतूनच कुणी तरी आपल्याला हांक मारली असा त्याला भास झाला.

त्याला विलक्षण आश्चर्य वाटलं.

त्याच्या कल्पनेनं त्याच्याशीं असला खेळ कधीं केला नव्हता. तो पुन्हां गुणगुणूं लागला—

"मैको रोको नाहि—"

"राजाभाऊ !–"

तो एकदम चपापून थांबला.

कारण त्याच्या नांवानं कुणीतरी हांक मारली येवढंच आश्चर्य नव्हतं, तर ती हांक मारणारा आवाज त्याच्या पूर्ण परिचयाचा होता. आणि तो आवाज या ठिकाणीं ऐकूं येईल ही अगदीं अशक्यांतली अशक्य गोष्ट होती! तो आवाज भूतकालांत केव्हांच गडप झाला होता! या आयुष्यांत तो पुन्हां कधींही ऐकूं येणार नव्हता!......

"राजाभाऊ!"

आतां मनाशीं नुसतं आश्चर्य करीत बसणं राजाभाऊला शक्य नव्हतं. त्यानं दोन पावलं पुढें टाकून दिव्याचं बटण दाबलं; आणि समोर कोण बसलं

आहे तें पहातांच एखादं पिशाच्च दृष्टीस पडावं त्याप्रमाणं श्वास सोडीत तो उद्गारला,

" कोण तूं ? "

ती चंचलाच होती यांत संशय नव्हता !......

मात्र एका क्षणीं जरी त्यानं तिला ओळखलं तरी दुसऱ्याच क्षणीं त्याच्या मनांत आलं, छे, ही चंचला कुठली ?......

कारण, तिची ओळख पटली तरी संशय वाटावा इतकी ती बदलली होती !

अर्धवट खात्रीनं, अर्धवट संशयानं त्यानं विचित्र स्वरानं प्रश्न केला,

" चंचला ?......'

" होय, चंचला. "

" तूं इकडे कुठें ? "

" तुमच्याकडे. "

" माझ्याकडे ? माझ्याशीं तुझं काय काम ? हैद्राबादच्या राजाची राणी झाली होतीस ना तूं ? "

" राजाभाऊ, राजाभाऊ ! केवळ शब्दांचेच नव्हे तर हत्याराचेसुद्धां प्रहार तुम्हीं माझ्यावर केलेत तरी मी तक्रार करतां कामा नये हें मला माहीत आहे. पण ते प्रहार नंतर करा. त्यासाठीं मी आपण होऊन आपला देह तुमच्या पायापाशीं टाकीन. पण या घटकेला तें नको. दयेचा आणि सहानुभूतीचा एखादा शब्द तुमच्या तोंडून मला ऐकायला मिळाला तर या घटकेला तो मला पाहिजे आहे. जरा बसा. माझ्या दुर्दैवाची कथा ऐका अन् मग तुमच्या हृदयाला पाझर फुटला, पूर्वी जें प्रेम तुम्हीं माझ्यावर केलंत पण मूर्खपणानं आणखी आंधळेपणानं माझ्या डोळयांना दिसूं शकलं नाहीं त्या प्रेमाचा अस्पष्ट प्रतिध्वनि तुमच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी जागा झाला तर—"

पुढचे शब्द बोलण्याऐवजीं तिनं एकदम हुंदके देऊन आपलं मस्तक टेबलावर टेकलं.

तिला आपले हुंदके लवकर आवरतां आले नाहींत; पण अखेर प्रयत्नानं ते आंवरून आणि अश्रू पुसून ती आपली हकीगत सांगूं लागली.

हैद्राबादच्या राजाकडे तिनं पांच सहा वर्षं सुखांत काढलीं होतीं; पण पुढें ते राजे कालवश झाले होते, आणि त्यांचा आश्रय नाहींसा झाला होता. हैद्राबादच्या दुसऱ्या एका लक्ष्मीपुत्राची मागणी तिला आली ती तिच्या आईनं मान्य केली होती; पण हा लक्ष्मीपुत्र कर्जबाजारी आणि व्यसनी होता. स्त्रीसुख घेण्याच्या त्याच्या कल्पनाहि मोठ्या भयंकर होत्या. तो कमालीचा दारुडा होता, आणि पटाईत शिकारीही होता. तो दारू घेई ती अशा वृत्तीनं, कीं जणूं तिच्यावर त्याला कसला तरी सूड घ्यायचा होता; शिकार करी तीही अशा अवसानानं, कीं जणूं फार दिवस जनावरावर धरलेला डाव त्याला क्रौर्यानं साधायचा होता; आणि मदिरा व शिकार याप्रमाणेंच स्त्रीशीं रममाण होतानाही तो अशा पाशवी निष्ठुरतेनं वागे, कीं जणूं पूर्वजन्मींच्या एखाद्या वैरिणीचा त्याला विध्वंस करायचा असे. त्याच्या सहवासानं ती आजारी पडली. तिचं अर्धं शरीर झिजून नाहींसं झालं. त्याच्याकडून पैसे मिळण्याऐवजीं त्यानं तिचेच सारे पैसे लुबाडून उधळून टाकले. तो मेल्यावर ती तिसऱ्या एका ठिकाणीं राहिली. पण आतां तिच्याजवळ रूपसौंदर्य फार थोडं उरलं होतं. मध्यंतरी तिची आई तिला सोडून एका धनिकाबरोबर निघून गेली होती. तिसऱ्या घरीं राहिल्यावर दोन अडीच वर्षं तिनं कशीबशीं काढलीं. शृंगार-शय्येवरच्या कामसखीची तिची भूमिका केव्हांच नष्ट झाली होती. एखाद्या दासीसारखं तिला वागावं लागत होतं. केरवारे करणाऱ्या बटकीची अवस्था तिला प्राप्त झाली होती. पण आहे तो आसरा सोडून कुठें जायचं अशा विचारानं मरणाची वाट पहात ती काळ कंठीत होती. गांवांत देवीची सांथ आली. तिच्या अंगावर देवी उठल्या. तिला मोठा आनंद झाला. मृत्यूनं आपली हांक ऐकली असं तिला वाटलं. पण तसं झालं नव्हतं. ज्यांना जिवंत रहायची हौस होती, ज्यांच्यापुढें सुखाचीं ताटं भरलेलीं होतीं अशा कित्येक तरण्याताठ्या स्त्रीपुरुषांना मृत्यु घेऊन गेला. पण तिच्या घोंगडीपर्यंत येऊन तो परत फिरला. मात्र तिचा प्राण जरी त्यानं नेला नाहीं तरी तिचं देहसौंदर्य तो घेऊन गेला असावा. ती दुखण्यांतून उठली ती देवीच्या वणांनीं विद्रूप झालेल्या चर्येची स्त्री म्हणून उठली. त्या भयंकर आजारांत तिचा निसर्गदत्त

मधुर आवाजही नष्ट झाला होता. तिची प्रकृति एखाद्या नामांकित डॉक्टरला दाखविण्याच्या निमित्तानं तिचा मालक तिला मुंबईला घेऊन आला होता, व तिला एका अनोळखी ठिकाणीं ठेवून देऊन नाहींसा झाला होता.

त्यानंतर—

" त्यानंतर......"

येवढाच शब्द उच्चारून ती क्षणभर गप्प राहिली.

जणूं आतां आपल्या दुःखाच्या कळसाचं वर्णन तिला करावं लागणार होतं, व तें करूं नये म्हणून तिची जिव्हा परत फिरत होती.

पण दुसऱ्याच क्षणीं, आंतून भरून येणारा ऊर हातांनीं थोपवून आणि निश्चयासाठीं खालचा ओंठ एकदां दांतांनीं दाबून मग सोडून ती म्हणाली,

" त्यानंतर......त्यानंतर जे व्हायचं तें झालं. पोटांत घालण्यासाठीं अन्नाचे चार घांस मिळविण्याचा जो एकच मार्ग निराश्रित स्त्रियांना निसर्गानं मोकळा ठेवला आहे, त्या मार्गावरची प्रवासी मी बनले."

राजाभाऊनं एकदम तिचा हात धरला व म्हटलं,

" चंचला, चंचला, काय भयंकर सांगतेस तूं ? "

दहा वर्षांपूर्वी त्याच्या नजरेंत जें प्रेम तिनं अनेक वेळां पाहिलं होतं पण ज्याचा तिनं मूर्खपणानं अनादर केला होता त्या प्रेमाची फक्त छाया—सहानुभूति—तिला त्या क्षणीं त्याच्या नजरेंत दिसली. पण आतां त्या छायेबद्दलही तिला केवढा आदर वाटला ! त्या छायेनं तिच्या जीवाचं केवढं समाधान झालं ! जो एकदां आपलं प्रेमसर्वस्व तिला अर्पण करायला तयार होता, त्याची फक्त करुणा औदार्यानं घातलेल्या भिक्षेसारखी घ्यायला तिचा जीव उत्सुक होता !

तिनं त्याच्या हातावर डोकं टेकलं आणि रडत रडत ती म्हणाली,

" हा किळसवाणा प्रवास मला सहन होत नाहीं. आत्महत्या करून ही मुशाफरी संपवावी असं कितीकदां तरी माझ्या मनांत आलं. पण पुनःपुन्हा एक आशा मनांत येई आणि जीव गुंतून राही. केवळ सौंदर्याच्या

मस्तीनं मीं तुमच्या प्रेमाचा अव्हेर केला. तुमचा केवढा तरी अपराध केला! दैवानं माझं सौंदर्य नष्ट केलं. ज्या शरीरामुळं माझं अंतःकरण नष्ट केलं होतं तें सुंदर शरीर विद्रूप झाल्यावर आतां माझं अन्तःकरण प्रकट झालं आहे. एक प्रकारें माझी शुद्धि झाली आहे. पण दुसऱ्या प्रकारें मी पापाच्या गलिच्छ घाणींत एखाद्या कीटकासारखी पडलें आहे. आतां तुम्ही माझा स्वीकार कराल हें शक्यच नाहीं. पण आत्महत्त्येची इच्छा नाहींशी करणारी जी एकच आशा गलिच्छ आयुष्यांत मला गुंतवून ठेवी ती ही, कीं तुमची क्षमा मागितल्याशिवाय मी मेलें तर मला सद्गति मिळणार नाहीं; तुम्ही कदाचित् मला भेटाल आणि मला तुमची क्षमा मागतां येईल. माझं केवढं भाग्य कीं मला तुमचा पत्ता कळला, तुम्ही मला भेटलांत अन् मला तुमची क्षमा मागतां आली. आतां मला सुखानं मरतां येईल. कोणतं विष सगळ्यांत जालीम आहे त्याची माहिती मिळवून मीं तें आणून ठेवलं आहे."

तिचे हुंदके अनावर झाले, आणि राजाभाऊच्या हाताभोंवतालची तिच्या हाताची पकड अतिशय घट्ट झाली.

राजाभाऊ म्हणाला,

"चंचला, तूं असं बोलतां कामा नये. मरण्याच्या गोष्टी काय म्हणून अशा सहजासहजीं बोलायच्या?"

"दुसऱ्या कुठल्या गोष्टी आतां मी बोलूं?"

"दुसऱ्या पुष्कळ गोष्टी आहेत बोलायला. माझ्याकडे बघ. मी तुला सांगतों. चंचला, अस्सं. हें बघ, सध्यां ज्या स्थितींत तूं आहेस तिच्यावांचून तुला गत्यंतर नाहीं ही तुझी कल्पना चुकीची आहे. अब्रूनं रहायची तुझी खरोखर इच्छा आहे?"

"अब्रूनं! इतकं सारं झाल्यावर?"

"हो. अब्रू म्हणजे काचेचं भांडं आहे असं म्हणतात तें सर्वस्वीं खरं नाहीं."

"असं कसं म्हणतां? अब्रू पुन्हां मिळवितां येते?"

" हो. "

" स्त्रीलासुद्धां ? "

" हो. "

" अन् मूर्खपणानं हातचं दवडलेलं प्रेमसुद्धां ? "

असं विचारून तिनं झटकन् त्याच्या हाताचं चुंबन घेतलं, आणि एखाद्या मुक्या जनावरानं धन्याकडे आर्जवी दृष्टि लावावी त्याप्रमाणें तिनं त्याच्याकडे नजर लावली.

राजाभाऊ म्हणाला,

" हातचं दवडलेलं प्रेम पुन्हां मिळवितां येत नाहीं. चंचला, तुझ्याविषयीं आतां मला प्रेम वाटणं शक्य नाहीं. पण कुमार्गांत पडलेली एक हिंदु स्त्री या नात्यानं तुझी मला करुणा येते. अन् तुला सन्मार्गाला लावणं मी माझं कर्तव्य समजतों. माझं ऐकशील तर तुझ्या सध्यांच्या परिस्थितींतून सोडून मी तुला चांगल्या परिस्थितींत नेऊन सोडीन. अनाथ हिंदु स्त्रियांच्यासाठीं इथें एक आश्रम निघालेला आहे. त्या आश्रमांत तुझी राहण्याची व्यवस्था मी उद्यांपासून करतों. तिथें तुला यापुढचं आयुष्य अब्रूनं काढतां येईल. तूं तयार आहेस तिथें रहायला ? "

तिनं त्याच्याकडे बघत मान हालविली. त्या मानेचा अर्थ उघडच असा होता, कीं त्याचं बोलणं तिला पटत होतं, अन् त्याप्रमाणें वागायला ती तयार होती.

पण मान हालवीत त्याच्याकडे पहातां पहातां ती मनाशीं म्हणत होती, माझ्यासारखी नतद्रष्ट अभागी स्त्री दुसरी कोणी असेल का ? जो हा तरुण सुंदर पुरुष एकदां आपल्या हृदयसिंहासनावर मला बसवायला तयार होता तो आज मला एका आश्रमाची वाट दाखवतो आहे ! अन् सामान्य दयेपेक्षां अधिक तो मला कांहींही देऊं शकत नाहीं !......

हा विचार असह्य होऊन तिनं राजाभाऊवर लावलेली आपली नजर चटदिशी वळविली आणि पुन्हां पूर्वीप्रमाणें त्याच्या हातावर कपाळ टेकून ती रडूं लागली.

आपल्याकडे पाहतां तिनं असं एकदम कां रडूं लागावं तें राजाभाऊला कोठून कळणार ?

पण तिला प्रतिबंध न करतां कांहीं वेळ रडूं देणंच अधिक युक्त होतं हें त्यानं ओळखलं व तो कांहींच न बोलतां स्तब्ध राहिला.

दुसऱ्या दिवशीं त्यानं हिंदु अनाथ महिलाश्रमांत तिची रवानगी केली.

---

# [२३]

मार्च महिन्याच्या प्रारंभीं मुंबईची हवा नेहमींच सुंदर असते. पण १९३० सालीं तिच्यांत विशेषच प्रसन्नता आली होती. आकाश निरभ्र असे. दिवसभर वाऱ्याचे गार गार झोत वहात असत. ठिकाठिकाणच्या वृक्षांच्या शाखा कोवळ्या कोवळ्या नवपल्लवांनीं डंवरलेल्या दिसत. पिंपळासारख्या मोठमोठ्या वृक्षांच्या शेंड्यांवर कधीं कधीं हिरव्या गार पोपटांचा एखादा लहानसा कळप चित्रविचित्र मधुर आवाजांची किलबिल करतांना आढळे. सार्वजनिक बागांवरून सकाळच्या प्रहरीं जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरांना आंतल्या वृक्षांनीं सोडलेल्या समाधानाच्या निःश्वासांचे सुगंध घ्यावयास मिळत. कांहीं भागांत रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या, पल्लवांपेक्षां फुलांच्या झुपक्यांनींच गजबजलेल्या, उंच झाडांनीं आपल्या पिवळ्या गडद पुष्पांची शोभा वाटसरांसाठीं खुशाल गालिचासारखी रस्त्यावर आंथरलेली असे. आणि क्वचित्

ठिकाणीं रस्त्याच्या कडेचीं गुलमोहराचीं झाडं आपल्या लालभडक पुष्पांचं ऐश्वर्य दाखवूं लागलेलीं दिसत. सृष्टि नाना प्रकारांनीं नटत होती. पक्षी आनंदांत होते. समुद्र आपले नित्याचे भरती ओहोटीचे खेळ अधिक उल्हासानं खेळत असल्याचा भास होत होता. चांदण्या रात्रीं चंद्रबिंब नेहमींपेक्षां अधिक तेजानं आणि डौलानं आपला नीलमार्गावरचा प्रवास करीत असल्यासारखं वाटत असे.

या वासंतिक वातावरणाचा परिणाम होऊन शहरांतल्या स्त्रीपुरुषांच्या चेहऱ्यावरहि हास्य आणि प्रसन्नता विशेषकरून दिसत असे.

इतराप्रमाणेंच राजाभाऊही वरकांती प्रसन्नता दाखवी. त्याची प्रसन्नता वाढण्यासारख्या पुष्कळ गोष्टी घडत होत्या. बाहेरच्या सृष्टीचं स्वरूप मनोहर होतं. हवा सुंदर होती. त्याच्या भोंवतालचीं सारीं माणसं आनंदांत होतीं. 'जयमाला डान्सर्स'चे सारे व्यवहार अतिशय सुरळीतपणानं चालले होते. १० तारखेस मुंबईस मंडळीच्या अखेरच्या दोन प्रयोगांपैकीं पहिला प्रयोग व्हायचा होता. जो तो आपापला उद्योग उत्साहानं करीत होता, हंसत होता, आणि आतां अवघ्या दोनच महिन्यांनीं जो मोठा दौरा सुरू होणार त्याचीं सुखस्वप्नं मनाशीं करीत होता. राजाभाऊनं प्रसन्न दिसावं हें अगदीं सहाजिक होतं.

पण त्याची ती प्रसन्नता केवळ बाह्यात्कारी होती.

आंतल्या आंत त्याचं मन गंभीर विचारांनीं व्याप्त झालेलं असे. आणि कांहीं एका विचित्र सूक्ष्म असंतोषाची बोंचणी त्याला रात्रंदिवस लागलेली असे.

कारण, देशांत फार महत्त्वाच्या राजकीय घडामोडी चालू होत्या. लाहोरच्या कॉंग्रेसच्या वेळेपासून राजाभाऊचं चित्त या घडामोडींकडे जें वेधलं तें परत न वळतां त्याकडे अधिकाधिकच वेधत चाललं होतं. रात्रीं निजण्यापूर्वीं तो नियमानं वर्तमानपत्रांतल्या हकीगती वाचीत असे, व त्यांचा विचार करीत घटका घटका अंथरुणांत झोंपेवांचून पडत असे.

ता. २६ जानेवारी हा दिवस साऱ्या देशांत 'स्वातंत्र्यदिन' म्हणून

पाळला जावा अशी काँग्रेसची आज्ञा होती. त्याप्रमाणें खेडोपाडीं व शहरो-शहरीं तो पाळण्यांत आला होता. त्या दिवशींच्या सभांतून वाचलं जावं म्हणून जें एक पत्रक काँग्रेसनं प्रसिद्ध केलं होतं त्यांत स्पष्ट शब्द होते, कीं ‘ हिंदुस्तानांतील ब्रिटिश सत्तेनें हिंदी लोकांचें नुसतें स्वातंत्र्यच हरण केलें नाहीं तर गरीब रयतेला नामोहरम करण्यावरच आपल्या सत्तेचें अधिष्ठान ठेवलें आहे, व हिंदुस्तानचा आर्थिक, राजकीय व नैतिक अधःपात केला आहे; म्हणून हिंदुस्तानानें ब्रिटिशांचे संबंध तोडणें व पूर्ण स्वराज्य किंवा संपूर्ण स्वातंत्र्य मिळविणें अत्यंत जरूर आहे असें आम्हांला वाटतें......ब्रिटिश सत्तेशीं शक्य तितका असहकार पुकारण्याला आम्ही सिद्ध आहोंत. सविनय कायदेभंग करण्याची आम्ही तयारी करणार आहोंत जर अत्याचार न करतां किंवा प्रक्षुब्धही न होतां आम्हीं सरकारशीं असहकार केला व कर दिले नाहींत तर या अमानुष सत्तेचा शेवट खचित होईल. म्हणून आम्ही आज असा पवित्र निश्चय करतों, कीं पूर्ण स्वराज्यस्थापनेसाठीं काँग्रेस वेळोवेळीं ज्या आज्ञा करील त्या आम्ही पूर्णपणें पाळूं ! ’

या जाहीर पत्रकांतल्या भाषेवरून हें उघड दिसूं लागलं होतं, कीं काँग्रेस प्रचंड चळवळीला लवकरच तोंड फोडणार होती. फेब्रुवारी महि-न्याच्या मध्याच्या सुमारास काँग्रेसच्या वर्किंग कमिटीची बैठक साबरमतीस झाली. तिनं तर ‘ योग्य वाटेल त्या मार्गानं, वाटेल त्या वेळीं, वाटेल त्या पद्धतीच्या व मर्यादेच्या सविनय कायदेभंगास सुरवात करण्याचा अधिकार ’ ठिकठिकाणच्या काँग्रेस कमिट्यांस देऊन टाकला, आणि ‘ लवकरच सुरू होणाऱ्या स्वातंत्र्याच्या शेवटच्या मोहिमेंत ’ देशांतील सर्व लोकांनीं भाग घ्यावा अशी आपल्या ठरावांत विनंति केली.

‘ शेवटच्या मोहिमेंत ! ’......

हे शब्द राजाभाऊला कांहीं केल्या दृष्टीआड करतां येईनात.

ते शब्द योजण्यांत काँग्रेसचा जणूं असंच सांगण्याचा हेतु होता, कीं आजपर्यंत युद्धाच्या ज्या मोहिमा झाल्या त्या पुरेशा निकरानं झाल्या नसतील, यशाऐवजीं अपयशच पदरीं घ्यावं लागलं असेल, सेनापतींच्या चुकीमुळें अगर गैरहिशोबामुळें डाव फसले असतील, पण लोकांनीं ते जुने दाखले आतां

मनांत ठेवूं नयेत, साऱ्या शंका कुशंका दूर टाकाव्यात, आणि आतां पुकारली जाणारी मोहीम निकराची आणि अखेरची आहे हें लक्षांत आणून चळवळींत भाग घ्यावा.

साबरमतीच्या ठरावांत युद्धाचा उल्लेख असला, तरी कोणत्या मुद्यावर कॉंग्रेस युद्ध करणार आहे त्याचा स्पष्ट निर्देश नव्हता. त्यामुळें गांधी कायदेभंगाच्या चळवळीला कसं तोंड फोडणार आहेत याविषयीं लोकांचे नाना तऱ्हेचे तर्क सुरू झाले होते. पण ही संदिग्ध स्थिति फार थोडे दिवस टिकली होती. कारण ता. २ मार्च रोजीं साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांतून गांधींनीं व्हाइसरॉय लॉर्ड अर्विन यांस एक लांबलचक पत्र लिहून आठ दिवसांच्या आंत समाधानकारक उत्तर न मिळाल्यास मिठाच्या बाबतींत कायदेभंगाची चळवळ आपण सुरू करूं असा निर्वाणीचा निरोप त्यांस पाठविला होता. गांधींच्या त्या पत्रास व्हाइसरॉयनीं बेफिकीरांचंच उत्तर पाठविलं होतं. आणि गांधीनीं पुन्हां त्यांस पत्र लिहून कळविलं होतं, कीं आतां कायदेभंगाची मोहीम सुरू करण्यावांचून मला गत्यंतर नाहीं.

'जयमाला डान्सर्स'च्या मुंबईंतल्या अखेरच्या दोन प्रयोगांपैकीं पहिला प्रयोग ज्या दिवशीं झाला, त्या दिवशींच गांधींचं हें दुसरं पत्र वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालं होतं. आणि रात्रीं प्रयोग पहायला आलेल्या हजारों लोकांच्या तोंडीं गांधींच्या पत्राखेरीज दुसरा विषय नव्हता.

'जयमाला डान्सर्स'चे दोन्ही प्रयोग अत्यंत यशस्वी झाले पण एकीकडे त्या यशाचा आनंद घेत असतां राजाभाऊचं अर्धं लक्ष आतां गांधी काय करतात याकडे लागून राहिलं होतं.

साबरमतीच्या आश्रमातून निघून पाऊणशें निवडक स्वयंसेवकांबरोबर दोनशें मैल अंतर पायांनीं चालून गांधी दांडीस जाणार व तिथें समुद्रकांठचं मीठ उचलणार असं जाहीर झालं होतं. सरकार कशा तऱ्हेची प्रतिक्रिया करणार याचा कुणाला अदमास नव्हता. पण गांधींच्या पुढें गेलेल्या वल्लभभाई पटेलांना रास गावीं पकडण्यांत येऊन तीन महिन्यांची शिक्षा दिली गेली, त्यावरून सरकारी धोरणाचा अदमास करतां येण्यासारखा होता. गांधींना

केव्हां पकडणार ? आणि त्यांना पकडल्यावर पुढें काय होणार ? या एकाच प्रश्नाची चर्चा सर्व देशभर चालू होती.

या घडामोडींच्या योगानं राजाभाऊच्या चित्ताची विलक्षण चलबिचल झाली. सौंदर्याची आसक्ति आणि देशसेवेची तीव्र इच्छा या दोन्ही प्रवृत्तींचा मिळून त्याचा स्वभाव बनलेला होता. उपभोग आणि त्याग, रसास्वाद आणि पराक्रम अशा परस्पर भिन्न आकर्षणांचा त्याच्यावर सारखाच परिणाम होत असे. आजपर्यंत त्यानं जें जें केलं तें तें या दोहोंपैकीं ही किंवा ती प्रवृत्ति अधिक बलवत्तर असल्यामुळें केलं होतं. मध्यंतरीं कित्येक वर्षे सुप्तावस्थेत राहिलेली त्याच्या अंत:करणांतली देशसेवेची, पराक्रमाची आणि त्यागाची इच्छा आतां अनुकूल परिस्थिति उत्पन्न होतांच एकदम बलिष्ठ होऊन त्याला ओढूं लागली.

तो वरून प्रसन्न दिसे; पण आंतल्या आंत किती तीव्र असंतोष आणि अनिश्चिय तो सहन करीत होता तें त्याचं त्याला माहित !

ता. १२ मार्च रोजीं सकाळीं पाऊणशे निवडक स्वयंसेवकांसह गांधींनीं मिठाच्या सत्याग्रहाच्या मोहिमेसाठीं अहमदाबादचा आश्रम सोडला. तो सोडतांना त्यांनीं जाहीरपणें अशी प्रतिज्ञा केली, कीं " या मोहिमेत मरण आलं तरीं मी पत्करीन, आणि जगलोंच तर स्वराज्य मिळेपर्यंत आश्रम वर्ज्य करीन ! " मिठाचा सरकारी कायदा मोडून मीठ तयार करण्यासाठीं दांडी हें गांव त्यांनीं निश्चित केलं होतं. अहमदाबादपासून या गांवचा दोनशें मैलांचा प्रवास गांधी आपल्या स्वयंसेवकांसह पायीं करणार होते. त्यांनीं आपल्या हातांत केवळ आधारासाठीं म्हणून एक मोठी काठी घेतली होती. सारे स्वयंसेवक सैनिकांप्रमाणे अत्यंत शिस्तीनं चालले होते. अग्रभागीं चाललेला तो सेनानी त्या सैनिकांसच नव्हे तर हिंदुस्थानच्या पस्तीस कोटी लोकांस स्फूर्तीचा विलक्षण झरा वाटत होता. गांधींचं तें प्रयाण म्हणजे केवळ एक ऐतिहासिकच नव्हे तर एक पौराणिक देखावा होता. श्रीरामचंद्र किंवा पांडव यांची आठवण करून देणारं तें दृश्य होतं. तें एका विलक्षण क्रांतीचं प्रयाण होतं. प्रथम प्रथम त्या प्रयाणाची कुचेष्टा झाली, नंतर त्याकडे लोकांचं लक्ष वेधलं, आणि अखेर तो एक स्तुतीचा विषय झाला. कोटयावधी लोकांचीं अंत:करणं त्या प्रयाणानं हलवून सोडलीं. तीनशे सरकारी अधिकाऱ्यांनीं राजीनामे दिले.

गांधी जसजसे पुढें चालले तसतशीं खेडीपाडीं जागीं होऊन उठलीं. सर्वांच्या लक्षांत आलं कीं तें कांहीं एखाद्या लुटारूचं कूच नव्हतं तर जे ब्रिटिश कायदे व हुकूम लोकांच्या संमतीनं तयार झाले नव्हते, इतकंच काय, सामान्य नीतीच्या किंवा माणुसकीच्या तत्त्वांचाहि ज्यांना आधार नव्हता त्या कायद्यां-विरुद्ध—त्या ब्रिटिश सत्तेविरुद्ध —पस्तीस कोटी हिंदी लोकांच्या मनांत उत्पन्न झालेल्या असंतोषाचं प्रतीक असं तें कूच होतं. त्या प्रयाणाकडे लक्षणार्थानं तर हिंदुस्तानाचंच नव्हे तर सबंध जगाचं लक्ष लागलेलं होतंच, पण वाच्या-र्थानंसुद्धां गांधींचं तें अपूर्व प्रयाण प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहायला ठिकठिकाणीं हजारों लोक जमत होते. प्रयाणमार्गावरच्या प्रत्येक ठिकाणीं दहा दहा, बारा बारा हजार लोक कित्येक तासपर्यंत ताटकळत उभे रहात, आणि हिंदुस्तान देशाची मुक्तता करायला निघालेल्या त्या महात्म्याला वंदन करीत. गांधींच्या जयजयकारानं आकाश दुमदुमून जात असे. परदास्यमुक्ततेचा नवीन मार्ग आपल्याला दिसूं लागला असं लोकांना वाटत असे. मुक्कामाच्या प्रत्येक ठिकाणीं गांधी आपला सरळ सोपा संदेश लोकांना सांगत. ते म्हणत, " ही ब्रिटिश सत्ता हा मी एक शाप समजतों. ही राज्यपद्धति नष्ट करण्याचा मी निर्धार केला आहे. गॉड सेव्ह द किंग हें पद मी स्वतः गाइलं आहे आणि इतरांस गायला शिकवलं आहे. अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळं अन् प्रेमळ वाटाघाटी या स्वरूपाच्या राजकारणावर माझा एकेकाळीं विश्वास होता. परंतु आज त्या सर्व गोष्टी मला मातीमोल वाटत आहेत. माझी अशी खात्री पटली आहे, कीं या सरकारला वठणीवर आणण्याचे हे खरे मार्ग नाहींत. राजद्रोह हा माझा धर्म झाला आहे. आमचं युद्ध अनत्याचारी स्वरूपाचं आहे. कुणाचीहि हत्या करण्यासाठीं आम्ही बाहेर पडलों नाहीं. परंतु या सत्तेचा शाप समूळ धुऊन काढणं हा आमचा धर्म आहे."

अशा प्रकारच्या साध्या पण स्पष्ट आणि निर्भय भाषणांनीं लोकांना जागृत करीत, मजल दरमजल चालत गांधी चोवीस दिवसानंतर ता. ५ एप्रिल रोजीं सकाळीं दांडीस पोंचले. दांडी मुक्कामीं पोंचण्याच्या आंतच सरकार गांधींना अटक करील ही लोकांची कल्पना चुकीची ठरली. सत्याग्रहाच्या क्रियेला सरकारी दडपशाहीच्या प्रतिक्रियेचा उलट जबाब मिळणार नाहीं हें तर लोकांना खरं वाटणं शक्यच नव्हतं. त्यामुळं गांधी अजूनही मुक्त असल्याचं

पाहून लोक बुचकळ्यांत पडले. सरकारी तटस्थता लोकांना अधिकच अपशकुनी आणि भयकारक वाटूं लागली. ता. ६ एप्रिल रोजीं गांधी समुद्रावर जाऊन मीठ उचलणार होते. त्या वेळीं कांहीं तरी भयंकर गोष्ट घडणार असं ज्याला त्याला वाटूं लागलं. पण तोही अदमास चुकीचा ठरला. ता. ६ एप्रिल रोजीं सकाळीं साडेसहा वाजता सकाळची प्रार्थना आटपून गांधी आपल्या स्वयं-सेवकांसह समुद्रकिनाऱ्यावर गेले आणि त्यांनीं मिठाचा कायदा मोडला, तरीही त्यांची धरपकड झाली नाहीं !

त्या दिवसापासून देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत गांधींच्या आज्ञेनुसार मिठाच्या कायदेभंगाचा वणवा पेटला; आणि मग मात्र सरकारी दडपशाहीचं उग्र स्वरूप प्रगट झालं. सर्व मोठमोठ्या शहरांतून प्रचंड सभा झाल्या. श्रोत्याची संख्या लक्षावर जाई. कराची, शिरोडा, पाटणा, पेशावर, कलकत्ता, मद्रास आणि सोलापूर इत्यादि ठिकाणीं सरकारी अधिकाऱ्यांनीं केलेल्या निर्दय लाठीहल्ल्यात हजारों सत्याग्रही जखमी झाले. कित्येक ठिकाणीं गोळीबारही करण्यांत आला. ता. २३ एप्रिल रोजीं बंगाल ऑर्डिनन्स पुन्हां अंमलांत आला, व १९१० सालचा प्रेस ॲक्ट कांहीं दुरुस्ती करून एका वटहुकमाच्या द्वारें व्हाइसरॉयनीं ता. २७ एप्रिल रोजीं जाहीर केला. राष्ट्रीय वृत्तपत्राजवळ सरकारकडून जामीनाच्या मोठमोठ्या रकमा मागण्यांत आल्या. या वेळीं वृत्तपत्रास पाठविलेल्या संदेशांत गांधींनीं लिहिलं, "वर्तमानपत्रकर्त्यांनीं जामीन भरण्याचं साफ नाकारावं, आणि जर त्याच्यावर सक्ति झाली तर प्रकाशन थांबवावं किंवा वाटेल तें जप्त करण्यासाठीं अधिकाऱ्यांना आव्हान द्यावं. स्वातंत्र्य गांवाच्या वेशीपर्यंत आलं असताना आणि त्याचं स्वागत करण्यासाठीं हजारों लोक यातना भोगीत असतांना छापखानेवाले मात्र कसोटीस उतरले नाहींत असं लोकांनीं म्हणूं नये. सरकारला खुशाल खिळे आणि यंत्रसामुग्री जप्त करूं द्या ! त्यांना लेखणी जप्त करतां येणार नाहीं ! आणि वाचा तर नाहींच नाहीं."

या सर्व घडामोडींचा राजाभाऊच्या अंतःकरणावर विलक्षण परिणाम होत होता. देशांत चहूंकडे चाललेल्या युद्धाच्या नव्या नव्या हकीगती त्याच्या कानांवर रोज येत होत्या. मुंबई शहरातली धुमश्चक्री तर क्वचित् प्रसंगी

त्याच्या डोळ्यांना प्रत्यक्ष दिसत होती. मुंबईचं काँग्रेसहाऊस म्हणजे अनत्याचारी युद्धाच्या वातावरणानं भरून गेलेलं एक नमुनेदार शिबिर बनलं होतं. युद्धांत प्रत्यक्ष सामील न झालेल्या हजारों स्त्रीपुरुषांच्या तीर्थयात्रेच्या स्थानाचं स्वरूप त्याला प्राप्त झालं होतं. सकाळीं, दुपारीं, रात्रीं तिकडे जाणाऱ्या येणाऱ्या लोकांची रहदारी सारखी चालू असे. सभा होत, मिरवणुकी निघत, लाठीबंद व हत्यारबंद पोलिसांच्या लॉऱ्या धाडधाड करीत वेगानं रस्तोरस्तीं हिंडत. 'नमकका कायदा तोड दिया' अशी गर्जना उठलेली राजाभाऊला दिवसांतून दहा वेळां ऐकूं येई. सत्यनिष्ठेच्या दिमाखानं फडफडणारा राष्ट्रीय तिरंगी झेंडा स्वप्नांतसुद्धां त्याच्या डोळ्यांना कित्येक वेळां स्पष्ट दिसे !...

युद्धांत सामील होण्यासाठीं त्याचं अंतःकरण दिवसेंदिवस अधिकाधिक अधीर होऊं लागलं.

'जयमाला डान्सर्स' बरोबर जाणाऱ्या सर्व मंडळींच्या पासपोर्टवर अखेरचं सरकारी शिक्कामोर्तब करून आणण्याच्या दिवशीं त्यानं स्वत: तिकडे न जातां आपल्या हाताखालच्या एका माणसाला पाठवलं, आणि स्वतःचा पासपोर्ट पक्का करून आणलाही नाहीं.

लाला नारायणप्रसाद त्याला म्हणाले,

"राजाभाऊ, हें हो काय ? तुम्ही धाडलेल्या माणसानं एक मोठी चूक केली कीं."

"ती काय ?"

"तुमचा पासपोर्ट पक्का करून आणायचं विसरला तो."

"तो नाहीं विसरला. मीच त्याला सांगितलं होतं नको म्हणून."

"तें कां ? मग तुम्ही आपला पासपोर्ट केव्हां पक्का करून आणणार ?"

"कांहीं जरूर नाहीं त्याची, लालाजी."

"म्हणजे काय ?"

"म्हणजे......मी मग केव्हां तरी सांगेन आपल्याला."

लाला नारायणप्रसाद कुठें तरी बाहेर जाण्याच्या गडबडींत होते त्यामुळें

त्यांनीं राजाभाऊला अधिक कांहीं विचारलं नाहीं. राजाभाऊच्या अंतःकरणांत कोणत्या विचारांचा प्रक्षोभ माजला होता त्याची त्यांना काय कल्पना? ते असंच समजत होते, कीं आतां पंधरा दिवसांनीं आपण सर्वजण परदेशच्या दौऱ्यावर निघणार. त्यांची अनेक मित्रमंडळी त्यांना व त्यांच्या दोघी मुलींना लहानमोठ्या मेजवान्या देत होती, व त्यांचा स्वीकार करण्यांत ते आणि त्यांच्या मुली मग्न होत्या.

लाला नारायणप्रसादच्या एका स्नेह्यांनीं लालाजी व त्यांच्या मुलींबरोबर राजाभाऊनंही मेजवानीला यावं असा आग्रह धरला. राजाभाऊ तें आमंत्रण स्वीकारीना. तेव्हां लालाजी, जयमाला व नीलांबरी या सर्वांनी त्याला आग्रह करून पाहिला. पण त्यांचाही आग्रह त्यानं मानला नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं मेजवानीहूनही परत आल्यावर शय्यागृहांत कपडे उतरीत असतां नीलांबरी जयमालेस म्हणाली,

" तुला आवडलं का यांचं हें करणं ? "

जयमालेनं तिच्याकडे विस्मयानं पाहून विचारलं,

" कुणाचं ? तूं कुणाबद्दल बोलते आहेस ? "

" राजाभाऊंबद्दल. आपण सगळ्यांनीं इतका आग्रह केल्यावर त्यांनीं यायला पाहिजे होतं असं नाहीं तुला वाटत ? नाहीं तरी आतांशा चमत्कारिकच वागायला लागले आहेत ते. मी पुष्कळ विचार करतें मनाशीं त्याबद्दल."

तें शेवटचं वाक्य ऐकून जयमालेनं आपल्या बहिणीकडे कांहीं एका विचित्र नजरेनं पाहिलं. जणूं त्या कटाक्षानं तिनं विचारलं, 'काय म्हणतेस, राजाभाऊबद्दल मनाशीं तूं पुष्कळ विचार करीत असतेस? माझी नव्हती कल्पना! हें बरं नाहीं हं!'

नीलांबरीनं मग संभाषण बंद केलं, पण तिच्या मनांत सुरू असलेले राजाभाऊबद्दलचे विचार बंद झाले नाहींत.

पहिल्यापासूनच तिचं राजाभाऊकडे इतरांच्यापेक्षां अधिक सूक्ष्म लक्ष असे. त्याचं बोलणं चालणं ऐकण्याविषयीं ती अधिक उत्सुक असे. त्याच्या

सहवासांतून शक्य तितकं दूर होऊं नये असे तिचे प्रयत्न असत. त्याच्या चर्येवर उमटणाऱ्या आनंदाच्या अगर विषादाच्या, उत्साहाच्या अगर निरुत्साहाच्या छटा ओळखण्याचं सामर्थ्य तिच्या नजरेंत इतरांच्या दृष्टीपेक्षां अधिक असे. त्यामुळें अलीकडे अलीकडे राजाभाऊच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला असंतोष आणि अनिश्चय इतरांच्या ध्यानांत जरी आला नव्हता तरी नीलांबरीच्या लक्षांत थोडासा आल्यावाचून राहिला नव्हता. तिला दिसून आलं होतं, कीं परदेशच्या दौऱ्याबद्दल राजाभाऊ आतां पूर्वीसारखा वारंवार किंवा उत्साहानं बोलत नसे. रात्रीं कित्येक वेळां ती कानोसा देऊन ऐके तों त्याच्या खोलींत पूर्वी चालणारी टाइपरायटरची टकटक चालू नसलेली तिला आढळून येई. देखावे तयार करणारे चितारी आणि इतर कामगार लोक यांच्यावरची त्याची पूर्वींची कडक देखरेख थोडी ढिली झालेली तिला आढळून आली होती. तिच्या व जयमालेच्या नृत्याची तालीम रोज कसोशीनं पहाणारा राजाभाऊ आतांशा एखाद्या दिवशीं त्या वेळीं गैरहजरही असे. कधीं कधीं सबंध दिवसच्या दिवस तिला त्याचं दर्शनही होत नसे. त्याच्या वागण्याचा तिच्या मनाला मोठा चमत्कार वाटूं लागला होता......

आणि त्याबद्दल विचार करतांना तिच्या मनांत एक नवीनच कल्पना झट्‌दिशी चमकून जाई, आणि त्या कल्पनेचं तिला अतिशय दुःख होई......

तिला वाटे, ज्या राजाभाऊचा प्रीति संपादन करण्याची तिची स्वतःची इच्छा होती त्या राजाभाऊचं दुसऱ्या कुणा तरी स्त्रीवर प्रेम जडून तर तो आतांशा असा अस्वस्थचित्त झालेला नाहीं ?......

मग या कल्पनेचा पडताळा घेण्यासाठीं ती राजाभाऊच्या वागण्याकडे आणि बोलण्याचालण्याकडे अधिकच बारकाईची नजर देई.

तिला त्यांत यश येत नसे; पण त्या कल्पनेचा पडताळा घेतां आला नाहीं तरी ती मनांतून घालवणंही तिला कठीण होई.

आतां तिनं जयमालेशीं बोलणं बंद केलं तेव्हांहि तिच्या मनांतलं नेहमींचं विचारचक्र सुरू झालं, अन् त्याच कल्पनेपाशीं येऊन थांबलं. तिनं कपडे फेकले,

अंथरूणांत अंग टाकलं, पण तिला झोंप लागेना. आपलं प्रेम राजाभाऊला स्पष्ट सांगून टाकण्याची आपल्याला कशी संधि मिळेल याचा ती सारखा विचार करीत राहिली.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास राजाभाऊ कोठूनसा परत आला. तो बंगल्याच्या दारांतच लालाजींची मोटर बाहेर जाण्याच्या तयारींनं उभी असलेली त्याला दिसली. त्याला पहातांच मोटारींत बसलेले लालाजी म्हणाले,

" राजाभाऊ, आम्ही जाऊन येतों हं. बारा वाजेपर्यंत येतों. आज पुन्हां मेजवानी आहे एका स्नेह्यांच्या घरीं. या मेजवान्यांनीं अजीर्ण व्हायची वेळ आली."

ते हंसले व राजाभाऊही हंसला. पण त्यांच्याजवळ एकटी जयमाला बसलेली पाहून त्यानं विचारलं,

" पण हें काय, आपण दोघंच चाललांत ? नीलाबाई कशा नाहींत बरोबर ? "

जयमाला म्हणाली,

" तिनं आज करून ठेवली आहे ना भानगड— "

" ती काय ? "

" आज तालमीच्या वेळीं तिचा पाय मुरगळला ! "

" कुणाचा ? नीलाबाईचा ? "

" हो ना ! पडली आहे अंथरुणावर. बघा जाऊन. "

" मग त्याच्यावर उपाय ? "

" डॉक्टर येऊन गेले. पाय बांधून ठेवला आहे त्यांनीं तिचा. कांहीं विशेष घाबरायचं कारण नाहीं असं त्यांनीं सांगितलं आहे. "

" तरी बरं म्हणायचं ! स्प्रेन बीन झाला असता पाय म्हणजे केवढी पंचाईत झाली असती ? "

"तर काय ? आमच्या नीलाची अशी भानगड असायची सदा !"

सगळीजणं हंसलीं आणि लालाजींची मोटर चालूं झाली.

राजाभाऊ बंगल्यांत शिरला आणि नीलांबरीच्या खोलीकडे गेला. त्या खोलींत तो पूर्वी कधींही गेला नव्हता, त्यामुळें आज तिथें प्रथम प्रवेश करतांच खोलीची सजावट पाहून त्याच्या मनावर विस्मयाचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. लालाजींच्या घरांतल्या मंडळींची रहाणी बरीचशी थाटामाटाची होती हें इतक्या दिवसांच्या सहवासानं आतां त्याच्या पूर्ण लक्षांत आलं होतं. तथापि नीलांबरीचं शय्यागृह असं एखाद्या राजकन्येच्या मंदिराप्रमाणें सुसज्ज असेल अशी त्याची कल्पना नव्हती. कदाचित् राजकन्येचं मंदिर तरी त्यानं प्रत्यक्ष कधीं पाहिलं होतं ? म्हणून नीलांबरीच्या खोलीच्या शृंगाराचा त्याला चमत्कार वाटला असंहा असेल. पण तो वाटला खरा. खोलीभर आंथरलेले निरनिराळ्या रंगाचे अस्सल मखमलीचे उंची गालिचे, भारी किंमतीचं बैठकीचं सामान, कोंपऱ्या कोंपऱ्यांत मांडलेल्या निरनिराळ्या आकाराच्या टेबलांवर ठेवलेल्या मूल्यवान पंजाबी घाटाच्या पितळी कुंड्यांत डोलणारीं 'पाम' जातीचीं झाडं, भिंतीवरचे बिलोरी आरसे आणि सुंदर देखावे, फ्रेंच पद्धतीच्या उंच प्रशस्त खिडक्यांपुढें झुलणारे रंगीत पडदे इत्यादि वस्तूंचं दृश्य फिकट गुलाबी छटेच्या विद्युद्दीपांनीं टाकलेल्या प्रकाशांत राजाभाऊला एखाद्या स्वप्नांतल्या दृश्याप्रमाणं वाटलं. मनावरचा विस्मयाचा परिणाम ओसरूं देण्यासाठीं तो क्षणभर दारांत तसाच उभा राहिला. आणि मग त्यानं दृष्टि वर करून समोर पाहिलं तों एका राजशाही मंचकार गुडघाभर उंच गादीवर रेशमी आभ्र्याच्या उंची उशागिर्द्यांचा मानेखालीं आधार घेऊन नीलांबरी पडली असलेली त्याला दिसली.

ती जागी होती कीं तिला झोंप लागलेली होती हें तिथें दारांत उभं राहून त्याला कळण्यासारखं नव्हतं. कारण तिची मान पलीकडच्या भिंतीच्या बाजूला वळलेली होती.

राजाभाऊ मंचकाजवळ गेला आणि म्हणाला,

"नीलाबाई !"

नीलांबरीनं मान वळविली नाहीं.

तिचे डोळे मिटले असलेले पाहून राजाभाऊनं विचारलं,

" नीलाबाई, झोंप का लागली आहे तुम्हांला ? "

तरीहि नीलांबरीनं दृष्टि उघडली नाहीं किंवा मानही वळविली नाहीं. पण 'अं ऽऽ' असा कण्हल्यासारखा व्यथेचा स्वर मात्र तिच्या तोंडून बाहेर पडला.

तिला झोंप लागली आहे असं समजून राजाभाऊ तिथून जाणार होता; पण तिचं कण्हणं ऐकल्यावर तो तिथेंच उभा राहिला.

क्षणभरानं त्यानं पुन्हां हाक मारली,

" नीलाबाई ! "

या वेळीं मात्र नीलांबरीनं मान फिरविली आणि डोळे उघडून त्याच्याकडे पाहिलं.

त्यानं विचारलं, " पाय फार का दुखतो आहे ? "

कांहीं उत्तर करण्याऐवजीं ती फक्त स्थिर दृष्टीनं त्याच्याकडे पहात राहिली.

त्यानं विचारलं, " असा कसा लचकून घेतलांत पाय ? "

तरीही ती तशीच पहात राहिली. तिच्या स्थिर दृष्टींत कसला तरी विलक्षण अभिप्राय प्रगट होऊं लागला.

पण तो अभिप्राय जणूं आपल्याला कळतच नाहीं अशा आविर्भावानं राजाभाऊनं आपले प्रश्न सुरूं ठेवले,

" फारसं नाहीं ना दुखावलेलं पाऊल ? डॉक्टर आले होते ना ? काय म्हणाले ते ? एक दोन दिवसांत बरं वाटेल असं म्हणाले ना ? तुम्ही घाबरला आहांत काय ?... "

पण त्याचा एकही प्रश्न तिनं जणूं ऐकलाच नाहीं.

त्याच्या चर्येवर रोंखलेली तिची नजर कायम होती; आणि आतां त्या अर्थपूर्ण नजरेच्या भरीला तिचे गुलाबी ओंठ मोहक हास्य प्रगट करूं लागले होते.

राजाभाऊच्या मनाची स्थिति चमत्कारिक झाली, पण आपल्या मनः-स्थितीची कबुली आपल्या चर्येनं या क्षणीं देतां कामा नये येवढी सावधता त्यानं सहज राखली.

तो म्हणाला,

"असं नुसतं पहातां काय माझ्याकडे? बोला ना माझ्याशीं. मी तुमच्या समाचाराला आलों अन् तुम्हीं—"

"समाचाराला आलांत? फार फार उपकार झाले तुमचे! आतां जन्मोजन्मीं तरी ते मला फेडतां येतील कीं नाहीं कुणास ठाऊक?"

तिच्या बोलण्यांत उघडच मनस्वी उपरोध होता.

राजाभाऊनं म्हटलं,

"असं तुम्ही कां बोलावं मला समजत नाहीं."

"समजत नाहीं! समजत नाहीं! मी काय केलं म्हणजे तुम्हांला समजेल? किती चमत्कारिक वागतां तुम्हीं आतांशा! इतके दिवस झाले, कधीं माझ्याशीं बोललांत, कां बसलांत, कां विचारपूस केलीत? पूर्वी माझ्या नाचावर कठोर टीका करीत होतां तीसुद्धां करायचं आतांशा सोडून दिलंत! तुम्हीं माझ्याशीं संभाषण करावं, तुमचे चार गोड शब्द ऐकावेत म्हणून कान उत्सुक असावेत पण ते तसेच उत्सुक रहावेत, तुमच्याशीं बोलायला मिळावं म्हणून मन उत्कंठ असावं पण तें तसंच उत्कंठ रहावं, तुम्हीं निदान इकडे तिकडे वावरतांना तरी दिसाल म्हणून डोळ्यांनीं तुम्हांला अधीरतेनं शोधावं पण त्यांची अधीरता तशीच रहावी, रात्रीं काम करीत असतांना तरी तुम्ही सांपडाल म्हणून आशेनं तुमच्या खोलीकडे यावं पण् आंतून बंद असलेल्या दारानं निराशा करावी, असं रोज चाललेलें आहे. हा छळ मीं मनांतल्या मनांत पुष्कळ सहन केला, अन् अखेर तुम्हांला माझ्याकडे येणं भागच कसं पडेल याचा पुष्कळ विचार करून शेवटीं आज मी हें नाटक केलं......"

" नाटक केलं ?" राजाभाऊनं विस्मयानं विचारलं, " मी समजलों नाहीं नीलाबाई. नाटक केलं म्हणजे ?"

" तुम्ही काय समजतां ? माझा पाय खरंच लचकला आहे ?"

राजाभाऊनं कांहींच न बोलतां केवळ अत्यंत विस्मयाची दृष्टि तिच्याकडे लावली.

नीलांबरीनं क्षणभर त्याच्या नजरेला नजर लावली आणि नंतर विचित्र हास्य करून ती झटकन् आंथरुणांत उठून बसली, डॉक्टरनीं पावलावर बांधलेली पट्टी तिनं भराभर सोडून टाकली, आणि मंचकाखालीं उतरून खोलींत येरझारा घालून तिनं त्याला विचारलं,

" आतां समजलं माझं नाटक ? माझ्या पायाला कांहीं एक झालेलं नाहीं. तुमची माझी भेट व्हावी म्हणूनच केवळ हें सारं सोंग मी केलं. माझं पाऊल अगदीं शाबूद आहे. पण माझ्या हृदयाला केवढी जखम झालेली आहे हें तुमच्या ध्यानांत आतां तरी आलं कां ?"

हें बोलतां बोलतां तिच्या चर्येवरचा हास्याचा प्रकाश झराझर ओसरत गेला आणि अखेर त्या प्रकाशाऐवजीं दैन्याची आणि कारुण्याची विलक्षण दाट छाया दिसूं लागली तिचे डोळे अश्रूंनी भरून आले आणि तिच्या तोंडून हुंदके बाहेर पडण्यास एखाद्या अर्ध्या क्षणाचाच अवकाश उरला.

हा प्रकार राजाभाऊला अत्यंत अकल्पित वाटला. या वेळीं आपण कसं वागलं पाहिजे याबद्दल एक क्षणभरच त्याचं चित्त संभ्रमित झालं. दुसऱ्याच क्षणीं स्वतःच्या कर्तव्याची त्याची निश्चिति झाली, आणि मान फिरवून तो म्हणाला,

" नीलाबाई, माफ करा, मी जातों."

तो गेलाही असता—

पण त्याचा हात झटकन् धरून नीलांबरी म्हणाली,

" नाहीं नाहीं. मी काय म्हणतें तें तुम्हांला ऐकून घेतलंच पाहिजे. माझं तुमच्यावर प्रेम आहे. प्राणापलीकडे प्रेम आहे. अन् तुम्ही त्याचा स्वीकार केला नाहींत तर मी यापुढें जगणं शक्य नाहीं."

राजाभाऊनं तिच्या नजरेला नजर दिली पण तिच्या हातातून आपला हात सोडवून घेत म्हटलं,

" नीलाबाई, हा काय अविचार ? "

" अविचार ? मी तुमच्यावर प्रेम करावं याला तुम्ही अविचार म्हणता ? म्हणजे माझ्या प्रेमाचा तुमच्याकडून स्वीकार होईल ही माझी आशा अविचाराची आहे ? "

" नीलाबाई, तुमच्या प्रेमाला मीं यत्किंचितही उत्तेजन दिलं तर माझ्या हातून तें केवढं असत्कृत्य घडल्यासारखं होईल याचा कसा कधीं तुम्हीं विचार केला नाहीं ? तुमच्या वडिलांनीं मला किती विश्वासानं घरातल्या एखाद्या माणसाप्रमाणं ठेवून घेतलं आहे ! तुमच्याकडे मीं जर प्रेमिकाच्या नजरेनं पाहिलं तर त्यांचा अक्षम्य विश्वासघात केल्यासारखं होणार नाहीं कां ?...... "

नीलांबरीनं जणूं त्याच्या त्या बोलण्याचा राग आल्यासारखी दृष्टि केली आणि म्हटलं,

" विश्वासघात ? म्हणजे तुम्हीसुद्धां एखाद्या सामान्य माणसासारखंच बोललांत ! विश्वासघात ? मला थोडंसं हंसू येतं या शब्दाचं ! ज्या पुरुषाचा आईबापांना परिचय नाहीं त्याच्यावर मुलींनीं प्रेम केलं तर आईबाप म्हणणार, आम्हांला अपरिचित असलेल्या माणसावर प्रेम करणं योग्य नाहीं. अन् उलट त्यांचा ज्याच्याशीं पूर्ण परिचय झाला आहे अशा माणसाला मुलींनीं प्रेम अर्पण केलं तर त्यांचा विश्वासघात घडणार ! हा अमका पुरुष तुझ्या प्रेमासाठीं निवडून आम्ही आणला आहे, याच्यावर तूं प्रेम कर असं आईबाप कधीं मुलीला म्हणतील हें शक्य आहे काय ? तेंही शक्य नाहीं, आणि मुलीनं एखाद्या पुरुषावर स्वतःच्या मनानं प्रेम केलं तर तेंही योग्य नाहीं. म्हणजे प्रेमासाठीं मुलींचा जन्म नाहीं असंच म्हणतां कीं काय ? "

तिनं विचारलेला प्रश्न खरोखरच विचार करण्यासारखा आणि एक प्रकारें बिनतोड होता असें त्या क्षणींदेखील राजाभाऊला वाटल्यावाचून राहिलं नाहीं. पण ती वेळ प्रेमाची सर्वसामान्य चर्चा करण्याची नव्हती. ज्या नीलांबरीकडे त्यानं प्रणयी लोभाच्या नजरेनं चुकूनसुद्धां पाहिलं नव्हतं

तिच्यापुढें तो उभा होता, आणि शक्य तितकं तिचं मन न दुखवतां तिला आपल्या अंतःकरणाची खरी स्थिति सांगण्याची वेळ त्याच्यावर आली होती. तिच्याशीं काय आणि कसं बोलावं तें झटकन् न सुचल्यामुळें तो कांहीं वेळ मान किंचित् खालीं करून स्तब्ध उभा राहिला. पण मग लगेच वर बघून तो तिला म्हणाला,

" मुलींचा जन्म प्रेमासाठीं नसतोच कीं काय तें मी कसं सांगूं ? पण नीलाबाई, येवढं मात्र खचित सांगतों, कीं तुमच्यासारख्या मुलींचा जन्म माझ्यासारख्या माणसावर प्रेम करण्यासाठीं नाहीं. संपत्ति, सामाजिक दर्जा, आवडीनिवडी, सुखदु:खांच्या कल्पना इत्यादि सर्वच दृष्टींनीं तुमच्या माझ्यांत मोठं अंतर आहे. इतकं कीं माझ्यावर प्रेम केल्यानं तुमचं कल्याण होणं शक्य नाहीं. "

नीलांबरीनं त्याच्याकडे अगदीं टवकारून पाहिलं. त्याच्या त्या बोलण्याचं तिला आश्चर्य वाटलंसं दिसलं नाहीं. किंबहुना तिला जें अपेक्षित तेंच तो बोलला असा तिच्या मुद्रेवर अभिप्राय दिसला. प्रतिपक्षानं वार केल्यावर यत्किंचित्‌ही स्तिमित न होतां उलट वार करणाऱ्या माणसाच्या तयारीनं ती चटकन् म्हणाली,

" तुमच्या माझ्यांत अनेक प्रकारचं अंतर आहे हें मीं मुळींच नाकबूल करीत नाहीं. पण अशा कुठल्या दोन व्यक्ती असतील, कीं ज्यांच्यांत या नाहीं त्या प्रकारचं थोडंससुद्धा अंतर नसेल ? आणि शिवाय, सारं अंतर नाहींसं करून पुरुषाशीं एक होण्याची अनिवार इच्छा म्हणजेच स्त्रीची प्रीति ना ? तें अंतर जितकं अधिक असेल तितकी प्रीतीची कसोटी अधिक कठिण असं म्हणा वाटलं तर ! पण तें कितीही मोठं असलं, तरी खऱ्याखुऱ्या प्रीतीला त्याचं भय दाखविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण तें अंतर प्रीतीनं आधींच ओलांडलेलं असतं. त्यापलीकडे गेल्यामुळें तिला तें दिसत नाहीं. प्रीति आंधळी असते ती तिला दृष्टि नसते या अर्थानं नव्हे, तर सामान्य दृष्टीला जे जे नाना प्रकारचे भेद पुढें दिसत असतात ते आधींच ओलांडल्यामुळें प्रीतीला दिसत नाहींत या अर्थी ! तुमच्या माझ्यांतल्या अंतराच्या गोष्टी मला सांगूं नका. तुम्ही फार निराळे आहांत. केवळ माझ्यापेक्षांच नव्हे, तर जे जे सुशिक्षित,

श्रीमंत, जेवढे पुरुष मी पाहिले त्या सर्वांपेक्षां तुम्ही निराळे–फार निराळे आहांत! म्हणूनच माझं मन तुमच्यावर जडलेलं आहे. राजाभाऊ, सारा विनय सोडून अशीं बोलणीं बोलणं स्त्रीला सोपं नसतं. प्रेम हृदयांत मावेनासं झालं, निराशेची शंका सहन होईनाशी झाली, जीव कासावीस झाला तरच स्त्री असं बोलूं शकते."

हें बोलतां बोलतां अखेर नीलांबरी अत्यंत भावनाविवश झाल्यासारखी दिसली. तिच्या दृष्टींतली नेहमीची उल्हसित खेळकर छटा नाहींशी होऊन तिच्या ऐवजीं गंभीर पण आर्जवी असं अत्यंत मनोहर तेज दिसूं लागलं. दीर्घकाल अंतःकरणांत कोंडून धरलेले शब्द वाचेवाटे एकदम बाहेर पडूं दिले कीं माणसाला श्वास अपुरा होतो, त्याप्रमाणें तिला झाल्यामुळें ती बोलायची थांबली तरी तिचं तोंड उघडं राहिलं. तिच्या ओठांच्या त्या विलगपणांत एक प्रकारची चमत्कारिक असहायता प्रगट झाली. तिच्या नाकपुड्या स्फुरत राहिल्या–जणूं जिव्हेची भाषा थांबली तरी त्यांची भाषा चालूच होती! तिचा उरोभाग वर खालीं होत राहिला, आणि प्रार्थनेच्या आविर्भावानं तिनं आपले दोन्ही पंजे राजाभाऊपुढें पसरले!......

ती तशीच त्याच्याकडे पहात क्षणभर उभी राहिली. त्याच्या मुद्रेवर अत्यंत कोमलता आलेली तिला दिसली; पण ती कोमलता प्रणयभावनेची नसून केवळ दयेची, करुणेची आहे हें लक्षांत येतांच तिनं आपलं मस्तक झटकन् खालीं करून आपल्या दोन्ही पंजांत टेकलं आणि हुंदका दिला.

राजाभाऊ तिला म्हणाला,

"नीलाबाई, मनाला असा व्यर्थ त्रास करून घेणं बरं नाहीं. तुम्ही विचारी आहांत, शहाण्या आहांत, सर्व प्रकारें असामान्य आहांत. सामान्य मुली जसं वागतील तसंच कां बरं तुम्ही वागायचं? तुम्हीं ज्याप्रमाणं स्पष्ट बोलायसाठीं स्त्रीला सहजासहजी न सुटणारा विनय सोडलांत, त्याचप्रमाणं तुम्ही आजपर्यंत माझ्या निमित्तानं अंतःकरणाला जी व्यथा लावून घेतलीत तिचा यापुढें तरी तुम्हांला व्यर्थ शीण होऊं नये म्हणून मीही जें खरं तें सांगितलं अन् स्पष्ट बोललों तर तें समजून घेण्याची पात्रता तुमच्या अंगीं खचित आहे. तुमच्या प्रेमाला उलट प्रेमाचा जबाब मला देतां आला नाहीं,

तरी त्याची थोरवी मला पूर्णपणें कळतें. इतकं बहुमोल प्रेम माझ्या वांट्याला यावं हें माझं भाग्य नव्हे तर दुर्भाग्य होय. प्रेमाचं प्रतिदान करतां येत असेल तरच त्याचा स्वीकार करायला मनुष्य पात्र ठरतो. ही पात्रता माझ्या अंगीं नाहीं. ती अंगीं नसतांना केवळ या घटकेच्या मोहाला भुलून अन् तुमच्याशीं कठोरपणानं बोलायचं टाळून मी या वेळीं वागलों तर आपल्या दोघांच्याही जन्माच्या दुःखाला ती गोष्ट कारणीभूत होईल. तुम्ही ज्या भावनेनं माझ्याकडे पाहतां ती भावना माझ्या अंतःकरणांत नसतांना—"

इतका वेळ हातांनीं आपलं मस्तक झाकून स्फुंदत स्फुंदतच त्याचं बोलणं ऐकणाऱ्या नीलांबरीनं एकदम मान वर करून त्याच्याकडे पाहिलं आणि आवेगानं विचारलं,

"तुम्हांला अगदीं कांहीं कांहीं वाटत नाहीं माझ्याविषयीं ?"

"नीलाबाई, तुमच्या बुद्धीविषयीं आणि नृत्यकलेच्या निःसीम भक्तीविषयीं मला अतिशय आदर वाटतो, तुमच्या कलाचातुर्याविषयीं आणि नैपुण्याविषयीं मला अतिशय कौतुक वाटतं—"

"आदर ! कौतुक ! मी काय करूं म्हणजे या दोन्ही गोष्टी नाहींशा होऊन प्रीतीचा लहानसा तरी अंकुर तुमच्या मनांत उत्पन्न होईल, अन् तुम्ही थोडेसे तरी माझ्या जवळ याल ?"

"छे छे, आपण दोघांनीं आलो यापेक्षा अधिक जवळ येण्यांत सुखापेक्षां दुःखाचाच संभव फार आहे. म्हणून म्हणतो आपण दोघंही विवेकानं वागूं. तुमचं अंतःकरण मला समजलं; माझं तुम्हांला समजलं. येवढ्यावरच ही गोष्ट आपल्याला संपवितां येईल. ही घटका आपण विसरून जाऊं. ती विसरणं प्रथम कांहीं दिवस जड जाईल पण कालांतरानं तें सोपं होईल. या संसाराच्या मार्गावरच्या सगळ्या प्रवाशांचा काल हा एकच मोठा स्नेही आहे. आपण दोघं योगायोगानं एकत्र आलों तद्वतच आपण एकमेकांपासून दूर होऊं. आपल्या दोघांचीं आयुष्यं सदा एकाच वळणानं थोडींच जायचीं आहेत ? आपले मार्ग भिन्न भिन्न आहेत. मी तुमच्यापासून दूर झालों तरी तुम्ही मोठ्या व्हाल, कीर्ति मिळवाल, आणखी—आणखी कलाचातुर्य संपादन कराल, सुखी व्हाल—"

नीलांबरीनं त्याला पुढें बोलूं दिलं नाहीं. तिनं दोन्ही हातांचीं बोटं एकमेकांत गुंतवून पंजांनीं आपला ऊर दाबला, आणि विव्हल झाल्यासारखा आवाज काढून म्हटलं,

" सुखी होईन ? मी सुखी होईन ? इतके भयंकर शब्द तुम्ही कसें बोलूं शकतां ? तुम्ही माझ्यापासून दूर झाल्यावर मला अभागिनीला एकच गति उरेल. मरण ! माझी प्रीति तुम्हांला नीट कळावी यासाठीं मी काय करूं ? हा ऊर असा फाडून माझं अंतःकरण तुम्हाला दाखवतां आलं असतं तर दाखविलं असतं. तुम्हांला पुन्हां विनवून सांगतें, कीं इतरांनीच नव्हे, तर तुम्हीसुद्धां कितीही शहाणपणाच्या अन् विवेकाच्या गोष्टी मला शिकविल्यात तरी त्यांचा मला कांहीं एक उपयोग नाहीं. माझं जगणं एकाच गोष्टीवर अवलंबून आहे. ती म्हणजे तुमचं प्रेम !

' छे छे, तें शक्य नाहीं.' असे शब्द जरी राजाभाऊच्या तोंडून बाहेर पडले नाहींत, तरी त्यानं ज्या तऱ्हेनं मान हालविली तिच्यावरून तो अभिप्राय नीलांबरीच्या ताबडतोब लक्षांत आला, आणि म्हणून ती लगेच पुढें म्हणाली,

" निदान माझ्या प्रेमाचा तुमच्याकडून होणारा स्वीकार ?—"

" नाहीं नाहीं ! नीलाबाई, तेंही शक्य नाहीं. कृपा करा अन् हा वेडा हटवाद सोडा. तुमच्या माझ्यांत केवढं अंतर आहे हें मी तुम्हांला मघाशींच सांगितलं—"

" पण त्याची मला क्षिति नाहीं असं तुम्हांला सांगितलं ना ? "

" हो, पण त्या अंतराबद्दलची एक गोष्ट मी अजून तुम्हांला सांगितली नव्हती ती आतां सांगतों. कुणाजवळही इतक्यांत तिचा उच्चार करायची माझी इच्छा नव्हती, पण तुम्हीं माझा नाइलाज केला आहे. तेव्हां तुम्हांला स्पष्ट सांगणं आतां भाग आहे. तुम्ही ती कुणाजवळ बोलूं नका, गुप्त ठेवा—"

" म्हणजे......तुमचं दुसऱ्या कुणा स्त्रीवर प्रेम आहे असं म्हणतां ? राजाभाऊ, तसं असलं तरी—"

" छे छे, तसं नाहीं."

"मग कसं म्हणतां ? माझा कांहींच तर्क होत नाहीं. लवकर सांगा."

"नीलाबाई, तुमचं जिवित सर्वस्वी सुखासाठीं अन् उपभोगासाठीं आहे. माझं त्यागासाठीं आहे."

"यांत विशेष तें काय सांगितलं ? तुमच्या त्यागवृत्तीशीं मी समरस होणार नाहीं अशी तुम्हांला शंका वाटते ?"

"सामान्य त्यागाविषयीं मी बोलत नाहीं. तुमच्या माझ्यांतलं जें अंतर मला सांगायचं आहे तें फार निराळं आहे. इहलोक आणि परलोल यांतलं तें अंतर आहे. आणखी किती दिवस मला जगतां येईल तें मला सांगतां येत नाहीं. लाठीला अगर बंदुकीला बळी पडून शेंकडों सत्याग्रही मरत असल्याच्या हकीगती तुमच्या कानावर आज काल येतच असतील. तशाच प्रकारची माझ्या मृत्यूची हकीगत कदाचित् थोडयाच दिवसांत तुम्हांला समजेल. ज्या माणसानं परलोकाच्या प्रवासाची अशी तयारी केली आहे त्याच्यावर कशाला बरं तुम्ही आपल्या सुंदर प्रेमाची ताजीं सुकुमार फुलं टाकायचीं ? नीलाबाई, पुन्हां सांगतों—"

पण त्याला पुढें न बोलूं देतां नीलांबरी म्हणाली,

"राजाभाऊ, माझं सर्वस्व तुम्हांला अर्पण करण्याच्या माझ्या निश्चया-पासून मला परावृत्त करण्याची खटपट कशाला करतां ? कारण, मला जें अर्पण करायचं तें मीं आधींच केलेलं आहे. फक्त त्याचा उच्चार करायचा राहिला होता तो मीं आज केला. प्रेमिकाला लोकापवादाची सामान्य लज्जा, किंवा असामान्य संकटाची भीति बाटूं शकत नाहीं. गवताची पात दिसायला नाजूक खरी, पण काळ्या काठिण भूमिभागाचं कवच फोडून ती बाहेर येते ! तद्वतच लौकिक लज्जा आणि भीति यांचं कठीण कवच आधीं फोडून मगच खरी प्रीति प्रगट होत असते. माझं आयुष्य सुखासाठी अन् उपभोगासाठीं आहे असं तुम्ही आपल्या मनानंच ठरवून कां बोलतां ? आतापर्यंतचं माझं आयुष्य तसं झालं असेल. पण यापुढचं नाहीं. यापुढें तुमच्यासाठीं जगतां येत असेल तरच मी जगेन. अन् तुमच्यासाठीं मी मृत्यु पत्करावा अशी तुम्ही आज्ञा केली—"

राजाभाऊ एकदम गंभीर चर्या करून म्हणाला,

"माझ्यासाठीं नव्हे! आपल्या मायदेशासाठीं! आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठीं!"

"मायदेश किंवा मायदेशाचं स्वातंत्र्य या शब्दांचा पूर्ण अर्थ मला कळत नाहीं. माझा मायदेश मीं नीटसा पाहिलेला नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याचा विचार करण्याइतकी माझी बुद्धि प्रगल्भ नाहीं. तुम्हांला मीं माझं सर्वस्व अर्पण केलेलं आहे. अन् मायदेश, स्वातंत्र्य, परमेश्वर, मोक्ष अशा सर्व कल्पना तुमच्या ठिकाणीं मूर्त झालेल्या मला दिसताहेत. माझं तुमच्यावर अनन्य प्रेम आहे. तुमच्याबरोबर मला जगतां आलं तर जीवितांतलं परमसुख मला मिळालं असं मला वाटेल! पण तुमच्या आज्ञेवरून, तुमची इच्छा म्हणून तुमच्याबरोबर मला मरायची वेळ आली तर त्यांतही माझ्या जिवाला मोठी धन्यता वाटेल."

तिच्या बोलण्यांतल्या शब्दाशब्दांत भावनेचा जो तीव्र आवेग भरलेला होता त्यानं राजाभाऊचं चित्त इतकं वेधून घेतलं होतं, कीं बोलतां बोलतां ती त्याच्या अगदीं जवळ सरकली, त्याला बिलगली हें त्याच्या ध्यानांतच आलं नाहीं. त्याच्या लक्षांत आलं तेव्हां तिचे पंजे त्याच्या खांद्यावर होते, तिनं आपल्या मस्तकाची एक बाजू त्याच्या छातीवर टेकली होती, आणि वर दृष्टि करून ती त्याच्याकडे पहात होती!

तिनं असं केलं नसतं तर बरं झालं असतं असं जरी त्याला वाटलं, तरी तिला दूर लोटण्याचा कठिणपणा त्याला करवेना.

खालीं मान करून तिच्याकडे स्थिर दृष्टीनं पहात त्यानं विचारलं,

"खरंच? वाटेल तें दिव्य करायची तयारी आहे?"

"माझ्या प्रेमाचं सामर्थ्य सिद्ध करायसाठीं वाटेल तें."

"मरणाचंसुद्धां?"

"हो, मरणाचंसुद्धां."

तो तिच्याकडे पहात राहिला. किंचित् हास्य त्याच्या मुखावर क्षणभर दिसलं; पण मग लगेच त्याच्या भुंवया आकुंचित झाल्या आणि त्याची चर्या गंभीर झाली!

केवळ देशाच्या स्वातंत्र्ययुद्धांत एका सैनिकाची भरती व्हावी या हेतूनं स्त्रीच्या प्रेमाचा स्वीकार कधीं कुणी केला असेल का? असं त्याच्या मनांत आलं. जगण्याप्रमाणेंच मरण्यांतही प्रीतीला धन्यता वाटते? केवळ शरीर-क्लेशाच्या आणि कदाचित् देहावसानाच्या मार्गावर नेऊन ठेवण्यासाठींच प्रेमाचं खोटं नाटक करून या सुंदर कोमलांगीला करपाशांत घेणं योग्य ठरेल काय? मायदेशासाठीं अशी विचित्र प्रतारणा करणं क्षम्यच नव्हे तर इष्टही होतं काय?......

या प्रश्नांचीं उत्तरं त्याला मिळण्यापूर्वींच त्याचा उजवा हात त्याला नकळत तिच्या मस्तकावर टेकला गेला, आणि त्यानं पाहिलं तों सुखाच्या समाधींत माणसानं मिटावेत त्याप्रमाणें तिनं आपले नेत्र मिटले होते!



## [२४]

बहिणीबहिणींत आजपर्यंत कधीं भांडण झालं नव्हतं. पण आज लहानसं भांडण करायच्या हेतूनंच जयमाला नीलांबरीच्या खोलींत शिरली.

ती तिच्या शय्येजवळ गेली अन् म्हणाली,

" नीला, तुझा पाय आतां बरा झाला आहे ना ? "

" हो, चार दिवसांपूर्वीच डॉक्टरनीं पट्टी सोडली, माहित नाहीं कां तुला ? "

" माहीत आहे, म्हणूनच विचारतें. "

" काय ? "

" तुझ्या मनांत काय आहे ? "

" ओळख, ओळखतां येत असलं तर ! अन् नसलं येत तर तुला कशाला सांगूं ? "

" असल्या बोलण्यानं मला कांहीं समजायचं नाहीं. तुझा बेत काय आहे ? आतांशा तूं नाचाची तालीम मुळींच घेत नाहीस, हें काय ? "

" त्याची काळजी करूं नकोस ग ! आयत्या वेळेस बघ तरी मी कसं सुंदर काम करतें तें. राजाभाऊंचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे. "

" तेही तुला अगदींच कसं बोलत नाहींत कोण जाणे ! "

" तुला माहीत नाहीं, ते पुष्कळ बोलले. "

" मग ? "

" त्यांचं ऐकायचं मीं त्यांना वचन दिलं आहे. "

" हेंच ऐकणं वाटतं ? अंथरुणांतून उठतसुद्धां नाहींस ! "

" लवकरच अशी उठणार आहे कीं तुला कल्पना नाहीं ! "

" तूं काय बोलते आहेस मला धड कळतच नाहीं, नीला. पण मला तुझा राग यायला लागला आहे. खोटं नाहीं. आपल्याला निघायला आतां किती दिवस उरले आहेत अशी तुझी कल्पना आहे ? स्वतःचे कपडेलत्ते आवरायला अन् आपली ट्रंक वगैरे भरायला लाग जरा.

" अग, आपले राजाभाऊ आहेत ना— "

" ते मॅनेजर झाले म्हणून त्यांनीं काय तुझ्या ट्रंकासुद्धां भरायच्या होय ? "

" त्यांना काळजी असली तर भरतीलही ! मला येवढंच समजतं, कीं त्यांनीं चल म्हटलं कीं चालायला लागायचं ! "

" मूर्ख आहेस तूं ! तुला कांहीं कळत नाहीं.

" अन् तुला तरी काय कळतं आहे ? "

" नीला, तूं अगदीं कशी— "

जयमाला आपल्या धाकट्या बहीणीची पुष्कळच कानउघाडणी करणार होती, पण तितक्यांत लाला नारायणप्रसाद खोलींत आले तें ' माला, माला ' अशा हांका मारीतच आले.

जयमालेनं वळून पाहिलं तों आपले वडील घाबऱ्या घाबऱ्याच खोलींत आल्यासारखे तिला भासले. तिनं विचारलं,

" काय ? काय झालं पिताजी ?"

लालाजी उभ्या उभ्याच म्हणाले,

" काय झालं काय विचारतेस ? घातच झाला म्हणेनास ! मला तर हें मोठं संकट वाटतं."

" म्हणजे ? कोणतं संकट ?"

लालाजी कपाळावरचा घाम रुमालानं पुशीत मटकन् बसल्यासारखे बसले, आणि 'कांहीं विचारूं नकोस' अशा अर्थानं नुसती मान हलवून 'हुश्श' असा सुस्कारा त्यांनीं टाकला.

त्यांच्या त्या करण्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळें जयमालेनं पुन्हां विचारलं,

" पिताजी, हें काय ? नीट सांगा ना. काय झालं ?"

मानेचाही घाम पुशीत लालाजी म्हणाले,

" राजाभाऊनीं असा घोटाळा केला तर कसं करायचं ? हुश्श ! मला तर कांहीं सुचत नाहीं."

" म्हणजे काय ? मी समजलें नाहीं."

" अग राजाभाऊ म्हणतात, ते जर आपल्याबरोबर कदाचित् येऊं शकले नाहींत तर आपण त्यांच्यावर रागावतां कामा नये."

'हात्तिच्या, येवढंच ना ?' अशा अभिप्रायानं जयमाला किंचित् हंसली व म्हणाली,

" नसेल यायचं त्यांच्या मनांत तर न येऊं दे त्यांना. आम्ही रागावण्याचा प्रश्नच कुठें उत्पन्न होतो ? नाहीं तरी आजपर्यंत कधीं कुणाच्या घरीं ते आमच्याबरोबर चहाला किंवा मेजवानीला आले ? आज डॉ. भाटीया यांच्याकडे यायचं त्यांनीं कबूल केलं तेव्हांच मुळीं मला जरासं आश्चर्य वाटलं. नसलं यायचं त्यांना तर—"

" अग, मेजवानीला जायचं कां मी तुला बोलतों आहे ?"

" मग काय तर ?"

" राजाभाऊ म्हणतात, कीं ते आपल्याबरोबर परदेशच्या सफरीला कदाचित् येऊं शकणार नाहींत ! "

हें ऐकतांच जयमालेनं किंचित् उघड्या झालेल्या आपल्या मुखावर डाव्या हाताचीं बोटं ठेवलीं, आणि म्हटलं,

" म्हणजे काय ? काय सांगतां पिताजी ? "

" मग ऐकते आहेस काय तर ? मोठं संकट येणार असं मी म्हणतों तें काय उगीच ? राजाभाऊंनी यायचं नाहीं म्हटलं कीं आपले हातपाय गळलेच कीं ! "

" पण यायचं नाहीं असं ते कां म्हणतात ? आमच्यावर ते रागावले तर नाहींत ना ? कुणाच्या हातून त्यांचा अपमान तर झाला नाहीं ना ? त्यांनीं एकदम असा विचार फिरवावा याचं काय कारण ? "

" एकदम नाहीं. ते म्हणतात, कीं आज बरेच दिवस त्याच्या मनात ही गोष्ट होती, अन् मला सांगावं न सांगावं अशा विचारात ते होते. "

" पण आमच्याबरोबर येण्याचा बेत रहित करण्याचं कारण काय ? "

" त्यांनीं बेत नक्की रहित केला आहे असंच कांहीं नाहीं. कदाचित् मी येणार नाहीं असंच ते मला म्हणाले. पण त्या ' कदाचित् ' शब्दांत कांहीं अर्थ नाहीं. ते येणार नाहींत अशींच लक्षणं मला दिसतात. "

" ते आले नाहींत कीं आटपलाच कारभार. त्यांच्यावांचून आमचं व्हायचं कसं ?

" तशी चिंता आम्ही करूं नये असं त्यांचं म्हणणं. ते जरी येऊं शकले नाहींत तरी त्यांच्या हाताखालच्या एका माणसाला एकंदर व्यवस्थेतल्या साऱ्या बारीक सारीक गोष्टीसुद्धां त्यांनीं समजावून दिल्या आहेत असे ते सांगतात. तो मनुष्य मॅनेजरची सारी जबाबदारी उत्तम रीतीनं पार पाडील अशी त्यांची खात्री आहे—"

" त्यांची असेल पण आम्हांला खात्री वाटणं शक्य नाहीं. राजाभाऊ नाहींत तर आमची सफरही नाहीं. तुम्ही त्यांना कसं सांगितलं नाहींत पिताजी कीं आम्ही सर्वस्वी त्यांच्यावर—"

" अग मीं सगळं सांगितलं, अन् अखेर माझ्या बोलण्याचा कांहीं परिणाम होत नाहीं असं पाहून तुला बोलवायला आलों. तुझं ते कदाचित् ऐकतील असं वाटतं. चलतेस कां त्यांच्याकडे ?"

" हें काय विचारणं पिताजी ? ही मी तुमच्यापुढेंच जातें पहा."

असं म्हणून जयमाला लगबगीनं उठली, आणि अर्धवट धांवतच राजाभाऊकडे जाऊन पोंचली.

ती आलेली पाहून राजाभाऊला आश्चर्य वाटलं नाहीं. लाला नारायणप्रसाद त्याच्या खोलींतून गेले तेव्हांच त्यानं कल्पना केली होती, कीं ते जयमालेला घेऊन येणार. त्यामुळें ती आल्यावर तिच्याशीं काय बोलायचं अन् कसं बोलायचं हेंही त्यानं ठरवून ठेवलं होतं.

मात्र तो जसजसं तिच्याशीं बोलूं लागला तसतसं आपलं म्हणणं तिला पटवणं सोपं आहे अशी जी मनाशीं त्यानं अपेक्षा केली होती ती चुकीची होती हें त्याला दिसून आलं. कारण, आपल्या मनांत अलीकडे अलीकडे वाढत चाललेल्या देशसेवेच्या इच्छेबद्दल जेव्हां तो बोलूं लागला, आणि ' जयमाला डान्सर्स 'च्या व्यवस्थेंत आपल्या गैरहजिरीनं कसलीही उणीव पडणार नाहीं असं आश्वासन जेव्हां तो तिला पुनःपुन्हां देऊं लागला तेव्हां जयमाला मधेंच म्हणाली,

" राजाभाऊ, तुमच्यांवाचूनही आमची सफर उत्तम प्रकारें पार पडेल असं तुम्ही कितीही सांगितलं तरी आम्हांला पटायचं कसं ? हें पटायची एकच वेळ होती. ती म्हणजे तुमचा आमचा परिचय झाला नव्हता तेव्हांची. आम्ही मालक अन् तुम्ही मॅनेजर असं कां तुमचं आमचं नातं आहे, म्हणून तुम्ही गेलांत तरी दुसरा कुणी मॅनेजर येईल असं समाधान आम्हांला वाटावं ? ही कंपनी तुमची, कल्पना तुमची, यश तुमचं, आम्ही सारी माणसं तुमचीं, अन् तुम्ही आमचे अशा भावनेनंच ना पहिल्यापासून तुम्ही आम्ही सगळीजणं वागलों ? मग ' मी येऊं शकत नाहीं, तुम्ही जा ' असं तुम्ही म्हणतांच आम्हांला केवढा मोठा धक्का बसत असेल याची कल्पना कशी करीत नाहीं तुम्ही ? केवळ मामुली व्यवस्थेसाठींच कां आम्ही तुमच्यावर अवलंबून आहोंत ?

आमचा सारा उत्साह, सगळा उल्हास तुमच्या एकेका उत्तेजनपर प्रेमळ शब्दावर अवलंबून आहे. तुम्ही नाहीं म्हणजे संपलंच सारं !"

हें अखेरचं वाक्य बोलतांना तिचा स्वर कंपित झाला, आणि जणू आतां आपल्याला एकदम रडूं येणार अशी भीति वाटल्यामुळें तिनं आपला खालचा ओठ दांतांनीं दाबला आणि दृष्टि झटकन् दुसरीकडे वळविली.

गांधींच्या चळवळींत सामील होण्याचा आपला विचार किती योग्य आहे, आणि आपल्या गैरहजिरीचा 'जयमाला डान्सर्स'च्या सफरीवर प्रतिकूल परिणाम होण्याचा मुळीच संभव कसा नाहीं, तें जयमालेला पटवून देण्यासाठीं कसं बोललं पाहिजे ते राजाभाऊनं मनाशीं थोडं ठरविलं होतं; पण तें ठरवितांना तिचे अश्रू किंवा तिचा रडवा स्वर त्यानं हिशोबांत घेतला नव्हता. त्यामुळें बोलतां बोलतां जयमाला जेव्हां रडायच्या बेतांत आलेली त्याला दिसली तेव्हां तो किंचित् चपापला, आणि क्षणभर स्तब्ध राहिला. पण लगेच तो म्हणाला,

"मी नाहीं तर सगळंच संपलं असं तुम्ही जें म्हणतां तें माझ्यावरच्या लोभामुळें. तुमच्या या लोभाबद्दल मी तुमचा सदैव ऋणी राहीन; पण क्षणभर माझ्यावरचा लोभ विसरून तुम्हीं या गोष्टीचा शांत विचार केला पाहिजे. विशेषत: माझ्या मनोवृत्तीचा, देशाच्या सध्यांच्या परिस्थितीचा अन् ती परिस्थिति पाहून उत्पन्न झालेल्या माझ्या मन:स्थितीचा विचार केला पाहिजे. माझ्याभोंवतीं जिकडे तिकडे होमकुंड पेटलेलं दिसत असतांना, आणखी बुद्धीनं आणि परिस्थितीनं माझ्यापेक्षां दुबळीं हजारों माणसं त्या होमकुंडांत उडी घेत असतांना चळवळीपासून दूर राहणं मला खरोखरच उत्तरोत्तर अशक्य होत चाललेलं आहे. अशा वेळीं केवळ तुमच्या अत्यंत लोभांतला मी एक माणूस म्हणूनच तुम्ही मला दूर होऊं देणार नाहीं? माझ्या देशसेवेच्या आड तुमचा लोभ तुम्ही येऊं द्याल? माझ्या अंत:करणांतली देशसेवेची तीव्र इच्छा तुम्हांला कळण्यासारखी नाहीं असं मी कसं बरं म्हणूं?"

जयमालेनं एकदम मान वर करून त्याच्या दृष्टीला दृष्टि लावली व म्हटलं,

"ती मला खचित कळते. पण ती मला कळायला हवी ही जशी तुमची अपेक्षा त्याचप्रमाणें आमचा सर्व भरिभार तुमच्यावर आहे हें तुम्हीं ओळखावं अन् आयत्या वेळीं आमच्यापासून दूर होण्याचा विचार तुम्ही करूं नये अशी आमची अपेक्षा असली तर ती चुकीची म्हणाल कां तुम्ही ? युरप-अमेरिकेला जावं आणखी आपल्या देशाच्या नृत्यकलेची कीर्ति वाढवावी, या आमच्या महत्त्वाकांक्षेला मूर्त स्वरूप कुणीं बरं दिलं ? तुम्हींच ना ? आम्हांला सर्व प्रकारें प्रोत्साहन कुणीं बरं दिलं ? आमच्या प्रयत्नांना योग्य दिशा कुणीं लावली ? नांवलौकिकाची पहिली पायरी चढतांना आमच्या कांहींशा भिऱ्या मनाला धीर आणि आधार कुणीं बरं दिला ? तुम्हींच ना ? परदेशांत जाण्याची आमची कल्पना केवळ बीजरूप होती. तिला आपल्या अमूल्य प्रोत्साहनानं अन् मदतीनं मोठ्या अंकुराचं स्वरूप कुणी बरं आणलं ? तुम्हींच ना ? आमच्या महत्त्वाकांक्षेशीं समरस होऊन तिच्या पूर्ततेची सुखस्वप्नं आम्हांला पडूं लागावीत असं कुणीं बरं केलं ? तुम्हींच ! सारा भार तुमच्यावर टाकायला आम्हांला आजपर्यंत शिकवलंत, अन् आतां आम्हांला सोडून देण्याचा विचार करताहांत ! एखाद्या मुलाला कुणीं सारखं कडेखांद्यावर खेळवलं, सदा बोटाला धरून वागवलं, धीर दिला, आशा बाळगायला शिकवलं, अन् मग मात्र एकाएकी एकटं सोडून दिलं तर त्याला कसं वाटेल ? अगदीं तसंच आम्हांला वाटतं आहे. यात अतिशयोक्तिचा एक शब्दसुद्धां नाहीं. तुम्ही आमच्याबरोबर कदाचित् येणार नाहीं हें ऐकतांच माझा सगळा धीर खचला. माझ्या पायांतली नृत्यकलेची हौस क्षणार्धात नष्ट झाल्यासारखं मला वाटलं, खरंच सांगतें, तुम्ही येणार नसलात तर आमचा पाय इथून निघणं शक्य नाहीं. इतके दिवस ज्या आमच्या योजनेचं तुम्हीं प्रेमानं संगोपन केलंत, साऱ्या देशाचं चित्त आकर्षून घेण्याइतकं मोठं स्वरूप तिला आणलंत, ती आपल्या हातानं नाहींशीं करून टाकल्याच जाहीर केलं तरच आम्हांला अशा असहाय स्थितींत टाकून जाण्याचा विचार तुम्हांला करतां येईल !......"

अशा प्रकारें जयमाला मग किती तरी वेळ बोलत राहिली. ती तेंच तें पुन:पुन्हां बोलत होती. बोलतांना मधून मधून ती विव्हळ होत होती, आपला रुदनमिश्र होऊं पाहणारा स्वर कसाबसा नीट ठेवीत होती, आणि राजाभाऊकडे अत्यंत आर्जवी, जवळ जवळ प्रार्थनेच्या नजरेनं पहात होती.

त्यामुळें तिच्या प्रतिपादनाला उत्तर म्हणून आपल्या स्वतःच्या मनःस्थितीचं चित्र तिच्यापुढें अधिक स्पष्टपणें मांडण्याऐवजीं तिच्या भावनांना आपण क्षुल्लक लेखीत नाहीं असं दाखविणंच राजाभाऊला भाग पडलं. आणि अखेर त्यानं तिला वचन दिलं, कीं 'जयमाला डान्सर्स' परदेशीं जायला बोटीनं निघण्याची जी तारीख ठरली होती, त्या तारखेपर्यंत गांधींची धरपकड झाली नाहीं आणि सत्याग्रहाच्या चळवळीला अधिक उग्र स्वरूप आलं नाहीं तर आपण परदेशच्या सफरीवर येऊं.

या त्याच्या वचनानं जयमालेचं बरंचसं समाधान झालं. याचं कारण इतकंच, कीं सत्याग्रहाची चळवळ दिवसेंदिवस अधिकाधिक उग्रच कशी होणार तें तिला माहित नव्हतं. तिच्या मनाला आशा वाटली, कीं सुदैवानं आपली बोट सुटण्याच्या तारखेपर्यंत गांधी पकडले जाणार नाहींत आणि राजाभाऊ आपल्याबरोबर येईल. ती एखादे वेळीं निजण्यापूर्वी परमेश्वराची प्रार्थना करीत असे. आजच्या प्रार्थनेंत ती म्हणाली, ' परमेश्वरा, कसंही कर आणि गांधींना पकडण्याची दुर्बुद्धि सरकारला होऊं देऊ नकोस.'

राजाभाऊ असली कांहीं प्रार्थना तर करीत नव्हताच, पण गांधींची धरपकड लांबेल आणि आपलं ' जयमाला डान्सर्स ' बरोबर जाणं घडेल अशी फारशी अपेक्षाही त्याला वाटत नव्हती. त्यानं जयमालेला जें वचन दिलें होतं तें अगदीं मनःपूर्वक दिलं होतं. पण त्याप्रमाणें वागण्याची वेळ आपल्यावर येईल असं त्याला फारसं वाटत नव्हतं. कारण, मिठाच्या सत्याग्रहाची चळवळ अधिकाधिक निकरावर आणण्याची खटपट गांधींनीं चालविली होती हें रोजच्या बातम्यावरून उघड होत होतं; आणि गांधींना अटक होण्याचा दिवस कांहीं फारसा दूर नाहीं असंच ज्याला त्याला वाटत होतं.

दांडीच्या समुद्रकिनाऱ्यावर ज्या दिवशीं गांधींनीं आणि त्यांच्या स्वयंसेवकांनीं मीठ गोळा केलं त्याच दिवशीं त्यांची धरपकड कशी झाली नाहीं हेंच मुळीं एक मोठं आश्चर्य होतं. सरकार गांधींना दांडीपर्यंत पोंचूं देणार नाही असा प्रथम लोकांचा हिशोब होता; पण लोकांचा तो हिशोब चुकला. इतकंच नव्हे, तर दांडीस पोंचून गांधींनीं मिठाचा कायदा प्रत्यक्ष मोडला तरी सरकारनं त्यांच्यावर हात टाकला नाहीं ! हें पाहून लोक चकित

आले. शत्रूचा अपेक्षित घाव पडला नाहीं, कीं साहजिकपणेंच अधिक घातुक प्रहारासाठीं शत्रू हात राखून ठेवीत आहे असं वाटतं. लोकांना तसंच वाटूं लागलं. स्वत: गांधी दांडीचा पहिला सत्याग्रही हल्ला करून स्तब्ध बसले नाहींत. सरकार अखेरपर्यंत स्तब्ध राहील हें शक्यच नव्हतं, आणि सरकारला जें काय करायचं असेल तें लवकर करायला लावण्याचा डाव खेळणं गांधींना भाग होतं; म्हणून त्यांनीं दांडीचा हल्ला आटपताच दुसऱ्या हल्ल्याचा बेत केला. धारासना येथील मिठागरावर चालून जाऊन त्याचा ताबा घेण्याचं त्यांनीं ठरविलं व आपला मोर्चा तिकडे वळविला. आपल्या नेहमींच्या पद्धती-प्रमाणें त्यांनीं व्हाइसरॉयना आपला बेत कळविण्यासाठीं जें एक लांबलचक पत्र पाठिवलं त्यांत त्यांनीं लिहिलं:—

" प्रिय मित्र,

परमेश्वरानें अनुमति दिली तर माझ्या अनुयायांसह धारासना येथें जाऊन तेथील मिठागराचा ताबा मागण्याचा माझा बेत आहे. धारासना हीं खाजगी इस्टेट आहे असें लोकांना सांगण्यांत आलें. परंतु ही निव्वळ बतावणी आहे. व्हाइसरॉयचा रहाता बंगला जितका सरकारी आहे तितकेंच धारासना मिठागरही सरकारी आहे. अधिकाऱ्यांची आगाऊ परवानगी घेऊन तेथून मिठाची चिमूटही नेतां येत नाहीं. आपल्याला हा हल्ला तीन प्रकारें थांबवितां येईल. ( १ ) मिठाचा कर काढून टाकून. ( २ ) मला व माझ्या तुकडीला अटक करून. पण तेंही जर लोकांनीं ताबडतोब दुसरी तुकडी तयार केली नाहीं तरच. लोक ताबडतोब तसें करणार अशी मला खात्री आहे. ( ३ ) केवळ गुंडगिरी करून. पण आमचीं डोकीं फुटल्यावर तेथें नवीन डोकीं ताबडतोब उभीं राहिलीं नाहींत तर. मला तसें वाटत नाहीं.

हें पाऊल टाकण्यापूर्वी मीं संशयग्रस्त होतों. सरकार सत्याग्रहाशीं सभ्यपणानें वागेल अशी मला आशा होती. कायद्याच्या नेहमींच्या पद्धतीनें सरकारनें विरोध चालू ठेवला असता व त्यांतच समाधान मानलें असतें तर माझें कांहीं म्हणणें नव्हतें. पण कांहीं प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या बाबतींत तेवढा कायदेशीरपणा दाखवून बाकीच्या लोकांना मात्र रानटी-

पणानें मारपीट करण्यांत आली आहे, व कित्येक वेळां लोकांवर व्यर्थ गोळीबार करण्यांत आला आहे......मी वर्णन केलेल्या या गोष्टी कदाचित् आपणांस माहीतही नसतील. आपला त्यावर विश्वासही बसणार नाहीं. परंतु त्यांच्या खरेपणाबद्दल मी ग्वाही देतों.

आपण सत्तेची वाघनखें उघड करून दाखवलींत, कीं त्या परिस्थितींत सत्याग्रहाचा कार्यक्रम जितका पूर्णपणें पार पाडतां येईल तितका पाडण्याची लोक पराकाष्ठा करतील......माझ्या मार्गांतील धोके मला माहीत आहेत. परंतु लोक माझ्या हेतूबद्दल गैरसमज करून घेणार नाहींत असें वाटते. मला जें खरें वाटतें तेंच मी बोलतो. वीस वर्षें हिंदुस्तानाबाहेर आणि गेलीं पंधरा वर्षें हिंदुस्थानांत मी जें सांगत आलों तेंच आतां पुन्हा सांगतो, कीं शुद्ध अनत्याचार हाच एक अत्याचाराला जिंकण्याचा मार्ग आहे. मी हें वारंवार सांगूनसुद्धां लोक अत्याचारी होतीलच. कोणाही एका व्यक्तीवर इतरांच्या कृत्याची जेवढी जबाबदारी असूं शकते तेवढीच मी पत्करतों. याहून जास्त जबाबदारी मी घेऊं शकत नाहीं. परंतु जबाबदारीचा प्रश्न सोडून दिला, तरी कोणत्याही कारणासाठीं मला कार्य थांबवितां येत नाहीं. कारण, अनत्याचार ही एक शक्ति आहे. जगांतील विभूतींनीं हें कबूल केलें आहे, आणि त्याचे मला व्यापक अनुभव आले आहेत. यासाठीं मला अनत्याचाराचें कार्य करीत राहिलेंच पाहिजे.

......सविनय कायदेभंगाचें अत्याचारांत पर्यवसान होईल असें आपण वाटलें तर म्हणा. इतिहास मात्र असा निर्णय देईल, कीं अनत्याचाराचें ज्ञान नसल्यानें व तें ऐकण्याचें नाकारल्यानें सरकारनें लोकांस अत्याचारास प्रवृत्त केलें. परंतु, सरकारनें कितीही चिथावणी दिली तरी तिच्याशीं लढण्याइतकें सामर्थ्य व शहाणपण परमेश्वर हिंदी लोकांना देईल व ते अत्याचाराच्या मोहाला बळी पडणार नाहींत अशी मी आशा करीन.

जर मिठाचा कर आणि खाजगी रीतीनें मीठ तयार करण्यावरचे

आपल्याला कोणत्या क्षणीं अटक होईल त्याचा नेम नाहीं हें गांधी जाणून होते. किंबहुना अटक करणाऱ्या सरकारी दूतांची ते प्रतिक्षणीं वाटच पहात असावेत. त्यामुळें आपल्या अटकेनंतर प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांनीं पुढील संदेश लिहून ठेवला होता:—

"हा शुभारंभ शेवटास गेला तर पूर्ण स्वातंत्र्यही खात्रीनें मिळेल, आणि त्यामुळें हिंदुस्तानानें जगापुढें आपल्या सामर्थ्याचा आदर्श ठेविला असें होईल. स्वार्थत्यागावांचून मिळविलेलें स्वराज्य कधीं टिकूं शकत नाहीं. म्हणून हिंदी लोकांना अमर्याद स्वार्थत्याग करणें भाग आहे. खऱ्या स्वार्थत्यागांत एकांगी दुःखें भोगावीं लागतात. दुसऱ्याला न मारतां स्वतः मरण पत्करावें लागतें. हिंदुस्तानाला हें ध्येय गांठतां येवो ! या क्षणीं हिंदुस्तानचा स्वाभिमान आणि सर्वस्व एका मूठभर मिठांत सांठविलेलें आहे. मनगट मोडलें तरी हरकत नाहीं, परंतु मूठ उघडी होतां कामा नये.

"परमेश्वर हाच युद्धाचा नेता आहे, मी नाहीं. आपल्यामध्यें आत्म-विश्वास असेल तर परमेश्वर खचित मार्ग दाखवील. शिवाय, आपला मार्ग एक प्रकारें ठरलेला आहे. सर्व शहरांनीं आणि खेड्यांनीं मीठ उचलण्यासाठीं तयार करण्यासाठीं पुढें आलें पाहिजे. आबालवृद्ध सर्व माणसांनीं टकळी चालवावी. दररोज पेळूंचे गठ्ठेच्या गठ्ठे विणले गेले पाहिजेत. परदेशी कापडाच्या होळ्या पेटल्या पाहिजेत. हिंदूंनीं कोणालाही अस्पृश्य मानूं नये. हिंदु, मुसलमान, पारशी व ख्रिश्चन या सर्वांनीं एकमेकांना प्रेमालिंगनें दिलीं पाहिजेत. अल्प-संख्याक जातींना पुरेसें झाल्यावर जें उरेल त्यांत बहुसंख्याक जातींनीं संतुष्ट रहावें. विद्यार्थ्यांनीं सरकारी शाळा सोडाव्यात. सरकारी नोकरांनीं राजीनामे द्यावेत. एकदां सुरू झालेला हा सविनय कायदेभंग कोणत्याही कारणासाठीं थांबतां कामा नये. जोंपर्यंत एक तरी सविनय कायदेभंग शिल्लक राहिला आहे तोंपर्यंत चळवळ चालू राहिली पाहिजे. वेळ अशी आली आहे, कीं आज प्रत्येक सत्याग्रही तुरुंगांत तरी असावा किंवा कायदेभंगांत तरी मग्न असावा !"

'प्रत्येक सत्याग्रही तुरुंगांत तरी असावा किंवा कायदेभंगांत तरी मग्न असावा !'

तें वाक्य वाचतांच राजाभाऊच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले.

वाचणाऱ्याच्या मनोभूमींत योग्य तो स्फुलिंग तयार असला म्हणजे त्या स्फुल्लिंगाची एकदम ज्वाला व्हायला कागदावरचा एक शब्दसुद्धां पुरेसा होतो !

गांधींना अटक झाली तर सत्याग्रहाच्या चळवळींत उडी टाकायचं राजाभाऊनं ठरवलेलंच होतं. पण 'जयमाला डान्सर्स'च्या दौऱ्याबद्दलची स्वतः पत्करलेली जबाबदारी पार झुगारून देणं युक्त होईल कीं नाहीं याविषयीं त्याच्या मनांत कांहीं शंकाकुशंका उरल्या असल्याच तर गांधींच्या संदेशांतल्या त्या अखेरच्या चार शब्दांनीं त्या पार नष्ट केल्या. त्याच्या मनाचा एका क्षणांत पूर्ण निश्चय झाला. बंदिशाळा किंवा सत्याग्रहाचं रणक्षेत्र या दोनच जागा त्याच्या निवासाला आतां योग्य होत्या. त्याव्यतिरिक्त इतर कोणत्याही स्थलीं त्याची श्वसनक्रिया होणं शक्य नव्हतं !

तो ताबडतोब बंगल्यावर परत गेला.

लाला नारायणप्रसाद परगांवीं गेले होते. राजाभाऊनं त्यांना एक पत्र लिहून ठेवलं. जयमाला व नीलांबरी अजून आपआपल्या निजायच्या खोलींत होत्या. लालाजींना लिहिलेला मजकूरच थोडक्यांत लिहून तें पत्र त्यानं जय-मालेसाठीं ठेवलं, आणि एका पाकिटावर नीलांबरीचं नांव लिहून त्यांत घालून बंद केलेल्या चिठीवर त्यानं पुढील मजकूर लिहिलाः—

"नीला,

प्रेमाचं सामर्थ्य सिद्ध करायसाठीं वाटेल तें दिव्य करायची तुझी तयारी आहे असं तूं त्या दिवशीं माझ्याजवळ बोलली होतीस. ते शब्द खरे शब्द करायची वेळ आली आहे. माझी भेट घ्यायची तुझी इच्छा असेल तर कॉंग्रेस हाऊसवर येऊन माझी चवकशी कर.

राजा"

त्या बंगल्यांतील मंडळींनीं प्रथमपासून आजपर्यंत त्याच्यावर निरतिशय प्रेम केलं होतं, त्यांची भेटही न घेतां तो त्यांना सोडून चालला होता. पण

त्याबद्दल त्याला यत्किंचित्‌ही विषाद वाटला नाहीं. उलट पूर्व क्षितिजावर हळूं-हळूं प्रगट होऊं लागलेल्या सूर्यतेजाकडे दृष्टि टाकीत तो जेव्हां बंगल्याबाहेर पडून कॉंग्रेस हाऊसच्या रस्त्याला लागला, तेव्हां त्याच्या मनांत कसल्या तरी आनंदाची आणि उल्हासाची मोठी उर्मी उसळली होती देशसेवेच्या मार्गाचा पूर्वी अपुरा राहिलेला प्रवास पुरा करायला तो निघाला होता! असा प्रवासी हर्षभरानं पावलं टाकीतच आपल्या रस्त्यानं जातो!



[२५]

गांधींना अटक झालेली कळतांच केवळ अखिल हिंदुस्ताननंच नव्हे, तर सबंध जगानं स्वयंस्फूर्तीनं गांधींच्या सत्याग्रहाविषयीं सहानुभूति आणि सरकारी धोरणाबद्दल निषेध व्यक्त केला. पनामा कालव्यांत काम करणाऱ्या हिंदी लोकांनीं चोवीस तास हरताळ पाळला. सुमात्राच्या पूर्व किनाऱ्यावरच्या हिंदी लोकांनीं तेंच केलं आणि व्हाइसरॉयना व काँग्रेसला तारा करून आपला निषेध आणि सहानुभूति व्यक्त केली. आफ्रिकेंत नैरोबी येथील हिंदी लोकांनीं हरताळ जाहीर केला. निरनिराळ्या धर्मपंथांच्या १०२ अमेरिकन धर्मगुरूंनीं इंग्लंडच्या मुख्य प्रधानांना आपल्या सह्यांची तार पाठवून गांधींशीं सामोपचारानं तडजोड करावी असं कळविलं. गांधी व त्यांचं कार्य यांच्या वर्णनांनीं अमेरिकन व फ्रेंच वर्तमानपत्रांचीं पानं भरून गेलीं. गांधींच्या अटकेमुळें सारं जग या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आंदोलित होत असतांना

हिंदुस्तानांत हरताळ, मिरवणुकी आणि सभा यांचा कहर उसळावा हें सहाजिकच होतं. सारीं मोठमोठीं शहर चळवळीच्या प्रचंड ज्वालांनीं एकदम प्रदीप्त झाल्यासारखीं दिसलीं. सरकारी दडपशाहीचा हुताशनीही एकदम आपल्या सहस्त्र जिव्हा प्रगट करूं लागला. सोलापूरला लोकांच्या जमावावर पोलिसांनीं गोळीबार केला व त्यांत पंचवीस माणसं ठार आणि शंभर जखमी झाली. कलकत्त्यासही गोळीबार करण्यांत आला. पंचनानूताल येथें सरकारनं १४४ वं कलम जाहीर करून पांचापेक्षां जास्त इसमांना एकत्र जमण्याची बंदी केली. मुंबईस तर सत्याग्रहाच्या चळवळीस निकराचं उग्र स्वरूप येणार अशीं स्पष्ट चिन्हं दिसूं लागलीं. सरकारनं गांधींवर हात टाकला होता. स्वराज्याच्या घोषणेचा हा उपमर्द सहन करायला लोक तयार नव्हते. मुंबईच्या कापड व्यापाऱ्यांनीं सहा दिवस हरताळ पाळायचं ठरविलं. जी. आय. पी. आणि बी. बी. सी आय. रेल्वेचे कामगार हरताळांत सामील झाले पन्नास हजारांवर गिरणी कामगार निषेधार्थ बाहेर पडले. ता. ५ मे रोजीं लोकांची प्रचंड मिरवणूक निघाली, आणि संध्याकाळीं भरलेल्या जगडव्याळ जाहीर सभेंत एक व्यासपीठ अपुरं पडून अनेक व्यासपीठं उभारावीं लागलीं !

यांपैकीं एका व्यासपीठावरून राजाभाऊ भाषण करीत होता.

त्याच्यासमोर अफाट जनसम्मर्द पसरला होता, आणि एकजात सर्वांच्या अंगावरच्या शुभ्र खादीमुळें तो नेहमींपेक्षांही अधिक पूर्ण अर्थानं एखाद्या प्रचंड सागरासारखा वाटत होता. आपल्या वक्तृत्वपूर्ण शब्दांनीं त्या सागरावर उत्साहाच्या आणि आवेशाच्या लाटा उसळवितांना राजाभाऊला मनस्वी उन्माद चढत गेला, आणि जणूं त्या सभेंत जमलेल्या, लोकांनाच नव्हे तर एकंदर पस्तीस कोटी बांधवांना उद्देशून आपण बोलत आहोंत अशा कांहींशा चमत्कारिक पण स्फूर्तिवर्धक भावनेनं तो सारखा बोलत राहिला. गांधींच्या एकंदर राजकीय तत्वज्ञानावरची त्याची स्वतःची निष्ठा गेल्या कित्येक वर्षांत अढळ राहिलेली नसतांही, आणि जीर्ण विवाद्य धर्मतत्त्वाच्या भूमिकेवरून स्वातंत्र्याचा लढा लढविण्याचं गांधींचं धोरण त्याला स्वतःला संयुक्तिक वाटत नसताही त्यानं स्वतः चालू संग्रामांत उडी घेतली होती. या आपल्या मनो-

वृत्तीचं विवरण करण्यासाठीं तो भाषण करायला उभा राहिला नव्हता हें जरी खरं, तरी तिच्या जाणिवेचा अप्रत्यक्ष परिणाम त्याच्या भाषणावर व्हावा हें सहाजिक होतं; आणि त्यामुळें देशसेवेची इच्छा धरणाऱ्या साऱ्या हिंदपुत्रांनीं सारे मतभेद विसरून चळवळींत सामील होण्याचा क्षण कसा प्राप्त झाला आहे हेंच तो पुन्हःपुन्हां प्रतिपादित राहिला. अखेर समारोप करण्याच्या हेतूनं तो म्हणाला,

"आणि बंधूनो, हें मात्र लक्षांत ठेवा, कीं ज्याची कमालीचा स्वार्थ-त्याग करण्याची, प्रसंगीं मरणाला तोंड देण्याची प्रामाणिक तयारी असेल त्यानंच या युद्धांत भाग घ्यावा. ज्याची तशी तयारी नसेल त्याच्यासाठीं हा संग्राम नाहीं. कारण, एका दृष्टीनं १९२० सालच्या असहकारितेच्या चळवळी-पेक्षां दहा वर्षांनंतर आज सुरू झालेल्या या चळवळीचं व्रत अधिक खडतर आहे. खऱ्या वीरांना आजच्या या चळवळीचं अधिक स्वागत करावंसं वाटेल. तें अशासाठा, कीं दहा वर्षांपूर्वीच्या त्या चळवळींत त्यागाला जागा होती हें खरं, पण रणांगणावर शौर्य गाजवीत मरण्याची संधि नव्हती आणि जरूरी नव्हती. पण आज ती आहे. अर्थातच देशभक्तीचं ढोंग करणाऱ्या आप-मतलबी लोकांना आजच्या युद्धांत जागा नाहीं. १९२० सालच्या चळवळीच्या वेळीं स्वार्थाच्या अंतिम हेतूनं वकिली सोडणं शक्य होतं. नोकरीवर लाथ मारणं शक्य होतं, परदेशी मालाचा व्यापार बंद करणें शक्य होतं, डोक्यावर गांधी टोपी चढविणं शक्य होतं! ज्यानीं तसं केलं असें हंगामी देशभक्त मीं पाहिले आहेत. पण आज अशा ढोंगाला यत्किंचित वाव नाहीं. अन् म्हणूनच आजच्या या सत्याग्रहाला आपल्या स्वातंत्र्याच्या तृष्णेची खरी निकाली कसोटी म्हणायला मी तयार आहे. आज केवळ गांधी टोपी डोक्यावर चढ-विण्याचा प्रश्न नाहीं, तर आपल्या मस्तकावर लाठीचा प्रहार खचित होणार आणि कदाचित छातीवर बंदुकीची गोळी—"

यापुढें कोणते शब्द राजाभाऊ बोलणार होता कुणास ठाऊक? त्याला ते बोलतां आले नाहींत,

कारण, सभेच्या एका टोंकाला लोकांत एकदम गडबड उसळली, 'अरे, पोरगा मेला!' 'अरे त्या शिपायाचे हात धरा!' अशा अनेक आरोळ्यांचा

गलबला झाला, आणि सारे लोक जिकडून आरडाओरडा ऐकूं आला तिकडे धांवले !

राजाभाऊनं आपलं भाषण थांबविलं, आणि हा काय प्रकार असावा याविषयीं आश्चर्य करीत गडबडीच्या जागेकडे पहात तो स्वस्थ उभा राहिला.

दोन चार इसम गर्दीतून वाट काढून व्यासपीठावर चढून त्याच्याजवळ आले व तुटक तुटक वाक्यांत सांगू लागले:—

" अगदीं लहान मुलगा हो ! पंधरा सोळा वर्षांचा !........."

" या पोलिसांना कांहीं दया माया आहे का नाहीं ?......"

" वर्तमानपत्रं विकणारा मुलगा......"

" बेदम मारलं कीं !......"

" अन् अपराध काय, तर वर्तमानपत्राच्या अंकाराबरोबर सायक्लो-स्टाइलवर निघणारं कॉंग्रेस बुलेटिन तो वाटीत होता......"

" पण मुलगा शूर हं ! पोलिसांनीं इतकी हिसकाहिसकी केली अन् मारलं पण पठ्ठयानं हातांतले बुलेटिनचे अंक कांहीं सोडले नाहींत !......

त्या इसमाचे ते तुटक उद्गार ऐकून राजाभाऊला कांहीं फारसा बोध झाला नाहीं. मात्र जो थोडा झाला त्यावरून गडबडीच्या जागीं आपण जावं आणि जो मुलगा पोलिसांच्या माराला बळी पडला असेल त्याला प्रत्यक्ष पहावं असं त्याच्या मनांत आलं. तो व्यासपीठावरून उतरूं लागला. पण तितक्यांत कांहीं लोकांनीं त्या मुलालाच त्याच्याजवळ आणलं आणि राजाभाऊला जी हकीगत आधीच तुटकपणें कळली होती तीच त्यांनीं सुसंगतपणें सांगितली.

पण राजाभाऊचं लक्ष त्या हकीगतीकडे कुठें होतं ?

तो त्या मुलाकडे अगदीं टक लावून पहात होता !

क्षणभरच तसं पाहिल्याबरोबर त्याला त्या मुलाची ओळख पटून " कोण आनंद ? आनंद ? " असं उद्गारून त्यानं झटादिशीं त्या मुलाला ओढून घेऊन आपल्या पोटाशीं घट्ट धरलं......

शुश्रुषापथकाच्या मोटार गाडींत आनंदाला घालून त्याच्याजवळ बसतांच राजाभाऊनं त्याला विचारलं,

"आनंद, मला ओळखलंस ना ?"

"......पण तुम्ही इतकीं वर्षं कुठें होतां ? मला कितीदां तरी तुमची आठवण होई. मला वाटे, तुम्ही विसरलांत आम्हांला"

'छे छे, वेड्या, तुला अन् तुझ्या आईला मी विसरणं शक्य आहे कां ?' असं म्हणण्याच्या अविर्भावानं राजाभाऊनं त्याला थोपटलं, आणि लगेच विचारलं,

"उमा कुठें आहे ?"

"घरीं. आतां तुम्ही मला घरींच पोंचवतां आहांत ना ?"

"नाहीं. आधीं तुला कॉंग्रेस हाऊसमध्यें नेऊन तुझी जखम बांधली पाहिजे. त्यानंतर—"

आनंद म्हणाला,

"तुम्हाला पाहून तिला किती तरी आनंद होईल !"

त्याचे ते साधे शब्द ऐकून आपला कंठ एकदम दाटून यावा याचं राजाभाऊला आश्चर्य वाटलं.

गेल्या कित्येक वर्षांच्या अवधींत त्यानं उमाला पाहिलेलं नव्हतं. तिचा वियोग झाल्यानंतर प्रथम कित्येक दिवस दिवसांकांठीं पांच-पंचविस वेळां तिच्या आठवणी त्याला याव्या असं जरी झालं तरी अलीकडे तिचं स्मरण त्याला अहर्निश व्हावं अशी स्थिति राहिली नव्हती. एखादे वेळीं तिची आठवण होतांच तिच्या योगानं त्याचं चित्त शोकाकुल होई येवढंच ! मनुष्याच्या भावनांवर कालाचा जो परिणाम व्हायचा त्याला अनुसरूनच हें होतं, अशीच आणखी कांहीं वर्षं लोटलीं, कीं उमाच्या आठवणीने आपल्या अंतःकरणाची कालकालवही होईनाशी होईल आणि एखाद्या द्रष्ट्याकडून पूर्वजन्माच्या हकीगती ऐकतांना ज्या निर्विकारतेनं माणूस त्या ऐकतो त्याच निर्विकारतेनं आपण मनाशीं उमाच्या व आपल्या प्रेमाच्या आठवणी करूं असं राजाभाऊला वाटत

असे. प्रीति म्हणजे एक दिव्यभावना आहे असा त्याला अनुभव आला होता; पण साऱ्याच सृष्ट वस्तू ज्याप्रमाणें उत्पन्न होतात व लय पावतात, त्याप्रमाणेंच माणसाच्या मनांतल्या भावनांचीही गोष्ट आहे हेंही त्याला अनुभवानं समजलं होतं.

पण आनंदजवळ उमाचं नांव उच्चारतांच त्याच्या मनांत एकदम आलं, ' नाहीं नाहीं, इतर सृष्ट वस्तूंचा नियम प्रीतीला लागूं नाहीं. ती दिव्य आहे ! तिला विस्मरण नाहीं ! कालांतरानं ती अंतःकरणांत खोल जाऊन बसते, संसारांतल्या सामान्य व्यवहारापासून ती दूर होते, जड स्वरूप टाकून ती अधिकाधिक सूक्ष्म आणि चैतन्यमय होते इतकंच !......"

कारण, ' तुम्हांला पाहून तिला किती तरी आनंद होईल ! ' हे आनंदच्या तोंडचे उमाविषयींचे उद्गार ऐकून त्याच्या अंतःकरणांतली उमाविषयींची सारी प्रीति एकदम उचंबळून आली. कित्येक वर्षांपूर्वी रात्रींच्या शांत प्रहरीं ज्या एका क्षणीं त्यानं उमाच्या नेत्राचं चुंबन घेतलं होतं त्या क्षणापासून आतांपर्यंतचा सगळा दीर्घ काल एकदम कुठें तरी गडप झाल्यासारखं त्याला वाटलं, आणि ज्या दिवशीं तुरुंगांतून सुटून तो परत आला आणि आतां उमा भेटेल अशा उत्कंठेनं आपल्या घरांत शिरला त्या दिवशींच जर ती त्याला भेटली असती तर तिला पाहतांच त्याचा कंठ जसा दाटून आला असता तसाच तो आतांही आला !

त्यानं झटकन् आनंदाचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले आणि विचारलं,

" आनंद, उमा खुशाल आहे ना ? "

आनंदानं मान हलविली, पण दृष्टि झट्कन दुसरीकडे वळविली.

राजाभाऊनं त्याच्या हनुवटीला स्पर्श करून त्याला आपल्याकडे पहायला लावलं तो आनंदच्या डोळ्यांत अश्रु आलेले त्याला दिसले !

राजाभाऊनं विचारलं,

" आनंद, हें काय ? तूं रडतो आहेस. खरं सांग उमा खुशाल आहे ना ? "

" सांगतों. "

असं आनंद म्हणाला, पण तसं म्हणून तो स्तब्धच राहिला. त्याचे डोळे अश्रूंनीं आणखी भरून आले.

राजाभाऊनं जेव्हां त्याला पोटाशीं धरलं, आणि कांहीं वेळ तसाच जाऊं दिला तेव्हां त्याला बरं वाटलं, आणि मग त्यानं आपली आणि आपल्या आईची सगळीच हकीगत थोडक्यांत सांगितली.

निवळ दुःखाची लांबलचक कहाणीच होती ती !

महेश्वराकडे परत गेल्यापासून उमाला क्षणभरही सुख मिळालं नव्हतं. तिला व आनंदला घेऊन तो पुण्याहून निघाला तो एकदम कलकत्त्यास गेला होता. प्रवासांत त्यानं उमाला गोड गोड थापा दिल्या होत्या, कीं आपल्याला कलकत्त्यास मोठी नोकरी मिळाली आहे, आपल्याला आतां पैशाची फिकीर नाहीं, आपण बायकोला अन् मुलाला सुख द्यायचं ठरविलेलं आहे. पण हें त्याचं नाटक प्रवास संपपर्यंतच टिकलं होतं. त्याच्या हातीं बरेच पैसे खेळत होते हें खरं, पण कसल्या तरी भानगडी करून त्यानं ते मिळविले होते. त्याला नोकरी-बिकरी कांहीं नव्हती. आणि त्यानं कलकत्त्यास बिऱ्हाड केलं होतं हें जरी खरं तरी तें उमासाठीं नव्हतं. एका बंगाली बाजारबसवीची स्थापना त्यानं त्या बिऱ्हाडांत आधीच केली होती. त्याला सत्तेची मोलकरीण हवी होती आणि म्हणून उमाचं रक्षण करायला राजाभाऊ नाहीं हें पहातांच तिला तो घेऊन आला होता. पैसे मिळवायसाठीं तो कोणते धंदे करी तें उमाला कधींच कळलं नाहीं. पण ते भयंकर स्वरूपाचे असले पाहिजेत. कारण, एक दीड वर्षांत कलकत्ता शहर सोडून त्यानं आपलं बिऱ्हाड बनारसला नेलं होतं. तिथेंही तो दीड दोन वर्षंच टिकला होता, आणि मग ज्याचा सारखा पाठलाग होत आहे अशा माणसा-प्रमाणें तो गांवोगावीं हिंडूं लागला होता. चार चार सहा सहा महिने तो नाहींसा होई, आणि मग केव्हा तरी एकाएकी उमापुढें प्रगट होई. अशा वेळीं कित्येक दिवस तिची व आनंदाची उपासमार होई. एकमेकाच्या गळ्यांत गळा घालून रडूनच मायलेक आपलं पोट भरीत. महेश्वराचं मद्यपान, शिवीगाळ, मारहाण चालूच असे. त्याची बंगाली बाई अखेर कंटाळून निघून गेली होती. जातांना महेश्वरानं आपल्या अंगावरचे दागिने लपवून ठेवले आहेत अशी तोहमत

त्याच्यावर आणायलाही तिनं कमी केलं नव्हतं, पण त्यांतून तो कसाबसा सुटला होता. मग उमाला व आनंदला घेऊन तो मुंबईस येऊन दाखल झाला होता पण मुंबईस आल्यावर थोड्याच दिवसानंतर मला दक्षिण आफ्रिकेंत चांगली नोकरी आली आहे, मी जाऊन रुजू होतो अन् माझं बस्तान नीट बसलं कीं तुला आणि आनंदला न्यायला परत येतों असं उमाला सांगून एके दिवशीं तो नाहींसा झाला होता. त्यानंतर आज दोन वर्षांत त्याचा कांहीं एक पत्ता नव्हता. आतांशा उमा आजारी होऊन अंथरुणाला खिळली होती आनंद जें मिळेल तें काम करून रोज आठ बारा आणे मिळवून स्वतः जगत होता आणि आईला कशीबशी जगवीत होता !......



## [२६]

राजाभाऊनं आपल्याबरोबर घरीं येण्याऐवजीं 'तूं पुढें जा अन् उमाला सांग. मी जरा वेळानं येतों.' असं म्हणून आपल्याला एकट्यालाच कां पाठवून द्यावं याचं आनंदला जरासं आश्चर्य वाटलं. कॅांग्रेस हाउसवर पोंचतांच तिथलं एकंदर गडबडीचं आणि धांदलीचं वातावरण पाहून आणि चळवळीचीं सूत्रं ज्यांच्या हातांत होतीं त्या पुढाऱ्यांनीं राजाभाऊभोंवतीं गराडा घालून त्याला मसलत-खान्याच्या खोलीकडे नेलेला पाहून त्याला कामापुढें क्षणाचीहि फुरसद नव्हती हें आनंदच्या लक्षांत आलं होतं. पण कित्येक वर्षांच्या अवधीनंतर आपल्या आईची बातमी राजाभाऊला कळल्यानंतर तिची भेट घेण्यासाठीं त्यानं वास्तविक किती उत्सुक असायला पाहिजे त्याची आनंदला कल्पना होती. असहकारितेच्या चळवळींत राजाभाऊला शिक्षा झाली आणि तो अखेरचा त्याच्या दृष्टीस पडला तेव्हां आनंद सात आठ वर्षांचाच होता. राजाभाऊच्या अन् उमाच्या

परस्पर प्रेमांतल्या गूढ आणि सूक्ष्म अर्थांची जाणीव त्याला असणं शक्य नव्हतं; पण दोन व्यक्तींमध्यें बिलक्षण जिव्हाळा उत्पन्न झाला असल्यास तो कळण्याचं सामर्थ्य लहान मुलांच्या अंगीं असतं—किंबहुना या बाबतींत पुष्कळदां मोठ्या माणसांना ज्या गोष्टी दिसत नाहींत, त्या लहान मुलांच्या मुग्ध दृष्टीला अधिक चटकन् दिसतात. आपल्या आईला व राजाभाऊला एकमेक प्राणाहूनही प्रिय वाटतात हें सात आठ वर्षांच्या आनंदला सहज ओळखतां आलं होतं; आणि पुण्याहून स्थलांतर केल्यानंतरच्या सात वर्षांच्या अवधींत त्याची आई जरी त्याच्याजवळ राजाभाऊबद्दल क्वचित् प्रसंगींच बोलली होती. तरी त्या त्या वेळीं बोलतांना व्यक्त झालेल्या भावनांपेक्षांही तिच्या मनांतल्या मनांत अव्यक्त राहिलेल्या भावनांकडेच आनंदनं अधिक लक्ष दिलं होतं, व त्याबद्दलचे तर्क केल्यावांचून त्याच्या मनाला राहवलं नव्हतं. या सर्व कारणामुळें राजाभाऊ अत्यंत उत्सुकतेनं आपल्याबरोबर आपल्या घरीं येईल अशी आनंदची अपेक्षा होती. तसं घडलं नाहीं, अन् राजाभाऊ मागें राहिला तेव्हां त्याला साहजिकपणेंच आश्चर्य वाटलं.

मात्र हें त्याचं आश्चर्य फार वेळ टिकलं नाहीं. तो आतां कांहीं अगदींच लहान नव्हता. राजाभाऊला कामाच्या गर्दीमुळें त्याच्याबरोबर येतां आलं नाहीं हें थोडसं खरं होतं; पण काम नसतं तरी तो त्याच्याबरोबर आला नसता हें आनंदच्या लक्षांत आलं. आपल्याला पुढें धाडण्यांत राजाभाऊचा कोणता दुहेरी हेतु असावा त्याचा त्याला तर्क करतां आला. एक तर अनेक वर्षांच्या वियोगानंतर राजाभाऊ स्वतः आपल्या आईपुढें एकदम येऊन उभा राहिला तर अनेक संमिश्र भावनांनीं तिच्या अंतःकरणाची जी खळबळ साहजिकपणेंच उडेल ती सहन करण्यासारख्या स्थितींत त्याची आई नव्हती; व म्हणून राजाभाऊ प्रत्यक्ष भेटण्यापूर्वी त्याच्या भेटीची सूचना तिला मिळावी हें इष्ट होतं. आणि शिवाय, दीर्घ वियोगानंतर त्या दोघांची आकस्मिकपणें प्रथमच भेट होतांना तिसरं कुणीही तिथें नसावं हेंच चांगलं होतं...

असे विचार करीतच आनंद घरीं गेल्यामुळें राजाभाऊच्या व आपल्या अकल्पित भेटीची हकीगत आईला सांगतांना तिच्या मनाला कोणत्याही तऱ्हेचा धक्का एकदम बसणार नाहीं अशी त्यानें खबरदारी घेतली, आणि

आपण मुद्दाम बाहेर जात आहोंत अशी यत्किंचितही शंका तिला येऊं न देतां तो कांहीं तरी सबब सांगून घरांतून नाहींसा झाला.

पण कुणी कितीही खबरदारी घेतली तरी राजाभाऊ आतां लवकरच भेटणार हें अकल्पितपणें समजल्यावर उमाच्या हृदयाला धक्का बसूं नये, तिच्या अंतःकरणांत भावनांचा कल्लोळ उठूं नये हें शक्य होतं काय ?

राजाभाऊची व आपली भेट पुन्हां घडूं न देण्याचा निश्चय करून ती आपल्या पतीबरोबर मुक्काम्यानं निघून गेली तेव्हांपासून आतांपर्यंतच्या कालांत जें आपण केलं तेंच बरोबर होतं असं तिला सदा वाटलं होतं. राजाभाऊ तुरुंगांतून सुटेपर्यंत ती त्याची वाट पहात राहिली असती आणि तिची त्याची पुन्हां गांठ पडली असती तर त्या पुनर्मीलनांतून अनिष्ट गोष्टीच निष्पन्न झाल्या असत्या, आणि त्या दुष्परिणामांची झळ तिच्यापेक्षां राजाभाऊलाच अधिक लागली असती ही तिची समजूत मध्यंतरींच्या दीर्घकालांतही कायम राहिली होती. इतकंच नव्हे तर तिनं आपल्या मनांतल्या प्रीतीचं स्वरूप अखेरपर्यंत विशुद्ध ठेविलं, अन् प्रीतीचं पावित्र्य-लांछित होण्याचा संभव दिसतांच सहवासा-ऐवजीं वियोग पत्करला याबद्दलचं एक विचित्र स्वरूपाचं कांहीं समाधान तिला नेहमीं वाटलं होतं. प्रेमाचा अमर्यादपणा आणि शारीरिक उच्छृंखलपणा या दोहोंत अंतर फार थोडं आहे. संध्याकाळची अखेरची धूसर प्रकाशछटा आणि रात्रीं उदय पावणारी पहिली तारका यांतलंसुद्धां अंतर इतकं सूक्ष्म नसेल. हें कठिण अंतर जें स्त्रीपुरुष ठेवतात त्यांना निसर्गावर नैतिक विजय मिळविल्याचं समाधान मानण्याचा हक्क खचित असतो. उमाला हा हक्क होता; आणि राजा-भाऊची व आपली आतां पुन्हां कधींही भेट होणार नाहीं ही कल्पना तिला दुःखापेक्षां सुखाचीच वाटे.

मात्र महेश्वरापासून सोसावा लागणारा छळ तिला जेव्हां अगदींच असह्य होई तेव्हां राजाभाऊची आठवण अत्यंत तीव्रतेनं होऊन त्याच्यापासून कायमचं दूर होण्यांत आपण योग्य तेंच केलं कीं चूक केली हें तिला कळेनासं होई. आपण आपली प्रीति शुद्ध राखली खरी, पण ज्या अनन्वित छळाचा आपण स्वीकार केला त्याचा मोबदला देण्याइतकी ती शुद्धता मोलाची आहे काय असा प्रश्न मनांत उभा राहिला, कीं त्याचं होय अगर नाहीं असं उत्तर

ठरविणं तिला अतिशय कठिण जात असे. राजाभाऊ तुरुंगांतून सुटल्यावर त्याच्या व तिच्या प्रीतीचा वासनात्मक उद्रेक झाला असता, तिच्या हातून पतिनिष्ठेच्या व्रताचा भंग झाला असता, अनैतिक आचरणाचा डाग त्याला लागला असता आणि लौकिक दुष्कीर्ति दोघांनाहि सोसावी लागली असती. पण त्याबरोबरच दुष्कीर्ति सोसतां सोसतां कां होईना पण तो व ती सुखी झाली असती. लौकिक आचारनियमांविरुद्ध वागून जीं माणसं सुखं मिळवितात त्यांचं सुख इतरांना कळत नाहीं. समाजाला वाटतं, ज्या अर्थी आपण त्या माणसांचा धिक्कार केला त्या अर्थी त्याच्या वांट्याला दुःखावांचून काय येणार ? पण त्या माणसांचं सुख समाजाला जरी कळलं नाहीं तरी त्यांचं त्यांना मिळतच असतं. इतकंच नव्हे, तर समाजाशीं झुंज करून आपण सुख मिळविलं या कल्पनेची त्यांच्या सुखांत भर पडत असते. तेव्हां राजाभाऊ परत आल्यावर ती त्याच्याजवळ राहिली असती तरी तीं दोघं सुखाला आंचवलीं असती असं नव्हे. उलट आज मात्र ती स्वतः तर सुखाला सर्वस्वी मुकली होतीच, पण राजाभाऊ सुखात असेल असं तरी तिला कुठें खात्रीनं म्हणतां येत होतं ? ती जखमी होऊन शय्येवर पडली असतांना त्या रात्रींच्या त्या शांत प्रहरीं त्याच्या प्रीतीची जी अनिवारता चुंबनरूपानं तिच्या नेत्रावर उमटली होती ती लक्षांत घेतां तिच्या वियोगानं तो दुःखीच झाला असला पाहिजे यांत संशय नव्हता. तिनं राजाभाऊला शुद्ध प्रीतीच्या उच्च स्थाना-वरून ढळूं दिलं नव्हतं. पण कदाचित तिनं त्याला जन्मभर दुःखांत लोटलं होतं !

अशा विचारांनीं उमा भांबावून जात असे. आणि या कष्टप्रद संभ्रमाचा कधीं कधीं असा परिणाम होई, कीं तिचं मन एक विचित्र निश्चय करूं लागे. ती मनाशीं ठरवी कीं आतां जर यदाकदाचित राजाभाऊ केव्हां भेटला तर जें करायला आपण आजपर्यंत भ्यालों तें करायचं. त्याची पुन्हां भेट होण्याचा संभव नव्हता हें तिला माहीत होतं. किंबहुना तें तिला माहीत होतं म्हणूनच तो निश्चय ती दर वेळीं अधिकाधिक पूर्णतेनं करी. राजाभाऊ तिला कधींच भेटणार नव्हता हें पक्कं माहीत असल्यामुळें तो भेटल्यानंतर लौकिक आचाराची आणि बंधनांची क्षिति बाळगायची नाहीं असं ती आपल्या

मनाशीं धैर्यानं म्हणूं शके. मोह जवळ असला कीं माणसाला त्याची भीति वाटते. पण तो दूर आहे अशी खात्री असली, कीं माणसाला धिटाई करावीशी वाटते. इतकंच नाहीं, तर त्या मोहाबद्दल विचित्र उत्कंठासुद्धां वाटूं लागते. राजाभाऊला उमाचा शोध लागेल हें शक्य नव्हतं. त्याचा शोध करून त्याला भेटण्याचा तिचा हेतु नव्हता. केवळ योगायोगानं दोघांची पुन्हा भेट व्हावी असा मुळींच संभव नव्हता. पण म्हणूनच तो दुर्मिळ योगायोग घडून यावा आणि ज्या सुखाची आपण भीति बाळगली तें हृदयाशीं धरण्यासाठीं आपण आपले बाहु पसरावे अशी चमत्कारिक इच्छा उमाच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. ही तिची इच्छा सतत बळावत गेली. तिची पूर्ण खात्री होती, कीं राजाभाऊ कधीं तिच्या दृष्टीस पडणार नाहीं......

आणि आज ध्यानींमनींही नसतांना तो तिच्या दृष्टीस पडणार होता !...

तें समजतांच तो भेटल्यावर जें करण्याचं तिनं ठरविलं होतं त्याबद्दलच्या तिच्या निश्चयाला एकदम धक्का बसला. मोह जवळ आला त्याबरोबर तिची धिटाई दुर्बल होऊन भीतीनं तिच्या हृदयाचा थरकांप झाला !...

आपण राजाभाऊपाशीं सुखाची जी याचना करायचं ठरवलं आहे ती आजपर्यंत जशी केली नाहीं त्याचप्रमाणें आतांही केली नाहीं तर अधिक बरं नाहीं कां होणार, असंही तिच्या मनांत चटकन् आल्यावांचून राहिलं नाहीं. राजाभाऊ पुन्हां कधींच भेटणार नाहीं अशी पक्की खात्री असतांना कार्याकार्याचा जो विवेक तिला पार धुडकावून देतां आला होता तोच आतां राजाभाऊ भेटणार असं समजल्याबरोबर तिच्या मनाला पुन्हां चिकटूं लागला. फणसातले गरे काढतांना माणूस एका हाताचा चीक दुसऱ्या हातानं साफ करूं लागला, कीं त्याच्या दोन्ही हातांस मात्र तो लागतो. कार्याकार्यविवेक माणसाच्या मनाला एकदां चिकटला कीं त्याचं असंच होतं. उमाला तो विवेक मनावेगळा करतां येईना !...

आणि विवेकानं उत्पन्न केलेल्या या भीतीच्या यातना वाढविण्यासारखी एक चमत्कारिक शंका तिच्या मनांत तितक्यांत चटकन् उभी राहिली !

तिला वाटलं, राजाभाऊचं आपल्यावरचं प्रेम अजूनही कायम आहे या भरंवशावर आपण पुढच्या गोष्टी ठरवितो; पण राजाभाऊचं मनच बदललं असलं तर ? त्याचा काय नेम ? सात वर्षांचा अवधि म्हणजे कांहीं लहान नव्हता. इतक्या दीर्घकाल पुरुषाचं मन अचल राहील कां कधीं ? राजाभाऊच्या चित्तवृत्ती कदाचित् बदलल्याही असतील...

आणि जरी बदलल्या नसल्या तरी आतां या क्षणीं आपल्याला पहातांच बदलतील. जवळ जवळ मृत्युशय्येवर पडलेलं माणूस कुणाला मोहक वाटणं शक्य आहे कां ? मुळांतच आपल्या अंगीं सौंदर्य कधीं नव्हतं. राजाभाऊचं प्रेम आपल्यावर जडलं तरी त्याला आपल्या देहाविषयीं कधीं कांहीं आकर्षण वाटलं असेल हें शक्य नाहीं. किंबहुना उमा अधिक सुंदर असती तर किती बरं झालं असतं असं आपल्यावर प्रेम करतांनाही राजाभाऊच्या मनांत अनेक वेळां येऊन गेलं असलं तर तें साहजीकच ठरेल. आणि आतां तर आपलं हें शरीर दुखण्यानं कृश आणि मलिन झालेलं ! राजाभाऊच्या मनांत आपल्याविषयींची प्रीति जरी उरली असली तरी ती आतां दृष्टभेट होतांच क्षणार्धांत नष्ट होइल !

ही शंका मनांत येतांच उमाला असह्य यातना झाल्या. राजाभाऊ आपल्या भेटीला येत आहे असं आनंदकडून कळतांच तिला जो विस्मयाचा धक्का बसला होता त्याहून या शंकेचा धक्का अधिक मोठा अन् क्लेशकारक होता. तिनं आपले दोन्ही पंजे छातीवर दाबले अन् डोळे मिटून ती क्षणभर स्तब्ध पडली.

कित्येक वर्षांच्या हालअपेष्टांनीं आणि अखेर दुखण्यानं जर्जर झालेल्या तिच्या शरीराची अवस्था पाहून राजाभाऊच्या मनांत तिच्याविषयीं आत्यंतिक अनुकंपा उत्पन्न होईल याविषयीं तिला संशय नव्हता. पण तिला केवळ अनुकंपा नको होती. सर्व प्रकारचीं लौकिक बंधनं टाकून ज्या प्रेमाच्या आवेगानं त्यानं कित्येक वर्षांपूर्वी तिच्या नेत्रांचं चुंबन घेतलं होतं ते प्रेम तिला हवं होतं. तें प्रेम मागण्यासाठीं आणि देण्यासाठीं तिनं दीर्घकाल आपल्या मनाची तयारी केली होती. प्रेमपूर्तीचा जो क्षण कधींच येणार नाहीं अशी

तिची खात्री होती तो येतांच प्रेमाची निःशंक कबुली द्यायचं तिनं ठरविलं होतं. कधीं न येण्यासारखा तो क्षण आतां अकस्मात् प्राप्त झाला होता. आणि अशा वेळीं तिचं दुर्बल शरीर तिचा घात करणार होतं. सर्वस्वीं दुर्दर्शनीय झालेल्या तिच्या शरीराकडे पहातांच तिच्याविषयीं वाटणारा सारा मोह राजाभाऊच्या मनांतून नष्ट झाला तर ?...

पूर्वी राजाभाऊच्या सहवासांत रहात असतांना आपल्या अंतःकरणातलं त्याच्याविषयींचं प्रेम शुद्ध ठेवण्याच्या प्रयत्नांत अनिष्ट वासना उत्पन्न करणारा स्वतःचा देह तिला अनेक वेळां अडचणीसारखा वाटला होता. आणि आतां शुद्धाशुद्धतेचा विवेक झुगारून देऊन, प्रेम सदा शुद्धच असतं अशा समजुतीनं ती राजाभाऊजवळ आपल्या मनांतला गुप्त भाव प्रगट करायला तयार झाली होती तर अशा वेळींहि तिच्या मार्गांत तिच्या देहाचीच अडचण होणार होती !...

छे छे, राजाभाऊ येईल त्या वेळीं आपल्या शरीरावरचं मालिन्य शक्य तितकं दूर झालेलं असलं पाहिजे. आपलं शरीर शक्य तितकं सुंदर, शक्य तितकं आकर्षक, मोहक दिसलं पाहिजे...

जी उमा कित्येक दिवसांत आनंदचा हात धरल्यावांचून अंथरुणावरून उठली नव्हती ती एकदम उठून उभी राहिली ! तिला भोंवळ आली नाहीं. तिचा झोंक गेला नाहीं. ती आपला देह लवकरच मृत्यूच्या स्वाधीन करणार होती; पण तोंपर्यंतच्या उरलेल्या अल्पावकाशांत राजाभाऊच्या प्रेमानं जिवाला मिळणारी धन्यता तिला उपभोगायची होती. त्या धन्यतेच्या मार्गांतली देहाची अडचण नाहींशी करण्याचा तिचा कृतनिश्चय होता. प्रेमाच्या आर्ततेची विलक्षण शक्ति तिच्यांत संचरली होती. तिचं दुबळं शरीर तिच्या इच्छेप्रमाणें हालचाल करायला तयार झालं होतं.

उमानं शक्य तितक्या झटपट आपलं सारं अंग स्वच्छ पुसून काढलं. नववस्त्र परिधान केलं. आरशापुढें बसून ती केस विंचरूं लागली.

तितक्यांत दार वाजलं.

राजाभाऊनं आनंदला मारलेली हाक तिला ऐकूं आली.

उमानं वळून पाहिलं.

दारांत थबकलेला राजाभाऊ तिच्याकडे पाहून हंसला, व म्हणाला,

"उमा!"

प्रीतीचा जो आवेग त्याच्या ओठांनीं कित्येक वर्षांपूर्वी तिच्या नेत्रांवर चुंबनरूपानं उमटाविला होता तो त्याच्या 'उमा' या एकाच शब्दांत तिला स्पष्ट ऐकूं आला!

तिचं शरीर थरथर कापूं लागलं. आरसा आणि फणी तिच्या हातांतून गळून जमिनीवर पडली. ती उठूं लागली तोंच तिला घेरी येऊन तीही खालीं जमिनीवर पडली!



# [२७]

धारासनाच्या मिठागरावर हल्ला करण्याच्या पूर्वीच सरकारनं गांधींना पकडून त्यांची तुरुंगाकडे रवानगी केली. पण तो हल्ला कांहीं चुकला नाहीं. ता. २१ मे रोजीं गुजराथच्या २५०० स्वयंसेवकांनीं धारासनावर हल्ला केला. बासष्ठ वर्षांचे वृद्ध इमामसाहेब या हल्ल्याचे नायक होते. पोलिसांनीं स्वयंसेवकांच्या पाठी लाठ्यांनी झोडपून काढल्या. २९० स्वयंसेवकांना जखमा झाल्या. दादाभाई नांवाचा एक स्वयंसेवक जखमांमुळें मरण पावला. इमामसाहेब, प्यारेलाल आणि मणिलाल गांधी यांना अटक झाली. लष्करच्या सहाय्यानं धारासनाचा आणि बाह्य जगाचा संबंध तोडून टाकण्यांत आला.

पण अशानं काँग्रेसची चळवळ थांबण्यासारखी नव्हती. वडाळा इथं एक मोठं मिठागर होतं. त्यावर हल्ला करायचं काँग्रेसनं ठरविलं आणि त्या हल्ल्याची सारीं सूत्रं राजाभाऊच्या हातीं दिलीं. तो हल्ला मुळांतच अशक्य करून

टाकण्यासाठीं सरकारनं हल्ल्यांपूर्वीच १८८ स्वयंसेवकांना अटक केली. तरी न डगमगतां राजाभाऊनं शंभर स्वयंसेवकांची दुसरी तुकडी तयार केली. या तुकडीवर पोलिसांनीं सर्रास लाठी चालवुन सतरा लोक जखमी केले. २६ तारखेस ६५ स्वयंसेवक रणभूमीवर पुन्हां हजर झाले. त्यांपैकीं त्रेचाळीसांना कैद झाली. बाकीचे लोकांच्या जमावाबरोबर मिठासह निसटले! सरकारला वाटूं लागलं, आतां हल्ल्याचं हें सत्र संपेल. स्वयंसेवकच कमी पडल्यावर कॉंग्रेसची युद्ध–समीति काय करणार? परंतु राजाभाऊनं ता. १ जून रोजीं एक अतिशय मोठा हल्ला करण्याचं योजलं होतं. या हल्ल्यासाठीं पंधरा हजार स्वयंसेवकांची भरती त्यानं केली होती आणि त्याच्याबरोबर तो स्वतः मिठागरावर चालून जाणार होता.

ता. १ जून १९३० रोजीं प्रातःकालच्या मंगलसमयीं राजाभाऊच्या नेतृत्वाखालीं जमा झालेले पंधरा हजार स्वयंसेवक लष्करी शिस्तीनं कॉंग्रेस हाऊसमधून बाहेर पडूं लागले. ही मिरवणूक फक्त लालबागेपर्यंत निघणार होती व तेथून सारे स्वयंसेवक मोटार लॉऱ्यांत बसून वडाळयाकडे रवाना होणार होते. मिठागरावर प्रचंड हल्ला करण्यासाठीं पंधरा हजार स्वयंसेवक कॉंग्रेस हाऊसमधून निघणार आहेत ही बातमी समजल्यामुळें कॉंग्रेस हाऊससमोर लोकांचा प्रचंड समुदाय जमा झाला होता. सत्याग्रह्यांच्या रांगा दृष्टीस पडतांच लोकांनीं 'वंदे मातरम्' 'महात्मा गांधी की जय' इत्यादि आरोळ्या ठोकल्या. सर्वांच्या अग्रभागीं राजाभाऊ चालला होता. त्याच्या जोडीनं नीला चालली होती. दोघांचेही नेत्र सत्याग्रहाच्या अभिमानानं फडकणाऱ्या झेंड्याकडे लागलेले होते. दोघं मिळून उंच स्वरांत राष्ट्रगीत म्हणत होतीं:—

**"जयति जय मंगला स्वदेशा!**
**जननिसम मानिला, तुला लोकीं नच तुला,**
**प्रिय भारता ॥ धृ ॥**

**शपथ कीं करिन मी सुसेवा**
**सांडोनिया रुधिरही नित तुझी, प्रिय भारता ॥ १ ॥"**

या गीतांतील 'सांडोनिया रुधिरही' हे शब्द कानीं पडतांच ते ऐकणाऱ्या हजारों लोकांच्या चित्तवृत्ती इतक्या विलक्षण रीतीनं थरारून गेल्या

कीं जणूं कुणी आज्ञा केल्याप्रमाणें 'वंदे मातरम्' असा प्रचंड जयघोष सर्वांच्या मुखांतून एकदम बाहेर पडून त्यानं साऱ्या दिशा व्यापून टाकल्या. त्या जयनादापुढें गीताचे बाकीचे शब्द कुणाला धड ऐकूंही आले नसतील. स्वतः राजाभाऊ ते शब्द उच्चारीत होता तरी त्याचे त्यालासुद्धां ते नीटसे ऐकूं येत नव्हते.

कारण, कांहीं एका विचित्र उन्मादावस्थेचा त्याला त्या क्षणीं अनुभव येत होता.

त्या अवस्थेंत स्वतःच्या कोणत्याही वैयक्तिक सुखदुःखाची जाणीव त्याला उरलेली नव्हती. वैयक्तिक प्रेमद्वेषाची अगर आशा निराशेची सारी भावना त्याच्या अंतःकरणांतून लुप्त झाली होती. नीला त्याच्या जोडीनं चालली होती. पण आपल्याप्रमाणेंच सत्याग्रहाच्या रणांगणावर रक्त सांडायला निघालेली एक व्यक्ति आपलीकडे नीला कोण तें त्याला त्या क्षणीं कळत नव्हतं. तिचं त्याच्यावर प्रेम होतं. त्या प्रेमामुळेंच त्याच्या अखेरच्या निरोपाप्रमाणें ती त्याला कॉंग्रेस हाऊसवर येऊन भेटली होती. सत्याग्रहाच्या युद्धांत पडणाऱ्या व्यक्तीला किती भयंकर हाल सोसावे लागतात तें तो तिला सांगूं लागला तेव्हां 'तुमचं प्रेम मिळवायचा हा एकच मार्ग आहे. मी त्या मार्गानं येणार!' येवढं एकच उत्तर तिनं पुनःपुन्हां दिलं होतं. यापैकीं एकही गोष्ट त्याला या क्षणीं आठवत नव्हती. उमावर प्रथमपासून त्यानं प्रेम केलं, आणि त्या प्रेमाचं एक-निष्ठ प्रणयांत रूपांतर झालं; पण त्याचेसुद्धां तरंग या क्षणीं त्याच्या हृदयांत उठत नव्हते. त्या दिवशीं तो तिला तिच्या बिऱ्हाडीं जाऊन भेटला तेव्हां ती मूर्च्छित झालेली पहातांच त्यानं तिला झटकन पुढें होऊन उचललं होतं आणि हृदयाशीं घट्ट धरून सावध केलं होतं. तिच्या प्रेमाची कबूली त्यानं ऐकली होती; आपल्या अंतःकरणांतल्या प्रेमाची कबुली दिली होती. तिचे हुंदके त्यानं आवरले होते, अश्रू पुसले होते. ती आतां फार दिवस जगणार नाहीं हें त्यानं ओळखलं होतं; तो आपले पंचप्राण हातीं घेऊन युद्धावर निघाला आहे हें तिनं ओळखलं होतं. वियोगाच्या उंबरठ्याच्या अलीकडे दोन पावलांच्याच अंतरावर झालेली त्या दोघांची भेट मोठी विलक्षण होती. मृत्युलोकाच्या सीमेपलीकडे जायला टेकलेल्या उमाला थोपवून धरणं राजाभाऊच्या हातीं नव्हतं; देशासाठीं

प्रसंगीं मृत्यूला आलिंगन द्यायला सिद्ध झालेल्या राजाभाऊला 'माझ्यासाठीं थांबा परत फिरा!' असं म्हणायचा दुबळेपणा उमानं केला नाहीं. त्या भेटीनंतर राजाभाऊ रोज एकदां केव्हां तरी तिला भेटत होता. काल रात्रीं जेव्हां तो तिला भेटला तेव्हां तो तिला म्हणाला होता, "आतां ही अखेरची भेट." तें ऐकून एकीकडे डोळ्यांतले अश्रू हाताऐवजीं पापण्यांनींच दाबीत आणि एकीकडे हंसत तिनं मान हलविली होती, आणि "अखेरची कां म्हणून? तुम्ही तुरुंगांतून सुटून येईपर्यंत जिवंत रहायचा माझा निश्चय आहे!" असं म्हटलं होतं. पण राजाभाऊला मनातल्या मनांत पक्कं माहीत होतं, कीं त्याला उमाचं दर्शन पुन्हां होणं शक्य नव्हतं. तिचा निरोप घेऊन तो कॉंग्रेस हाऊसकडे परत आला तेव्हां आपलं अंत:करण विलक्षण शोकावेगानं भारावल्यासारखं त्याला वाटलं होतं. पण आतां या क्षणीं तिरंगी झेंड्याकडे निश्चल दृष्टि लावून राष्ट्रगीत म्हणत धीरगंभीर पावलं टाकतांना आणि जिकडे तिकडे दुमदुमणारा 'वंदे मातरम्' हा जयध्वनि ऐकतांना त्याला काल रात्रींच्या त्या शोकावेगाचीही शुद्ध नव्हती, आणि तो शोकावेग त्याच्या आयुष्यांतल्या ज्या अनेक चित्रविचित्र घटनांनीं निर्माण केलेला होता त्यांचीही जाणीव उरली नव्हती. किंबहुना स्वत:च्या आकुंचित जीविताच्या साऱ्याच बऱ्यावाईट भावना तो विसरला होता. गांधींचं राजकारण आपल्याला पसंत नाहीं याचीही आठवण त्यानं केव्हांच बुजवून टाकली होती. सत्याग्रहावरची स्वत:ची अश्रद्धा त्यानं आठवणींत ठेवली नव्हती. तो देशासाठीं मृत्यु पत्करायला तयार होता, आणि मृत्यु पत्करण्याचा मार्ग गांधीवांचून दुसरा कुणी पुढारी त्याला दाखवीत नव्हता. तेव्हा गांधींनीं दाखविलेल्या मार्गानं मृत्यूचा आणि देशसेवेचा प्रवास करणं येवढंच त्याला कळत होतं. तेवढी एकच आठवण त्याच्या मनांत या क्षणीं राहिली होती. बाकी कुठल्याच गोष्टी त्याला स्मरत नव्हत्या...

हजारों मुखांतून बाहेर पडलेला 'वंदे मातरम्' असा जयध्वनि जिकडे तिकडे घुमून विराम पावला तेव्हां त्यानं उच्च स्वरानं गीत म्हणण्यास प्रारंभ केला,

**'जयति जय मंगला स्वदेशा......'**

त्याचीं पावलं पुढें पडतच होतीं. त्याची दृष्टि झेंड्याकडे लागलेली होती.

तितक्यांत त्याच्या उजव्या बाजूला लोकांच्या जमावांत एकदम, गडबडीची लाट उसळली. लोक ओरडले, पोलिस धांवले, अश्वारूढ शिपायांनीं घोडे दामटले, त्यांच्या टापांचा खाड् · खाड् असा आवाज झाला, आणि लोकांनीं अधिकच मोठा ओरडा केला.

राजाभाऊनं क्षणभर थांबून उजवीकडे दृष्टि वळविली.

त्याच वेळीं शुश्रुषापथकाच्या लोकांनीं शिटया वाजविल्या त्या त्याला ऐकूं आल्या.

तो पहात राहिला.

शुश्रुषापथकाचे दोन तीन लोक धांवत त्याच्याजवळ आले व म्हणाले,

" घोडयाची टाप लागून एक बाई घायाळ झाली आहे. ती सारखं तुमचं नांव घेत आहे. "

राजाभाऊ गर्दीत घुसून पुढें झाला आणि त्यानं पाहिलं तों उमा जखमी होऊन पडली होती. घोडयाची टाप लागतांच तिच्या हातांतलं सामान उडून रस्त्यावर पडलं होतं, त्यांत नीरांजन आणि कुंकवाचा करंडा होता.

राजाभाऊनं झटकन् खालीं वाकून तिचं मस्तक हृदयाशीं धरलं व म्हटलं, " उमा ! "

पण तिनं त्याचा शब्द ओळखला नाहीं. तिच्या नजरेंतला किरणही नाहींसा झाला होता, आणि ती समोर अंतराळांत कुठें तरी पहात होती. ती नीटशी शुद्धीत नव्हती आणि अगदीं क्षीण आवाजांत ती पुटपुटत होती,

" पंचारती ओवाळून......हातांनीं......कुंकमतिलक लावावा...... म्हणून...... "

राजाभाऊनं तिच्या कानाजवळ तोंड नेऊन पुन्हां म्हटलं,

" उमा, उमा, इकडे बघ. "

पण उमानं त्याच्याकडे पाहिलं नाहीं. उलट तिचे डोळे उघडे होते ते मिटले गेले आणि त्याच्या छातीवरच्या मस्तकाला लुलेपणा आणि जडपणा आल्यासारखं त्याला वाटलं.

राजाभाऊनं शुश्रुषापथकाच्या मुख्याधिकाऱ्याच्या कानांत कांहींसं सांगितलं, आणि तो तेथून दूर झाला.

स्वयंसेवकांच्या अग्रभागीं नीलाच्या शेजारीं येऊन तो उभा रहातांच तिनं राष्ट्रगीत पुन्हां सुरू केलं.

'शपथ कीं करिन मी सुसेवा
सांडोनिया रुधिरही......'

राजाभाऊ म्हणण्याचा प्रयत्न करूं लागला पण त्याचा शब्दच फुटेना !

त्याच्या अंतःकरणांत अशी तीव्र इच्छा तळमळत होती कीं ज्या जुलमी सत्तेचं रक्षण करणाऱ्या शिपायांच्या घोड्याच्या टापेखालीं त्याची उमा जखमी झाली होती तिच्याविरुद्ध पस्तीस कोटी हिंदी लोक खाडकन् जागे होऊन उठतील इतक्या उच्च स्वरानं राष्ट्रगीताचा जयघोष करावा ! पण त्याचा कंठ निःशब्द झाला होता !

* * *

त्या दिवशीं वडाळ्याचा सत्याग्रह म्हणजे एक मोठी रणधुमाळी झाली. पोलिसांनीं सारी दयामाया सोडून लाठी चालविली. किती लोकांना जखमा झाल्या त्याची गणती राहिली नाहीं. भोंवतालच्या लोकांना तें सारं दृश्य अंगावर शहारे आणणारं वाटलं. माजी न्यायाधीश मि. हुसेन, श्री. नटराजन् व सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीचे अध्यक्ष श्री. देवधर यांनी समक्ष पाहिलेल्या हकीगतीवरून जें पत्रक प्रसिद्ध केलं त्यांत त्यांनीं नमूद केलं, कीं " सत्याग्रहींना मिठागरापासून दूर काढल्यावर त्यांच्या जमावावर युरोपियन घोडेस्वार आपले घोडे भरधांव फेकींत. पोलीस सर्रास लाठ्या चालवींत. त्यांनीं खेड्यांत घुसून रस्त्यानें जाणाऱ्या लोकांनासुद्धां पिटून काढलें. त्यांत मुलांची किंवा स्त्रियांचीही गय,

केली नाहीं. शेतकरी बोळांत दडून बसत व घराची दारें बंद करून ठेवीत. परंतु जर चुकून कोणी सांपडले तर त्यांना खूप मार मिळे." 'न्यू फ्रीमन' पत्राचे प्रतिनिधी मि. वेब मिलर यांनीं आपल्या वर्णनांत लिहिलं, कीं "गेलीं अठरा वर्षें मी बातमीदाराचें काम करीत आहे, व एकंदर बावीस देशांत हिंडलों आहे. या काळांत हजारो दंगे, सामाजिक बंडें, रस्त्यांतील मारामाऱ्या, असल्या प्रसंगीं मी हजर होतों. परंतु आज पाहिलेल्या प्रकारासारखा प्रकार मला कोठें दिसला नाहीं. कांहीं वेळां तो देखावा इतका भयंकर वाटला कीं बातमीचे काम सोडून मला मधून मधून तोंड फिरवावें लागे." लंडनच्या 'डेली हेरल्ड' पत्राचे प्रतिनिधी जॉर्ज स्लोकोम यांनीं लिहिलं, कीं "सत्यनिष्ठेनें प्रेरित झालेले आणि आत्यंतिक देहदंड सोसण्यास तयार झालेले ते हजारो स्वयंसेवक आणि त्यांचा सत्याग्रह पहात राहिलेल्या लोकांचा प्रचंड समुदाय भोंवतालीं दिसला कीं आपण एक इंग्रज गृहस्थ यांच्यांत उभे आहोंत याची जाणीव होऊन तेथें उभें रहाण्याची लाज वाटत असे. देशाच्या राज्यव्यवस्थेचे घटक त्या ओंगळ व किळसवाण्या प्रकारांत गर्क झाल्याचें तें दृश्य कुणाही इंग्रज माणसाच्या मनांत शरम उत्पन्न करण्यासारखें होतें."

मिठाच्या कायदेभंगाच्या त्या चळवळींत करण्यांत आलेले सारेच लाठीहल्ले निर्दयपणाचे होते. पण त्या दिवशींचा वडाळा येथील लाठीहल्ला जवळ जवळ क्रूर स्वरूपाचा होता.

आपल्या आजूबाजूच्या स्वयंसेवकांचीं डोकीं लाठ्यांनीं फुटत असलेलीं पाहून राजाभाऊंच्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे झाले. लाठीचा प्रहार सोसतां सोसतां स्वयंसेवकांनीं 'वंदे मातरम्' अथवा 'महात्मा गांधी की जय' असा जयध्वनि सतत चालू ठेवलेला ऐकून एकीकडे त्याचं अंतःकरण थरारत होतं, जे लोक असं दिव्य करूं शकतात त्यांच्या देशाचं स्वातंत्र्य दूर खचित नाहीं अशा विचारानं त्याच्या सर्वांगावर आनंदाचे रोमांच एकीकडे उभे रहात होते, पण दुसरीकडे त्या वीरांच्या यातना त्याच्या नेत्रांना पहावत नव्हत्या. अखेर त्याच्या स्वतःच्या मस्तकावर जेव्हां एकामागोमाग पांच सहा लाठ्या बसल्या आणि जबरदस्त मूर्छा येऊन

त्याचे नेत्र मिटले तेव्हां त्याच्या शुद्धींतला जो अखेरचा तरंग क्षणमात्र उठून लगेच विरून गेला तो एक प्रकारच्या समाधानाचा होता !

* * *

त्यानं शुद्धीवर येऊन डोळे उघडले तेव्हां तो कॉंग्रेसच्या इस्पितळांत होता.

त्याच्या उशाशीं कुणी तरी उभं असल्यासारखं त्याला वाटलं. त्यानं विचारलं,

" उमाचं कसं आहे ? "

" कोण उमा ? " त्या व्यक्तीनं विचारलं.

" सकाळी घोड्याची टाप लागून जखमी झाली ती स्त्री ? "

" बिचारी...... "

येवढाच शब्द उच्चारून त्या व्यक्तीनं दृष्टि दुसरीकडे वळविली.

उमाची इहलोकची यात्रा संपली होती तर ?

त्या कल्पनेचं विलक्षण दुःख सहन करण्यासाठीं राजाभाऊनं आपले नेत्र झटकन् गच्च मिटून घेतले.

पण तसं करण्यानं दृष्टि बंद होण्याऐवजीं राजाभाऊच्या मिटलेल्या नेत्रांपुढें त्याच्या आयुष्यातल्या सर्व लहान मोठ्या प्रसंगांचीं चित्रं एकामागोमाग भरभर सरकूं लागलीं !

राधानं लहानग्या राजाभाऊला पोटाशीं घट्ट धरलं अन् म्हटलं, " मी सांगतें तशी शपथ घेशील ? " त्यानं तशी शपथ घेतली तेव्हां राधा स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. तिनं त्याला विचारलं, " बाळ, मी मेल्यावर माझी तुला आठवण राहील कां रे ? " पण तिला तितक्यांत खोकल्याची मोठी ढास आली आणि तिचे डोळे भेसूर दिसूं लागले. तेव्हां पंजाबरावांनीं तिचं मस्तक आपल्या मांडीवर घेतलं. आपल्या वडिलांना तो म्हणाला, " तुम्हांला सुखी केलं पाहिजे मला. गाण्याचा नाद मी कायमचा सोडला असं

समजा." त्याच्या वडिलांना अखेरची घरघर लागली तेव्हां त्यानं जो हृदयविदारक किंकाळी फोडली होती ती त्याला आतां पुन्हा ऐकूं आली. एका दिवाणखान्याच्या आंतल्या दारांत उभी राहिलेली चंचला त्याला दिसली. तिचा चेहरा आरक्त झाला होता, श्वास घाबरल्यामारखा होत होता, तिच्या लांबसडक काळ्याभोर पापण्या थरथर हलत होत्या. ती किंचित् हंसली व गाऊं लागली. 'बैरन हो गई हो गई रात।' तें ऐकताच त्यानं आडकित्ता फेंकून मारला तो पलीकडच्या आरशाला लागून त्याचे तुकडे खळाळत जमिनीवर पडले. महेश्वर उमाला हातांत धरून अंधारांत नेऊं लागला तेव्हां ती त्याच्याकडे पाहून दीनस्वरानं म्हणाली, 'राजाभाऊ तुमच्यावांचून माझं रक्षण कोण करील ?' त्यानं तिला जवळ ओढलं आणि तिच्या नेत्रांचं चुंबन घेतलं. परदेशी कापडाची एक जंगी होळी पेटली होती तिच्यापुढें तो मोठमोठ्यानं भाषण करीत होता. त्याला कुणी तरी येऊन धरलं आणि तुरुंगांत नेऊन टाकलं. तो कुठें तरी समुद्रकाठीं बसला होता, आणि मॅगडा शूबेर्ट त्याला म्हणत होती, 'काय चमत्कारिक आहे हें मानवी जीवित ?' नीला त्याला अगदीं खेटून उभी राहिली होती आणि म्हणत होती, 'तुमच्या प्रेमासाठीं वाटेल तें दिव्य करायला माझी तयारी आहे !...'

याप्रमाणें जीवितप्रवासाच्या त्या त्या मुक्कामावर अल्प काल अगर दीर्घ काल भेटलेल्या निरनिराळ्या व्यक्ती राजाभाऊच्या मिटलेल्या दृष्टीला अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसल्या खऱ्या, परंतु आयुष्यांत याच विवक्षित व्यक्ती त्याला कां भेटल्या किंवा त्या व्यक्तीविषयीं विवक्षितच मनोविकार कां उत्पन्न झाले, अथवा त्या त्या व्यक्तीशीं तो विवक्षित तऱ्हेनंच कां वागला हें मात्र त्याला मुळींच समजलं नाहीं. किंबहुना आतांपर्यंतचा त्याचा जीवितप्रवास ज्या मार्गानं झाला त्या मार्गानंच कां झाला हा प्रश्न राजाभाऊच्या मनाला एखाद्या कोड्यासारखा वाटला. आणि तें कोडं त्यालाच नव्हे तर कुणालाच कधीं सुटणार नाहीं असं त्याच्या मनांत चटकन् येऊन गेल्याशिवाय राहिलं नाहीं......

कुणी तरी आपला हात घट्ट दाबीत आहे असं वाटल्यावरून राजाभाऊनं डोळे उघडले.

त्याच्या समोर नील उभी होती काय... ?

कां उमा... ?

पण उमा कशी असेल ? तिनं तर आपला प्रवास संपवून अखेरचा मुक्काम गांठला होता !...

मग ही कोण ? चंचला ?...

तें ठरविण्याचा शीण राजाभाऊच्या मेंदूला नकोसा वाटला. डोळे उघडून नीट पहाणंहि त्याच्या त्या वेळच्या क्षीण शक्तीच्या पलीकडे होतं.

त्यानं पुन्हां डोळे मिटून घेतले.

आणि डोळे मिटतांच मघाशीं ज्याप्रमाणें आजपर्यंतच्या त्याच्या जीवितप्रवासांतलीं चित्रं त्याला दिसलीं त्याप्रमाणें त्यच्या प्रवासाचा पुढचा मार्ग आतां त्याला दिसला. गडद अंधार नाहींसा होऊन सूर्याचा प्रखर प्रकाश एकदम प्रगट व्हावा आणि त्या दीप्तिमय प्रकाशानं एखादी वाट एकदम उजळलेली दिसावी त्याप्रमाणें त्याच्यापुढें एक मार्ग पसरलेला त्याला दिसला. तो मार्ग अमुक ठिकाणीं संपला आहे असं दिसत नव्हतं. समोरच्या क्षितिजापर्यंत तो मारखा पुढें पुढेंच गेलेला दिसत होता. राजाभाऊनं नीट पाहिलं तों पृथ्वीवरच्या नाना देशचे लोक त्या मार्गानं चालले होते. त्या गर्दीत रणांगणांवर घायाळ झालेले शूर शिपाई होते, क्रांतिकारक विचार सांगणारे कवि होते, तत्त्ववेत्ते होते, मुत्सद्दी होते, कलावंत होते! आणि त्यांनीं धरलेले आपापल्या देशाचे स्वातंत्र्यध्वज वाऱ्यावर फडफडत होते !......

राजाभाऊनं मोठ्यांदा आरोळी ठोकून त्या लोकांना सांगितलं, 'अरे, मला याच मार्गानं यायचं आहे थांबा ! आलों !......'

सत्याग्रहाचा तिरंगी झेंडा हातीं घेऊन हर्षोन्मादानं 'जयति जय मंगला' हें राष्ट्रगीत उच्च स्वरानं गात तो धांवत सुटला ! ......

पण त्याच्या पार्थिव कंठांतून राष्ट्रगीताऐवजीं चमत्कारिक घरघर मात्र शेजारीं उभ्या असलेल्या नीलांबरीला ऐकू आली! आणि त्यांच्या पार्थिव पायांना तिनं हात लावून पाहिला तों त्यांचा स्पर्श तिला गरा वाटला!

तिनं एकदम आपलं मस्तक राजाभाऊच्या छातीवर टेकलं, आणि ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

— समाप्त —

Printer: S. V. Pore, Chayatanya Printing Press,
373 Shanvar, Poona.

Publisher: K. S. Gupte, Budhwar Peth, Poona.